रुमाल क्र. ४१, पुडके क्र. ३–पत्रे–चालू :

आंब्याच्या डहाळ्या व वस्त्रे घेऊन येणाऱ्या माणसास इनाम देण्याबाबत (२१७१६); दोन दिवसात पुण्याहून पैठणास गेलेल्या भवानजी मावजी यास इनाम देण्याबाबत, २२ मोहरम, सु. ११६८/२० जून १७६७ (२१७१८); महादजी शामजी यास चांगल्या चाकरीबद्दल शेला पागोट्याचे कापड बक्षीस, २६ मोहरम, सु. ११६८/२४ जून १७६७ (२१७२१); परकाले यांच्याकडे निशाणास कापड देण्याबाबत (२१७२९); कबाडी लोकास ऐवज देण्याबाबत, १३ मोहरम, सु. ११६७/ २० जून १७६६ (२१७३४); जखमी झालेल्या रखमाजी महाडीक शिलेदार यास जखमेची वस्त्रे देण्याबद्दल, २१ सवाल, सु. ११६७/२२ मार्च १७६७ (२१७३७); हैबतराव निंबाळकर याजकडील त्रिंबक जगताप वकील यास न मिळालेली तैनात देण्याची विनंती (२१७५०); कृष्णाजी बागुल यास नालबंदीचा ऐवज देण्याबाबत, २३ ज. खर, सु. ११६५/१७ डिसेंबर १७६४ (२१७५५); मनोहर गिरमाजी यांच्या तोफखान्याचे फडणिसीचे वेतन देण्याबाबत (२१७६५); मीर मुसाखानाकडील काशिदास इनाम देण्याबाबत (२१७६७); महादजी विश्वनाथ गोगटे यास अंगरखा व पायजम्याचे पैसे देण्याबाबत (२१७६८); रावसाहेब याजकडील फरासखान्यातील लोकांना इनाम देण्याबाबत (२१७६९); मोरो विठ्ठल फडणीस यास द्यावयाच्या फरासखान्याच्या सामानाबाबत, २१ ज. खर, सु. ११६५/१५ डिसेंबर १७६४ (२१७७०); रामभट जोगदेवभट यांच्या सुवर्णदुर्गाच्या गणपतीच्या पूजेबद्दलच्या नेमणुकेच्या ऐवजाची पोच, २९ सफर, सु. ११६४/८ सप्टेंबर १७६३ (२१७७२); सोनेरी व रुपेरी वर्खाच्या मजुरीबाबत, २९ ज. खर, सु. ११६४/४ जानेवारी १७६४ (२१७७३); महिपतराव लक्ष्मण यास मुशाहिऱ्याबद्दल सोनोरी येथील सनदी शेत देण्याबाबत, सु. ११६४/इ. स. १७६३ ६४ (२१७७४); अली बहादर याजकडील पावळकर हीस दसऱ्यास कापडाची पोच, २५ र. खर, सु. ११६४/२ नोव्हेंबर १७६३ (२१७७५); सुपे परगण्याच्या तेरजेत फाजील निघालेल्या ऐवजापैकी रदकर्जाबद्दल चोपड परगण्यावर वरात देण्याबद्दल, २१ ज. खर, सु. ११६५/१४ जानेवारी १७६५ (२१७७७); पैठणच्या ऐवजाची पुण्यास पोच, २३ ज. खर, सु. ११६५/१६ जानेवारी १७६५ (२१७८२); पागेकडे गजनीचे कापड देण्याबाबत, २६ सवाल, सु. ११६७/२७ मार्च १७६७ (२१७८५); किरकोळ मजकूर, ८ र. खर, सु. ११६७/१३ सप्टेंबर १७६६ (२१७८६); पागेकडील पाठविलेले सामान सत्वर घेऊन येण्याबाबत, २ ज. वल, सु. ११६८/२६ सप्टेंबर १७६७ (२१७८७); सरंजामाचे हिशेब पाठविण्याबद्दल, आषाढ शु. १, श. १६९१/४ जुलै १७६९ (२१७९०); विसाजी गणेश यास सारवानाचे वाटणीबद्दल ऐवज देण्याबाबत, १६ जिल्हेज, सु. ११७१/२ एप्रिल १७७१ (२१७९२); दमाजी गायकवाड याजकडील कासिदांना वेतन देण्याबाबत (२१७९६); महंमद कुला बारगीर यास तैनातेचा ऐवज देण्याबाबत (२१७९७).

[खालील व्यक्तींना खर्चासाठी ऐवज देण्याबाबत]

भवानीशंकर कोरेगांवकर, १८ मोहरम, सु. ११६८/१६ जून १७६७ (२१६९३); खंडेराव धुमाळ व बालोजी पलांडे, १९ मोहरम, सु. ११६८/१७ जून १७६७ (२१६९७); महंमद युसफ, २२ मोहरम, सु. ११६८/२० जून १७६७ (२१६९८, २१७०८); द्वारकोजी निंबाळकर याजकडील पागेतील लोकांना, १७ मोहरम,

पत्रे–चालू :

सु. ११६८/१५ जून १७६७ (२१६९९); नारायण हरकारा घरी जात असल्याने त्यास, २१ मोहरम, सु. ११६८/१९ जून १७६७ (२१७०३); बालोजी पलांडे याजकडील लोकांना, १५ मोहरम, सु. ११६८/१३ जून १७६७ (२१७०४); कृष्णराव बळवंत, १७ मोहरम, सु. ११६८/१५ जून १७६७ (२१७२०); मनाजी शिंदे, २९ सवाल, सु. ११६७/३० मार्च १७६७ (२१७३०); हुसकोट येथे ठार झालेले गोविंदराव बर्गे यांच्या उत्तरकार्यासाठी, २० जिल्काद, सु. ११६७/२० एप्रिल १७६७ (२१७३१); बाळोजी शिंदे याजकडील पागेतील जखमी लोकांना, १७ जिल्हेज, सु. ११६७/१६ मे १७६७ (२१७३८); जाधव मंडळीना, १९ ज. खर, सु. ११६५/१३ डिसेंबर १७६४ (२१७४५); हिरा केशवदास चोपदार, २१ ज. खर, सु. ११६५/१५ डिसेंबर १७६४ (२१७४९); तोफखान्याकडील लोकांना खर्चास (२१७५७); भिकनखान याजकडील करार केलेल्या नवीन लोकांना, २३ ज. खर, सु. ११६५/१७ डिसेंबर १७६४ (२१७६३).

[खालील लोकांना धार्मिक विधीसाठी ऐवज देण्याबाबत]

आंदराव जाधव, ८ मोहरम, सु. ११६८/६ जून १७६७ (२१६७७); जनार्दनराम, १७ मोहरम, सु. ११६८/१५ जून १७६७ (२१६७९); सखोजी गावडे, १८ मोहरम, जेष्ठ, सु. ११६८/१६ जून १७६७ (२१६८४); नानाजी कृष्ण जोशी, सु. ११६८/इ. स. १७६७-६८ (२१६८८); भगवंतराव ठाकूर, १८ मोहरम, जेष्ठ, सु. ११६८/१६ जून १७६७ (२१६८९); बालोजी पलांडे, १८ मोहरम, सु. ११६८/१६ जून १७६७ (२१६९०); महादजी शितोळे (२१६९१); नावजी ढमदेरे (२१६९४); शिवाजी विश्वनाथ, १३ मोहरम, सु. ११६८/११ जून १७६७ (२१७०५); बाळाजी शंकर, १८ मोहरम, सु. ११६८/१६ जून १७६७ (२१७०९); पोखरगिरी गोसावी, १७ मोहरम, सु. ११६८/१५ जून १७६७ (२१७१७); राघो बापूजी याजकडील लोकांस, १७ मोहरम, सु. ११६८/१५ जून १७६७ (२१७१९); गोदजी, २१ मोहरम, सु. ११६८/१९ जून १७६७ (२१७२२); राघो बापूजी, १८ मोहरम, सु. ११६८/१६ जून १७६७ (२१७२३); सिदोजी गुजर, १७ मोहरम, सु. ११६८/१५ जून १७६७ (२१७२४); खेत्रोजी बर्गे यांस (२१७३२).

[खालील लोकांना रोजमुऱ्याचा ऐवज देण्याबाबत]

रामचंद्र जाधवराव याजकडे बातमीस जाणाऱ्या भिकाजी व सुभानजी नाईक यांच्या जासुदांना, २३ ज. खर, सु. ११६५/१७ डिसेंबर १७६४ (२१७५४); फाजल भालदार यास, १३ मोहरम, सु. ११६८/११ जून १७६७ (२१६८०); रुपमल याजकडील कासिदांच्या जथ्यास, सु. ११६८/इ.स. १७६७-६८ (२१६८२); उबरखान, सु. ११६८/इ. स. १७६७-६८ (२१६८३); रुस्तुम भालदार, १९ मोहरम, जेष्ठ, सु. ११६८/१७ जून १७६७ (२१६८५); दौला भालदार यास, १८ मोहरम, सु. ११६८/१६ जून १७६७ (२१६८६); दाजी नारायण, १४ मोहरम, सु. ११६८/१२ जून १७६७ (२१७०२); आबदालबेग शिलेदार, १८ मोहरम, सु. ११६८/१६ जून १७६७ (२१७०७); रामचंद्र विष्णु कारकून शिलेदार, १ सफर, सु. ११७१ १७ मे १७७१ (२१७११); रामचंद्र विष्णु गाडगीळ (२१७१४); कृष्णाजी रणसिंग शिलेदार, ७ सवाल, सु. ११६७/८ मार्च १७६७ (२१७२५); खान महंमद शिलेदार, १ मोहरम, सु. ११६७/९ जून १७६६ (२१७२६); त्रिंबकराव धोंडाजी, २० जिल्काद, सु. ११६७/

**रुमाल क्र. ४१, पुडके क्र. ३–पत्रे–चालू :**

एप्रिल १७६७ (२१७२७); मिर्जा निमबेग (२१७२८); राघोबा गोसावी, १५ जिल्काद, सु. ११६७/१५ एप्रिल १७६७ (२१७३३); बाबूराव मल्हार, १९ ज. खर, सु. ११६५/१३ डिसेंबर १७६४ (२१७४६); अली भालदार, १९ ज. खर, सु. ११६५/१३ डिसेंबर १७६४ (२१७४७); शिलेदार, ६ साबान, सु. ११६५/२८ जानेवारी १७६५ (२१७५८); गंगाधर सुबराव, २५ मोहरम, सु. ११६४/६ ऑगस्ट १७६३ (२१७६२); नरहर मोरेश्वर (२१७६६); गोविंदराव बापूजी, सु. ११६७/१७६६-१७६७ (२१७८४).

**याद्या :**

**[फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेल्या]**

(—) – **खंडो बाबूराव :** तोफखान्याकडे द्यावयाच्या जिनसांची, १४ र. खर, सु. ११६८/८ सप्टेंबर १७६७ (२१६७४); ७ ज. खर, सु. ११६८/३१ ऑक्टोबर १७६७ (२१६७५); १४ र. खर, सु. ११६८/८ सप्टेंबर १७६७ (२१६७६); उष्टरखान्याकडे द्यावयाच्या जिनसांची, ७ ज. खर, सु. ११६८/३१ ऑक्टोबर १७६७ (२१७८९); १४ र. खर, सु. ११६८/८ सप्टेंबर १७६७ (२१७९३–२१७९५).

(—) – **गोविंदराव सदाशिव कमाविसदार-भोसे :** बाळोजी पलांडे याजकडील पागेकडे द्यावयाच्या जिनसांची, ११ मोहरम, सु. ११६८/२८ मे १७६८ (२१७८८).

**[प्रेषक अथवा प्रापकांचा नामोल्लेख नसलेल्या]**

गोविंदराव सदाशिव याजकडील पागेतील लोकांना धार्मिक विधीसाठी खर्चास देण्याबाबत, १७ मोहरम, सु. ११६८/१५ जून १७६७ (२१६७८); संतोख राय याच्या पागेकडे द्यावयाच्या जिनसांची, १८ मोहरम, सु. ११६८/१६ जून १७६७ (२१६८७); जासूद जथ्यास द्यावयाच्या रोजमुऱ्याची, २० मोहरम, सु. ११६८/१६ जून १७६७ (२१६९२); बरे वाटत नसल्याने पुण्यास जाणाऱ्या लोकांस आगाऊ देण्यात आलेल्या रोजमुऱ्याची, १० मोहरम, सु. ११६८/८ जून १७६७ (२१७००); बाबा वैद्य यास द्यावयाच्या ऐवजाची, १० मोहरम, सु. ११६८/८ जून १७६७ (२१७०१); कृष्णदास बळवंत याजकडील ऐवज द्यावयाच्या लोकांची, १० मोहरम, सु. ११६८/१५ जून १७६७ (२१७०६); रजेवरून आलेल्या मराठे व गारदी लोकांच्या रोजमुऱ्याची, १५ ज. खर, सु. ११६९/२७ ऑक्टो. १७६८ (२१७१२); इमामबक्ष

**याद्या–चालू :**

या हत्तीच्या अंबारीच्या जिनसांची, सु. ११६७/इ. स. १७६६-६७ (२१७३५); हुसकोट येथे सखोजी जगताप याजकडील पागेतील जखमी झालेल्या लोकांवर केलेल्या खर्चाची, १९ जिल्काद, सु. ११६७/१९ एप्रिल १७६७ (२१७३६); काशी नारायण आचारी यास घरी जाताना द्यावयाचे कापडाची व ऐवजाची, ६ मोहरम, सु. ११६७/१४ जून १७६६ (२१७३९); जिवबा दातार यास घरी जाताना द्यावयाच्या खर्चाची व कापडाची, ६ मोहरम, सु. ११६७/१४ जून १७६६ (२१७४०); बाबा माहात याजकडील पागेतील लोकांना द्यावयाच्या रोजमुऱ्याची, २४ जिल्हेज, सु. ११६७/२३ मे १७६७ (२१७४१); मानसिंग रजपूत याजकडील पागेतील लोकांना द्यावयाच्या रोजमुऱ्याची, १४ मोहरम, सु. ११६७/२२ जून १७६६ (२१७४२); खंडेराव बर्गे याजकडील शिलेदारांची, १४ जिल्काद, सु. ११६७/१४ एप्रिल १७६७ (२१७४३); खंडेराव बर्गे याच्या पागेतील लोकांना द्यावयाच्या रोजमुऱ्याची, १३ जिल्हेज, सु. ११६७/१२ मे १७६७ (२१७४४); केदारजी घाटगे यांस द्यावयाच्या रोजमुऱ्याची, २८ ज. खर, सु. ११६५/२२ डिसेंबर १७६४ (२१७४८); जासूद जथ्यांना द्यावयाच्या रोजमुऱ्याची (२१७५१); फरासखान्याकडील लोकांच्या रोजमुऱ्याची, २ ज. खर, सु. ११६५/२६ नोव्हेंबर १७६४ (२१७५३); त्रिंबक खंडेराव याजकडील शिलेदारांच्या रोजमुऱ्याची, २१ ज. खर, सु. ११६५/१५ डिसेंबर १७६४ (२१७५६); उंटाच्या बेगमीसाठी द्यावयाच्या ऐवजाची, २८ ज. वल, सु. ११६२/२६ डिसेंबर १७६१ (२१७५९); नारो बल्लाळ याजकडील खासगीच्या लोकांना द्यावयाच्या रोजमुऱ्याची, ३० ज. खर, सु. ११६२/२६ जाने. १७६२ (२१७६१); दादासाहेब यांच्याकडे पाठवावयाच्या तबकड्याच्या ऐवजाची (२१७६४); थटीकडे गाईच्या झुलीस लागणाऱ्या सामानाच्या ऐवजाची, २३ ज. खर, सु. ११६५/१७ डिसेंबर १७६४ (२१७७८); तुकोजी नाईक बेरड याजकडील लोकांकडून गुन्हेगारीबद्दल घेतलेल्या ऐवजाची, १८ र. वल, सु. ११६५/१५ सप्टेंबर १७६४ (२१७७९); तोफखान्याकडे द्यावयाच्या ऐवजाची, २१ ज. खर, सु. ११६५/१५ डिसेंबर १७६४ (२१७८०); त्रिंबकेश्वर येथील घरास लागणाऱ्या सामानाची, २४ ज. खर, सु. ११६५/१८ डिसेंबर १७६४ (२१७८१); धनसिंग व मानसिंग खलाटे याजकडील पागेतील लोकांना धार्मिक विधीसाठी द्यावयाच्या ऐवजाची, १७ मोहरम, सु. ११६८/१५ जून १७६७ (२१७९८); १८ मोहरम, सु. ११६८/१६ जून १७६७ (२१७९९).

**रुमाल क्र. ४२, पुडके क्र. १ ते ४**

| | |
|---|---|
| **पुडके क्र. १** | **सु. स. ११७४–१२३१** |
| **का. सं. ५३ (२१८००–२१८५२)** | **इ. स. १७७३–१८३१** |

**आज्ञापत्रे :**

**पंतप्रधान** (माधवराव नारायण) – **गोपाळनाथ* :** गोपाळराव नाईक तांबवेकर याजकडून येणाऱ्या नजर ऐवजातून जयराम कृष्ण यास ऐवज देण्याबद्दल, सु. ११८२/इ. स. १७८१-८२ (२१८४२); –**नूरखान महंत :** अमृतराव बल्लाळ याजकडून मजमूचे कामकाज घेऊन वेतन व तैनातीप्रमाणे रोजमुरा देण्याविषयी, ७ सवाल, सु. ११८७/२ ऑगस्ट १७८६ (२१८४४); – **मोकदम, आले, बेल्हे, कर्डे व वावरद प्रां जुन्नर :** सुलतानपूर, करंदी व पिंपरी मावळ वगैरे ठिकाणच्या पागेकडे धान्य देण्याबद्दल, १२ सवाल, सु. ११९२/१५ जून

**आज्ञापत्रे–चालू :**

१७९१ (२१८३७); – **मोकदम, कानडी ता। मांडोगण :** महादाजी नारायण याजकडे मोकासा ऐवज देण्याबाबत आज्ञा, सु. ११८९/इ. स. १७८८-८९ (२१८४७); – **मोकदम, साकोरे ता। महाळुंगे :** सालाबादप्रमाणे घेतलेल्या गवताची कापण करून खेड येथे नेण्यासंबंधी, १८ र. खर, सु. ११८९/१५ जानेवारी १७८९ (२१८४८); – **महाळुंगे येथील मोकदम :** महाळुंगे येथील बाकी ऐवज नरहर कोंडदेव याजकडे जमा करण्याबद्दल, २८ रमजान, सु. ११९३/१० मे १७९३ (२१८४९); – **सूर्यदत्त* :** गोपाळ नाईक तांबवेकर याजकडून येणाऱ्या नजर ऐवजातून जयराम कृष्ण यास ऐवज देण्याबद्दल, सु. ११८२/इ. स. १७८१-८२ (२१८४३); – **हरसिंग व बुधसिंग**

**चाकणकर** : नेरली व अपसिंगे का। औंध येथील देशपांडे यांना हक्क रुसुमाच्या वराता ऐवजासंबंधी तगादा न करण्याबद्दल, २१ रमजान, सु. ११७८/१७ ऑक्टोबर १७७७ ( २१८४० ).

**मल्हारराव नरसिंह – मोकदम तांबवे प्रा कऱ्हाड** : तांबवे येथील बारा सालचे हिशेबाच्या चौकशीसंबंधी, ३ ज. खर, सु. ११८९/ १ मार्च १७८९ ( २१८४५ ) (नक्कल); तांबवे येथील पंधरा सालचे रुमाल देऊन कुलकर्णी यास जाबसालास पाठविण्याबद्दल, ३ ज. खर, सु. ११८९/१ मार्च १७८९ ( २१८४६ ).

**रामशास्त्री** (प्रभुणे) – **जानोजी खेत्रोजी वगैरे** : कोरेगांव येथील पाटीलकी वतनाचे कागदपत्र घेऊन पुण्यास येण्याबद्दल, सु. ११८२/ इ. स. १७८१-८२ ( २१८४१ ).

**इनामपत्रे :**

**माधवराव नारायण** (प्रधान)-**महादाजी नारायण अभ्यंकर** : कानूर पा पारनेर येथील दर्याजी बि तानबाजी व पुंजाजी बि गोदाजी याजकडील जमीन प्रापकास इनाम दिल्यासंबंधी, सु. ११७७/इ. स. १७७६-७७ ( २१८०७, २१८०८ ).

**कतबे :**

**जानोजी कान्होजी सावंत – पंतप्रधान** (माधवराव नारायण) : हरजी सावंताचे वस्तभाव आपल्याकडे नसल्याबाबत, वैशाख शु. १०, श. १६९७/१० मे १७७५ ( २१८२६ ).

**तुळाजी तुपे – पंतप्रधान** ( माधवराव नारायण ) : पिल्या महाराने राधा अकोलकर हिच्याकडे ठेवलेले दागिने सटवाजी घोगे याचे हवाला केल्याबद्दल, २१ र. वल, सु. ११७५ / २२ मे १७७५ ( २१८२४ ).

**रामचंद्र मालोजी जाधव – छत्रपति** (प्रतापसिंह) : करंदी, ता सातारा येथील देवस्थान खर्चासंबंधी गणपतराव नारायण जाधव सांगतील त्याप्रमाणे पुरवणी देतो म्हणून, ११ सफर, सु. १२३१/ १ ऑगस्ट १८३० ( २१८५२ ).

**सखूबाई भवानजी जगताप – पंतप्रधान** (माधवराव नारायण) : पूर्वीप्रमाणेच शिराळशेट याचा मानपान सुरळीत चालत असल्याबद्दल, ३ रजब, सु. १७७८/७ ऑगस्ट १७७७ ( २१८३० ).

**जामीन कतबा :**

**देवजी चिलोजी पाटील – पंतप्रधान** (माधवराव नारायण) : धामणी येथील मालजी शहाजी पाटील कालेलकर यास हजर करण्याबद्दल, ६ र. वल, सु. ११७५/७ मे १७७५ ( २१८५१ ).

**नाथोजी चौधरी – पंतप्रधान** (माधवराव नारायण) : हरी सावंत यांची स्त्री चिंगोजीराव यांनी पळविली नसल्याबद्दल, वैशाख व. ४, शके १६९७/१७ मे १७७५ ( २१८५० ).

**भिकाजी गोपाळ कारकून – पंतप्रधान** (माधवराव नारायण) : मौजे आनवल, पा यादवाड येथील कुलकर्णी यांना हजर करण्याबद्दल, २२ रजब, सु. ११८६/५ मे १७८६ ( २१८३४ ).

**जामीन कतबा–चालू :**

**श्रीनिवास आप्पाजी पाटणकर – पंतप्रधान** (माधवराव नारायण) : नारो गणेश बेहेरे यांच्या दरवड्यांत सापडलेल्या बापूजी केशव व देवराव शेळके यास हजर करण्याबद्दल, र. खर, सु. ११७५/जून-जुलै १७७४ ( २१८२७ ).

**हैबतराव रणवरे – पंतप्रधान** (माधवराव नारायण) : निंबाजी निंबाळकर शिलेदार यानी फितुरी केल्यास त्यास हजर करण्याबद्दल, १९ जिल्हेज, सु. ११७८/१९ जानेवारी १७७८ ( २१८३२ ).

**गोविंद हरी – पंतप्रधान** (माधवराव नारायण) : दादासाहेब व भोसले यांच्या फौजेच्या दंग्यात पा साखरखेडले येथील पाटील व गुरे धरून नेली त्यावर खर्चावयाचा ऐवज घेतल्यासंबंधी पुण्यास आल्यावर कळवू असे निवेदन, २० र. खर, सु. ११७५/३० जून १७७४ ( २१८३५ ).

**नारो संभाजी ताम्हणकर–पंतप्रधान** (माधवराव नारायण) : विठ्ठल देवधर यांच्याकडील गृहस्थ चौघांच्या गुजारतीने स्वाधीन करून घेतल्याबद्दल, फाल्गुन व. १०, शके १६९८/३ एप्रिल १७७७ ( २१८२८ ).

**बाबूराव पासलकर–पंतप्रधान** (माधवराव नारायण) : चोरट्यास आश्रय न देण्याबद्दल आंग्रे यास ताकीद करणे, २१ साबान, सु. ११९४/२४ मार्च १७९३ ( २१८३८ ).

**माधवराव नारायण–उधव वीरेश्वर** : विजयदुर्ग येथील पाटील, कुलकर्णी व तेली तांबोळी यांच्याकडून इनाम जमिनीचा ऐवज एकसाल सरकारात द्यावयाचा करार करण्याबद्दल, २८ जिल्काद, सु. ११७६/२० जानेवारी १७७६ ( २१८०४ ); **–चंडीदास रघुनाथ** : किल्ले सज्जनगडाकडे सरंजामास असलेल्या मोकासाबाबतचा अंमल सज्जनगडावर भरण्याबद्दल कमाविसदारास ताकीद करणे, २९ साबान, सु. ११९४/१ एप्रिल १७९४ ( २१८१७ ); **– चिंतामण माधवराव** : पा दरेनार येथील खंड गुन्हेगारी व स्वराज्य अंमलाचा कमाविसी हक्क नेहमी प्रमाणे चालू देण्याबद्दल, १० ज. खर, सु. ११७५/१८ ऑगस्ट १७७४ ( २१८०१ ); **–चिंतामणराव पांडुरंग** : प्रां मिरज येथील सरदेशमुख भास्करराव त्रिंबक यास सालाबादप्रमाणे ऐवज देण्याबद्दल, २२ ज. वल, सु. ११८८/१ मार्च १७८८ ( २१८१४ ); **–दादो गणेश कमाविसदार-जामखेड** : निजामअलीकडील पिंपळगांव, खर्डे, सावताडे, सोनगांव वगैरे गांवाची जप्ती करून वसूल सरकारात भरण्याबद्दल, १४ रजब, सु. ११९५/५ फेब्रुवारी १७९५ ( २१८२० ) (नक्कल); **–देशमुख, देशपांडे पा मोहळ** : मोहळपैकी कोतवाडी, कातोळे वगैरे येथील मोकाशाबाबतचा ऐवज पाठविण्याबद्दल, २९ साबान, सु. ११९४/१ एप्रिल १७९४ ( २१८१६ ); **–पांडुरंग जिवाजी** : महादाजी कृष्ण याजकडील मोहळ येथील मामलत मशारनिलेकडे सांगितल्याबाबत, सु. ११८७/इ. स. १७८६-८७ ( २१८१२ ); **–बाबूराव पासलकर** : किल्ले अवचितगडाकडील रसद ऐवजासंबंधी, सु. ११८१/इ. स. १७८०-८१ ( २१८१० ); **–बाबूराव शंकर** : पा नेवासेपैकी मोकाशासंबंधीचे हिशेबी कागदपत्रांच्या रवानगीबाबत, सु. ११८८/इ. स. १७८७-८८ ( २१८१५ ); **–बाळोजी निळोजी कमाविसदार** : मुंजेरी व माळी यांच्या जमिनीतील खाटकाचे घरची मुलाणकी सय्यद इमाम सय्यद कादर याजकडे पूर्ववत चालू देण्याबद्दल

**रुमाल क्र. ४२, पुडके क्र. १–जामीन कतबा–चालू :**

सूचना, २ साबान, सु. ११९५/२२ फेब्रुवारी १७९५ (२१८१८, २१८१९); **–भास्करभट वैद्य :** हैबतराव भवानी शंकर यांचे कमाविसदारास तांदुळवाडी व मोरगांव येथील सान्याविषयी दिक्कत न करण्याबद्दल, १ र. वल, सु. ११७५/२ मे १७७५ (२१८०३); **–मोरो हरी :** मोरो विश्वनाथ यास घर बांधण्यास परवानगी देण्याबद्दल, १९ जिल्हेज, सु. ११७५/२० फेब्रुवारी १७७५ (२१८००); **–रघुनाथ सदाशिव :** किल्ले रायगडावर बंदिस्त असलेल्या सखाराम भागवत यांच्या चोख बंदोबस्तासंबंधी, ७ र. वल, सु. ११८१/३ मार्च १७८१ (२१८०९) (नक्कल); **–रामचंद्र शिवाजी :** महिपतराव त्रिंबक यास सातारा मुक्कामी लागणाऱ्या खर्चास तसलमातीतून ऐवज देण्याबद्दल, २२ र. वल, सु. ११७५/३ जून १७७४ (२१८११); **–वासुदेव गणेश :** बापूजी हरी कारकून प्रां वसई यास वेतन ऐवज देण्याबद्दल, २६ ज. वल, सु. ११८८/· मार्च १७८८ (२१८१३); **–श्रीनिवास पंडित :** अतीत, ता उंब्रज, प्रां कऱ्हाड येथील पाटीलकीचा हक्क सुभानजी शहाजी याजकडे चालू ठेवण्याबद्दल, २ र. खर, सु. ११७६/२१ मे १७७६ (२१८०२) (नक्कल); **–सदाशिव मोरेश्वर :** आप्पाजी हरी याजकडील गारद्यास कल्याण-भिवंडीपैकी चौथ्या हप्त्यातून ऐवज देण्याबद्दल, १९ र. वल, सु. ११७६/१८ जून १७७५ (२१८०५); **–हवालदार व कारकून किल्ले अवचितगड :** तोतयापासून किल्याचा बंदोबस्त करण्याबद्दल, २४ रजब, सु. ११७७/८ सप्टेंबर १७७६ (२१८०६).

**मोकदम, तोरणे प्रां जुन्नर पंतप्रधान** (माधवराव नारायण) : कोळ्याचे फितुरीत आम्ही नसल्याचे मनास आणून आमची गुरे स्वाधीन केली ती पावल्यासंबंधी, १२ सफर, सु. ११७५/१३ एप्रिल १७७५ (२१८२३).

**रंगाजी गणेश–पंतप्रधान** (माधवराव नारायण) : दातेगड येथील वसूल घेऊन सत्वर येत असल्याबाबत, २ जिल्काद, सु. ११७४/१५ जानेवारी १७७४ (२१८२१).

**सखाराम विश्वनाथ का खेड शिवापूर–पंतप्रधान** (माधवराव नारायण) : खेड शिवापूर येथील रसद ऐवज घेऊन आज्ञेप्रमाणे सत्वर येत असल्यासंबंधी, १९ साबन, सु. ११८५/८ जुलै १७८४ (२१८३६); **–भास्करपंत नाना* :** शिकरापूर येथून चंदी व मेखा घेऊन तासगांवास रवाना केलेले बैल हनगल येथील जकातदाराने अडविले आहेत त्यास ताकीद करण्याबद्दल, १० जिल्हेज, सु. ११९२/११ ऑगस्ट १७९१ (२१८३९).

**मुचलका :**

**राणोजी व तुकोजी पाटील मौजे-हिवरडी पा रोशनगोली–पंतप्रधान** (माधवराव नारायण) : मानसिंग पाटील व प्रापकाच्या मौजे हिवरडी येथील वतनाबाबतच्या पंचायतीस हजर राहाण्याबद्दल, ८ सवाल, सु. ११७५/१२ डिसेंबर १७७४ (२१८२२).

**राजीनामा :**

**नूरखान बगसारभाई खटावकर–पंतप्रधान** (माधवराव नारायण) : खातगुणच्या उरसाच्या कजियासंबंधीच्या पंचायतीस मोरगांवी हुजूर येण्याविषयी, २२ साबान, सु. ११८८/९ जून १७८७ (२१८२५).

**साक्षीपत्र :**

**महादजीराम* – पंतप्रधान** (माधवराव नारायण) : बैलावरील ओझे (तांबे, तपेले वगैरे) कोणी घेतले हे ठाऊक नसल्याबाबत, ७ जिल्हेज, सु. ११७८/७ जानेवारी १७७८ (२१८३१).

**हमीपत्रे :**

**गोविंद कृष्ण फाटक – पंतप्रधान** (माधवराव नारायण) : गोपाळराव लक्ष्मण याजकडील वऱ्हाड येथील मामलती चौकीसंबंधी, हुंडाभाडा ऐवजाची, कार्तिक व. ११, शके १७०२ / २२ नोव्हेंबर १७८० (२१८३३).

**दत्तात्रय विठ्ठल रास्ते – पंतप्रधान** (माधवराव नारायण) : किल्ले धारवाड येथे चाकरीस असलेल्या नीळकंठ चांदजी चव्हाण याजकडून सरकार कार्यात अंतर होणार नसल्याबद्दल, मार्गशीर्ष शु. ९, शके १६९९/९ डिसेंबर १७७७ (२१८२९).

---

**रुमाल क्र. ४२, पुडके क्र. २** **सु. स. ११७४–११९८**
**का. सं. १०९ (२१८५३–२१९६१)** **इ. स. १७७३–१७९७**

**चिठ्या** (सरकारी) :

**[फक्त प्रापकांचा उल्लेख असलेल्या]**

खालील सर्व चिठ्या कृष्णराव गंगाधर कमाविसदार प्रां नासिक यांना लिहिल्या असून त्यामध्ये पागेकडे गला (धान्य) देण्याबाबतचा तपशील आहे. सर्व चिठ्यांचा काल १७८७–१७८८ असा आहे. कोणाकडील पागेकरितां चिठ्ठी लिहिली आहे त्याचे नांव लिहून नंतर पत्र क्रमांक दिले आहेत.

**गोविंदराव सदाशिव** (२१९३७–२१९४२, २१९४५–२१९४८); **रामचंद्र शिवाजी** (२१९४३, २१९४४, २१९४९–२१९५१).

उष्टरखान्याकडे वैरण पुरविण्याबाबत नारो शिवराम यास, १७९२-१७९३ (२१९६०); पीलखान्याकडे गवत वगैरे पुरविण्याबाबत शिवराम रघुनाथ यास, सु. ११८५/१७८४-८५ (२१८५३–२१८५७); सु. ११८५–११९६/१७८४–१७९५ (२१९५२–२१९५९, २१९६१); पागेकडे वैरण पुरविण्याबाबत शिवराम रघुनाथ यास, सु. सन ११८४–११८६/१७८३–१७८५ (२१९३०–२१९३६).

**पत्रे :**

**अमृतराव सहस्रबुद्धे – महादेवभट* :** विसाजी हरि याजकडून कर्जाऊ येणे असलेल्या ऐवजापैकी कांही ऐवजाची फेड आपण करीत असल्याबाबत, कार्तिक शु. ५, शके १६९७/२९ ऑक्टोबर १७७५ (२१८६५).

**आनंदराव कोंडाजी–लक्ष्मणपंत सुभेदार :** किल्ले चोल्हेर येथील १७६९-७० चा ऐवज पावल्याबाबत, ३ र. खर, सु. ११७४/२४ जून १७७३ (२१८६७).

---

* संपूर्ण नांवाचा उल्लेख नाही.

रुमाल क्र. ४२, पुडके क्र. २–पत्रे–चालू :

**आनंदराव धुळप – बाईसाहेब** (गंगाबाई) (नारायणराव पेशवे यांची पत्नी) : जंजिरे विजयदुर्ग येथील १७७२-७३ चे हिशेब घेऊन कारकून रवाना, १० र. वल, सु. ११७४/२२ मे १७७४ (२१८६३).

**कृष्णा मालकरी – भास्करपंत नाना*** : नरसो आनंदराव याजकडून कसबे होनवली तालुके सावनूर येथील सबनिसीचे काम करवून घेण्याची विनंती, आश्विन शु. १५, सु. ११९२/११ ऑक्टोबर १७९१ (२१९२८).

**केशव सदाशिव काळे – भास्करपंत मामा*** : खाजगत कर्ज ऐवज व नालबंदी ऐवज या संबंधीच्या व्यवहारासंबंधी सूचना, २४ र. वल, सु. ११९२/२१ नोव्हेंबर १७९१ (२१९२६).

**गोविंदराव भगवंत–शिवरामपंत*** : भवानराव निंबाळकर याजबाबत दरबार खर्चीचे दोन हजार रुपये गैर विल्हेस लागल्यामुळे ते गोविंदपंत आपटे याजकडून घेणेसंबंधी, २५ जिल्हेज, सु. ११८९/२६ सप्टेंबर १७८८ (२१९२४).

**गोविंद यादव–भास्करपंत नाना*** : हरबा आप्पा पायगुडे यास प्रेषकाच्या नालबंदी व रोजमुरे ऐवजाबाबतच्या वरातेतून ऐवज देणे, २८ जिल्हेज, सु. ११९२/२२ ऑगस्ट १७९१ (२१९२५).

**नरसिंगराव बल्लाळ–बहिरो रघुनाथ** : सरकार वरातेप्रमाणे धोंडी मल्हार पानसे यास ऐवज सुपूर्द, १२ रमजान, सु. ११८०/२३ सप्टेंबर १७७९ (२१८८३).

**नीळकंठ रामचंद्र–जनार्दनपंत*** : कोळी प्रकरणांत हरजी सावंत याची मुले माणसे आणली होती ती पांडुरंग कृष्ण याजकडे चौकशी करून परत पाठविण्याबद्दल, ९ र. वल, सु. ११७५/१० मे १७७५ (२१९२०). – **पांडुरंग कृष्ण** : हरजी सावंत याचे कुटुंबातील माणसांची चौकशी लखमोजी याच्या गुजारतीने केल्यासंबंधी, ९ र. वल, सु. ११७५/१० मे १७७५ (२१९२१).

**बाबूराव सदाशिव–महिपतराव*** : मौजे लोधवड कर्यात मलवडी येथील पाटीलकीवर दावा सांगणाऱ्या राणोजी व शेट्याजी यांना निवाड्याकरितां सासवड येथे पाठवून देणे, १३ साबान, सु. ११७८/१६ सप्टेंबर १७७७ (२१९१६).

**बाळंभट थत्ते–नाना*** : जुन्नर येथील वहिवाटीचा हिशेब व यादी तपशील पाठविण्यास उशीर झाला त्याची कारणे, माघ शु. ३, सु. ११७४/१५ जानेवारी १७७४ (२१८६१).

**बालाजी नारायण परांजपे–रामजीपंत लिमये** : कुशल पत्रोत्तर करण्याची विनंती, ३ र. खर, सु. ११८६/२१ फेब्रुवारी १७८६ (२१९२७).

**भिकाजी नारायण–कृष्णाजीपंत*** : चोवीस हाती पासोड्या १५ आणे दराप्रमाणे रवाना, ७ जिल्काद, सु. ११९२/९ जुलै १७९१ (२१९२९).

**महादाजी विठ्ठल शिंत्रे–श्रीपत रघुनाथ टकले** : बेलापूर येथील फाजील ऐवजातून प्रापकास रदकर्ज ऐवजाची चिठ्ठी दिल्याबद्दल, मार्ग व. ७, शके १७०८/१२ डिसेंबर १७८६ (२१९२३).

पत्रे–चालू :

**मोरो बल्लाळ कोल्हटकर–राघोपंत नाना*** : तालुके पटा येथील मामलत रामचंद्र नारायण याने सोडल्यामुळे तेथील व्यवहाराबाबत योग्य ती चौकशी करण्यासंबंधी, ९ र. वल, सु. ११९५/२४ ऑक्टोबर १७९४ (२१८७०).

**रघुनाथ बाजीराव–महादजी शिंदे** : झांशी व ग्वाल्हेर तालुक्यातील गोहजकरांच्या उपद्रव शमनार्थ रघुनाथ हरी व गोपालराव नारायण यांस पाठविण्याविषयी, ७ साबान, सु. ११७४/२४ ऑक्टोबर १७७३ (२१८७१).

**रघुनाथ बाबूराव–भास्करपंत नाना*** : तालुके सावनूर येथील भरणा करण्याकरितां त्वरित निघून येण्यास आपल्या काय अडचणी आहेत त्यांचे निवेदन १५ सवाल, सु. ११९२/१८ जून १७९१ (२१८६८).

**श्रीनिवास गंगाधर प्रतिनिधी–कमाविसदार निा भापकर गो होसूर** : बाजी मोरेश्वर यास चंदी व रोजमुऱ्याकरितां ऐवज देणेबाबत, ४ ज. वल, सु. ११७६/३ जुलै १७७५ (२१८७४); – **भगवंत सिद्धनाथ** : तिकोटे वगैरे महालातील बाबती ऐवजातून बाजी मोरेश्वर यास चंदी, रोजमुरे वगैरेकरिता ऐवज देण्याबद्दल ४, ज. वल, सु. ११७६/ ३ जुलै १७७५ (२१८७५).

**[फक्त प्रेषकांचा नामोल्लेख असलेली पत्रे]**

**बाबूराव कृष्ण पेठे**–(—) : रसद ऐवजाची तरतूद करीत असल्याबाबत, मार्गशीर्ष शु. ८, सु. ११८८/१८ डिसेंबर १७८७ (२१८६६).

**रघुनाथ सदाशिव**– (—) : जिन्नस पाठविले त्याची पोच द्यावी म्हणून, सु. ११८९/इ. स. १७८८–८९ (२१८६७).

**[फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेली पत्रे]**

(—) – **आप्पाजी महादेव** : नरसिंगराव व आप्पा देशपांडे याजमधील ऐवजाच्या देवाण घेवाण व्यवहारासंबंधी, २७ मोहरम, सु. ११८०/४ फेब्रुवारी १७८० (२१९२२).

(—) – **गणेश भिकाजी** : मल्हारी जगताप कर्यात सासवड याच्या जमीन तक्रारी बाबत योग्य ती चौकशी करून गावकऱ्यास ताकीद देणे, ११ रजब, सु. ११८६/१० मे १७८६ (२१९१९).

(—) – **बालाजीपंत भाऊ*** : गुजराथ, खानदेश व हिंदुस्थान सोडून बाकी महालाचा वसूल पुण्याहून करण्याबाबत, १२ सफर, सु. ११७५/१३ एप्रिल १७७५ (२१८६४).

(—) – **सखोपंत स्वामी*** : बहिरजी नारायण व अमृतराव भवानजी जगताप, कमाविसदार सासवड यांच्या गावगन्ना हक्काच्या लव्याबाबत माहिती देणे, ११ सवाल, सु. ११८५/२८ ऑगस्ट १७८४ (२१९१८).

**यादी** :

तालुके विजयदुर्ग येथील कांही ठिकाणावरील उगवणीच्या हक्काबाबत बाजीभट जिवभट पाटणकर व सदाशिव नारायण भुस्कुटे वगैरे मधील तंट्यांत पाटणकर याजसारखा निकाल देणाऱ्या तपशिलाची, सु. ११७९/इ. स. १७७८-७९ (२१९१७).

**रुमाल क्र. ४२, पुडके क्र. २–यादी** (करार) :

पाा उमरखेड व म्हसे येथील मामलात कृष्णाजी अनंत तांबे यांनी करण्याबाबत, आश्विन शु. १, सु. ११७४ / १७ सप्टेंबर १७७३ (२१८६२).

**यादी** (विनंती) :

यात्रेस जाण्याकरितां ज्या लोकांना साहित्यपत्र लिहिणे, त्या लोकांची (मदत करण्याबाबत) (२१८५८).

**यादी** (हिशेब) :

अप्पाजीपंत याजकडून गंगाप्रसाद यास निरनिराळ्या महिन्यात ऐवज मिळाला त्याचे तपशिलाची (२१८५९).

**वराता :**

पुढील बहुतेक सर्व वराता पेशवे सरकारातून काढण्यात आल्या आहेत. प्रथम ज्या व्यक्तीवर वरात काढण्यात आली त्या व्यक्तीचे नाव देऊन नंतर तपशील व शेवटी तारीख देण्यात आली आहे. **– अप्पाजी महादेव, कमाविसदार मौजे तांबवे प्रांत कऱ्हाड :** तांबवे येथील रसद ऐवज त्रिंबक महिपत यास देणे, १ सवाल, सु. ११७४/ १६ डिसेंबर १७७३ (**२१८७२**); **– अंताजी मोरेश्वर :** वासुदेव कर्वे याच्या कर्ज ऐवजापैकी कृष्णाजी केशव याजकडील कारकुनास रोजमुरा ऐवज देणे, १८ र. खर, सु. ११८० / ३ जुलै १७७९ (**२१८८२**); **– आनंदराव विश्वनाथ :** प्रांत जुन्नर येथील रसद ऐवजातून आनंदराव शिंदे याजकडील लोकांस रोजमुरा देणे, १० मोहरम, सु. ११९२/ ९ सप्टेंबर १७९१ (**२१८९५**); २६ साबान, सु ११९२/१९ एप्रिल १७९२ (**२१८९६**); रसद ऐवजातून संताजी यास नालबंदी ऐवज देणे, २३ साबान, सु. ११९३/५ एप्रिल १७९३ (**२१८९७**); **– केशव कृष्ण गोसावी, भिकाजी रघुनाथ, बायाजी गोसावी, सदाशिव अप्पाजी :** गोपाल नाईक तांबवेकर याजकडील नजर ऐवजाकरिता त्याचे प्रापकाकडील कर्जातून सरकारात ऐवज देणे, सु. ११८२/ इ. स. १७८१-८२ (**२१८८६–२१८८८**); सु. ११८० /इ. स. १७७९-८० (**२१८८४**); **– कृष्णराव महिपत :** कडूस ताा खेड प्रांत जुन्नर येथील रसद ऐवजातून यशवंतराव ताकपीर यास नालबंदी, १७ र. वल, सु. ११९५/१२ ऑक्टोबर १७९४ (**२१९११**); करीमखान शिलेदारास रोजमुरा, १७ रजब, सु. ११९७/२१ जानेवारी १७९६ (**२१९१२**); महिपतराव कवडेस नालबंदी, ११ जिलकाद, सु. ११९७/ १९ मे १७९६ (**२१९१३**); संभाजी पोळ शिलेदारास रोजमुरा, १० रजब, सु. ११९६/२१ जानेवारी १७९६ (**२१९१४**); गोपाल भगवंत कारकुनास मोईन, ४ र. वल, सु. ११९६ / १८ सप्टेंबर १७९५ (**२१९१५**); **– गोविंद काशिनाथ :** कमाविसदार बीड व पाथरी, रसद ऐवजातून गंगाधर गणेश याजकडील खासदार व वाजे लोकास नालबंदी, २५ ज. खर, सु. ११९४/२८ जानेवारी १७९४ (**२१८९९**); अहमद याजकडील गारद्यास रोजमुरा, २९ र. खर, सु. ११९४/ ४ डिसेंबर १७९३ (**२१९०१**); उंट खरेदीकरितां सौदागर यास, १० ज. खर, सु. ११९४/१३ जानेवारी १७९४ (**२१९०२**); हशेबंदी ऐवजातून हुजूरकडील हशाम लोक स, १ र. खर, सु. ११९५/ २६ ऑक्टोबर १७९४ (**२१९०३**); २५ मोहरम, सु. ११९५/ २२ ऑक्टोबर १७९४ (**२१९०४**); **– गोपाळराव भिकाजी :** हशेबंदी ऐवजातून शिवराम रघुनाथ यास ऐवज देणे, ८ रमजान, सु. ११८९/ १३ जून १७८८ (**२१८८९**); **– जनार्दन व्यंकाजी :** गोपाळ नाईक

**वराता–चालू :**

तांबवेकर याचे प्रापकाकडील कर्जातून जयराम कृष्ण यास ऐवज देणेबाबत, सु. ११८०/इ. स. १७७९-८० (**२१८८५**); **– दामोदर पांडुरंग, हवालदार ताा अवसरी :** खर्चपट्टी ऐवजातून दप्तराकडील जासुदांचा रोजमुरा ऐवज देणे, ३० ज. वल, सु. ११७७/१७ जुलै १७७६ (**२१८७६**); **– नारो बल्लाळ, कमाविसदार पोा खेड :** रसद ऐवजातून शिलेदारास नालबंदी देणे, १७ ज. खर, सु. ११७७/३ ऑगस्ट १७७६ (**२१८८०**); **– पांडुरंग कृष्ण :** रसद ऐवजापैकी दहा हजारांचा ऐवज पुण्यात पोता जमा, ४ ज. खर, सु. ११७७/२ जुलै १७७६ (**२१८७८**); **– बलवंत त्रिंबक व नीलकंठ महादेव :** खुर्दाचे टांकसाळी बाबत येणे ऐवजातून रामचंद्र कृष्ण याजकडील मुल्हेर येथील बेगमीस, १२ सवाल, सु. ११९२/१५ जून १७९२ (**२१९००**); **– भवानी शंकर हैबतराव :** प्रांत वाई येथील नेमणूक खर्चातून जासूद जथे यांचा रोजमुरा देणे, ११ रमजान, सु. ११९५/२ एप्रिल १७९५ (**२१९०५**); **– भास्कर सखदेव :** बाकी ऐवजातून शिलेदारांचा रोजमुरा देणे, १९ मोहरम, सु. ११९२/१८ सप्टेंबर १७९१ (**२१८९४**); **– मेघःशाम अप्पाजी :** कमाविसदार पोा बेलगी, रसद ऐवजातून खंडोजी व सेट्याजी याजकडील प्याद्यास रोजमुरा देणे, २६ र. वल, सु. ११७५/७ जून १७७४ (**२१८७३**); **– मोरो सदाशिव :** नजर ऐवजापैकी चिंतो विश्वनाथ यास रदकर्जाकरिता ऐवज देणे, ३० ज. वल, सु. ११७७/१७ जुलै १७७६ (**२१८७७**); **– रामचंद्र आबाजी :** फौजेचे खर्चास दिलेल्या ऐवजातून फडतरे यास घोड्याची किंमत देणेबाबत, ११ सवाल, सु. ११९५/२१ एप्रिल १७९५ (**२१९०६**); तसलमतीचे ऐवजातून गोपाळराव धोंडदेव याजकडील पथकातील लोकास, ११ सवाल, सु. ११९५/१ मे १७९५ (**२१९०७**); प्रापकाकडील कर्जाच्या ऐवजातून सदाशिव चिंतामण यास, देवराव पिसाळ व बाजीराव गोविंद यास ऐवज देणे, ११ सवाल, सु. ११९५/१ मे १७९५ (**२१९०८ – २१९१०**); **– रामचंद्र गोपाळ :** कर्जाऊ ऐवजातून संताजी व कृष्णाजी ताटे यास नालबंदी ऐवज देणे, २२ साबान, सु. ११६८/ १२ मार्च १७६८ (**२१८७९**); **– लक्ष्मण खंडेराव, कमाविसदार पांडुरली पाा नासिक :** रसद ऐवजातून शेख रहिमान यास उंट खरेदीचा ऐवज, २८ ज. वल, सु. ११९०/१३ फेब्रुवारी १७९० (**२१८९१**); हशेबंदी ऐवजातून बालाजी महादेव यास बेगमी करिता, २० रमजान, सु. ११९०/१५ जून १७८९ (**२१८९२**); **– वासुदेव दामले :** चिपळूण वगैरे गावांतील खोतीचे उत्पन्नातून चिमणाजी हरि यास ऐवज देणे, ८ जिलकाद, सु. ११९३/ २९ जून १७९२ (**२१८९८**); **– विठ्ठल नारायण :** दहिवेल येथील मामलतीचे हिशेबात सरसुभ्याकडे खर्ची न पडलेल्या ऐवजाबाबत, १२ ज. वल, सु. ११९४/१६ डिसेंबर १७९३ (**२१८६९**); **– विष्णू महादेव :** मौजे आलकुटी ताा कर्डे प्राा जुन्नर येथील रसद ऐवजातून गारदी यांचा रोजमुरा देणे, २१ ज. खर, सु. ११९२/१५ फेब्रुवारी १७९२ (**२१८९३**); **– व्यंकटराव महादेव :** कमाविसदार पोा गांडापूर, रसद ऐवजातून धोंडो महादेव यास बेगमीकरिता ऐवज देणे, १३ रजब, सु. ११९०/३० मार्च १७९० (**२१८९०**); **– शंकराजी बोरेश्वर :** फुटगाव येथील कमाविशी ऐवजातून रामचंद्र व्यंकटेश याजकडील प्याद्यांचे रोजमुरा ऐवज देणे, २ ज. खर, सु. ११८०/ १७ जून १७७९ (**२१८८१**).

* संपूर्ण नांवाचा उल्लेख नाही.

**रुमाल क्र. ४२, पुडके क्र. ३** — **सु. स. ११६८–११९७**

**का. सं, ११६ (२१९६२-२२०७७)** — **इ. स. १७६७–१७९६**

**इनाम पत्र :**

**सिदोजी व द्वारकोजी घाटगे–कृष्णाजी काळभोर :** सुभानजी राणोजी भोसले यांच्याशी सविड येथील पाटीलकीबाबत असलेल्या तंट्यासंबंधी, ९ र. खर, सु. ११८७/२९ जानेवारी १७८७ (२२००५).

**कर्जरोखा :**

**गणेश भवानी–व्यंकटराव बापू देशपांडे :** घेतलेल्या कर्जाची व्याजासहित फेड करू म्हणून दिलेला वायदा, २७ साबान, फ. १२०५/८ मार्च १७९६ (२२००४).

**मोकदम बागाईतखुर्द–केशवराव गोविंद :** घेतलेल्या कर्जाचा व्याजासहित वायदा, आषाढ शु. १, शके १७०२/३ जुलै १७८० (२२००३).

**कबज :**

**जोहरीदास पांडे-सदाशिव आप्पाजी :** ऐवज मिळाल्याबाबत, मार्गशीर्ष शु. १०, शके १७१६/२ डिसेंबर १७९४ (२१९८८).

**धर्नासिंग रजपूत–रावसाहेब* :** बागलकोट येथील लोकांचा हिशेब यशवंतराव विठ्ठल याजकडे दिल्याबाबत, १० ज. खर, सु. ११७९/५ जुलै १७७८ (२१९८०) (नक्कल); जिन्नस मिळाल्याबाबत, फ. ११७७/इ. स. १७६७-६८ (२१९८२).

**कतबे :**

**उदाई धनवट–रावसाहेब* :** बच्याजी सावंत याची बायको प्रेषकाचे घरी असताना तिचे वडील तिला घेऊन गेले त्यासंबंधी, वैशाख शु. ११, फ. ११८४/११ मे १७७५ (२१९७६).

**आप्पाजी व महादजी पाटील पोमणे–सिदोजी मल्हारजी बोरकर :** पिंपळे येथील मिराशीच्या शेताबद्दल असलेल्या तंट्याविषयी, सु. ११७६/इ. स. १७७५-७६ (२२०००, २२००१).

**मोकदम आसेखेडे बा–रावसाहेब* :** कोळ्यांचे दंग्यात सामील झालेल्या लोकांची मुले माणसे व गुरे ढोरे राजमाचीस नेलेली माघारी कुणी आणली ते ठाऊक नसल्याचे, २४ सफर, सु. ११७५/२५ एप्रिल १७७५ (२१९७४).

**मोकदम करंजे–रावसाहेब* :** कोळ्यांच्या दंग्यांत खंडू कुणबी सामील झाला होता तो पळून गेला व त्याची गुरे, वस्तभाव राजमाचीस नेलेली परत माघारी कोणी आणली ते ठाऊक नसल्याचे, २४ सफर, सु. ११७५/२५ एप्रिल १७७५ (२१९७३).

**मोकदम कारखेल–सखोपंत* :** ऐवज देण्याचा वायदा, ६ रमजान, सु. ११७१/२४ डिसेंबर १७७० (२१९९५).

**मोकदम तोरणे खुर्द–रावसाहेब* :** कोळ्यांचे बंडात सामील असलेल्यांना हजर करून देऊ म्हणून, १२ सफर, सु. ११७५/१३ एप्रिल १७७४ (२१९७८).

**मोकदम सेळू–रावसाहेब* :** कोळ्यांचे दंग्यात गावातील कोणीही सामील झाले नसल्याचा, २४ सफर, सु. ११७५/२५ एप्रिल १७७५ (२१९७५).

**कतबे–चालू :**

**येसाजी राऊत–नारोपंत नाना* :** प्रापकाकडे पाठविलेल्या घोड्यांबद्दल, १३ र. वल, सु. ११७५/१४ मे १७७५ (२१९८१).

**सिदोजी पाटील–नारोपंत नाना* :** हवाल्याचा ऐवज बळवंतराव नागनाथ यांजकडे दिल्याबद्दल, आश्विन व. १२, शके १७१६/२० ऑक्टोबर १७९४ (२१९९७).

**जबानी :**

**देवजी राघोजी – (—) :** हरजी सावंत कोळ्यांकडे चाकरीस असल्याबाबत, वैशाख शु. १२, शके १६९७/१२ मे १७७५ (२१९९९).

**जामीन कतबा :**

**कान्होजी पाटील–रावसाहेब* :** रामजी कडूसकर याचे बंडात चाकरी करण्यास साबाजी सावंत गेले असतील तर ते गुन्हेगार ठरतील व त्यांजकडून जाब घेणे विषयी, २४ सफर, सु. ११७५/२५ एप्रिल १७७५ (२१९७२).

**गोविंदराव हंसाजी–रावसाहेब* :** बाग्या सावंत याचा भाऊ पळून गेल्याबद्दल भिवजी सावंत यास हजर करून देऊ म्हणून, चैत्र व. ८, श. १६९७/२३ एप्रिल १७७५ (२१९७९).

**मोकदम आमोडी–सुभेदार* :** सिरसुले गावच्या लावणीसंबंधी, ९ र. खर, सु. ११८९/६ जानेवारी १७८९ (२१९९१).

**यमाजी आबाजी तेली–रावसाहेब* :** रामजी कडूसकर याच्या बंडात मल्हारी तेली सामील असल्याने त्याची बायको व मुले आज्ञेनुसार हजर करू, चैत्र व. ८, शके १६९७/२३ एप्रिल १७७५ (२१९७७).

**सोमाजी सावंत-रावसाहेब* :** संभाजीगीर याची जकात कडूसकर यांच्याकडे गेली हे शाबीत झाल्यास संभाजीस हजर करून देऊ म्हणून येस पाटील सावंत याची हमी, २४ सफर, सु. ११७५/२५ एप्रिल १७७५ (२१९७१).

**[फक्त प्रेषकाचा उल्लेख असलेली]**

**कृष्ण जोशी – (—) :** आप्पाभट परांजपे यांचे कर्ज धोंडो बल्लाळ खेडकर फेडतील म्हणून, र. वल, सु. ११७७/एप्रिल, मे १७७७ (२१९९०) (मसुदा).

**तैनात जाबता :**

गोपाळराव बापूजी यांचे पागेकडील मजमूचे कामकाज बाळाजी गोविंद याजकडून करवून घेण्याबद्दल, १४ जिल्हेज, सु. ११८१/११ डिसेंबर १७८० (२२००२).

**पत्रे :**

**आनंदराव व नरहर गोपाळ–कृष्णाजी बेहरे :** जगन्नाथ गणेश कानिटकर हे कर्जाची व्याजासहित फेड करतील म्हणून आश्वासन, आषाढ शु. १, शके १७१२/१३ जुलै १७९० (२१९९२) (नक्कल).

**कृष्णाजी बल्लाळ–सुभानजी व मुकुंदजी टोके :** नांदूरकरांच्या करारावद्दल मिळालेल्या पोटगीची चौकशी, १६ र. वल, सु. ११९३/२ नोव्हेंबर १७९२ (१२०३७).

रुमाल क्र. ४२, पुडके क्र. ३–पत्रे–चालू :

**कृष्णाजी भीमराव–भास्करपंत*** : ऐवजाच्या जाबसालासाठीं गोविंदरावाची रवानगी, १९ सवाल, सु. ११९२/२२ जून १७९१ (२२०७७).

**गणेश जावजी–सर्वत्र मंडळी*** : आवरोहकरांशी तळावी येथे होणारा जाबसाल, ११ साबान, फ. १२०५/२१ फेब्रुवारी १७९६ (२१९७०).

**देशमुख देशपांडे, सासवड–सेटे व महाजन** : महादेवाच्या काठी यात्रेसाठी द्यावयाच्या ऐवजाचा खुलासा, १९ मोहरम, सु. ११७४/१ एप्रिल १७७४ (२२००६);– **संभू मेहता** : काशी येथून आलेल्या माणकू गुरव यास पागोटे देण्याबद्दल, २६ सफर, सु. ११७४/८ मे १७७४ (२२००७); पंतप्रधानास (माधवराव नारायण किंवा नारायणराव) भेटीसमई तिवट देण्याविषयी, १६ र. वल, सु. ११७४/२८ मे १७७४ (२२००८); बापूजी लक्ष्मण पुरंदरे यांची आई, आजी व भाऊ भावजय यांना द्यावयाच्या वस्त्रांबद्दल खुलासा, २३ सफर, सु. ११७४/५ मे १७७४ (२२००९).

**नागो जगन्नाथ–लक्ष्मणपंत बाबा*** : नेमणुकीस असलेल्या गल्याची पोंच, ४ सफर, सु. ११७७/१४ मार्च १७७७ (२२०१५).

**नारो गोपाळ अभ्यंकर–कृष्ण जोशी** : बाजीपंत अभ्यंकर यांचेकडे ऐवज द्यावा म्हणून, पौष शु. २, शके १७०४/५ जानेवारी १७८३ (२१९८६).

**बाजी महादेव व मल्हार दादाजी–रामचंद्र आबा*** : किल्ले चाकण येथील शिबंदीकडील नेमणुकीचे कांहीं लोकांस साष्टीस रवाना करण्याबद्दल, १० सवाल, सु. ११७५/१४ डिसेंबर १७७४ (२२०६३).

**भिकाजी आप्पाजी–गिरजोजी बर्वे** : कलबकर यांनी कापून ठेवलेले गवत मलबारीचे खळ्यासमोर रचून ठेवणे, १९ र. वल, सु. ११८९/१८ डिसेंबर १७८८ (२२०२६).

**माधवराव कृष्ण–बहिरो रघुनाथ** : तोफखान्याकडील पागेस चंदी देण्याबद्दल, २९ ज. वल, सु. ११८०/१५ जून १७७९ (२२०४१).

**मालोजी माझेरे–बाळाजीपंत दादा*** : तलवडेकर महादजी हगवणे सेरीकर याजकडील कडब्याचे माप दिल्यानंतर तो भिजल्यामुळे भिकाजी गाडीवान व ठाकूरसिंग यांचा कडबा घेण्यास नकार त्याबद्दल आज्ञा करण्याची विनंती, ४ रजब, सु. ११९०/२१ मार्च १७९० (२१९६४).

**मोकदम कणेरसर–गुंजाळ** : हवाल्याच्या ऐवजाची पोंच (२१९८७).

**यशवंतराव रामचंद्र–बापू*** : भिवजी पानबंद व राणोजी शेलार यांचा द्यावयाचा रोजमुरा, १७ साबान, सु. ११८५/६ जुलै १७८४ (२२०४९).

**येसाजी गोविंद–नानाजी तागडे व मोकदम आबटी** : तट्टू खरेदीसंबंधी व येसाजी पाडाला याजवळ दिलेल्या ऐवजाचा तपशील, २८ सफर, सु. ११९२/२७ ऑक्टोबर १७९१ (२२०७५).

**रामचंद्र अभ्यंकर–संतसेठ*** : वर्षासनाच्या ऐवजाची पोंच, जेष्ठ व. १३, शके १६८९/२४ जून १७६७ (२१९८३).

पत्रे–चालू :

**रामशास्त्री(प्रभुणे)–मोरोपंत*** : चिटकोबा व बाजी नाईक सरदेसाई यांच्या वतनाच्या फडशाबाबत निघालेल्या बाकीसंबंधी हरि वामन सांगतील त्याप्रमाणे वर्तन करतील म्हणून, ११ र. खर, सु. ११७६/३० मे १७७६ (२१९६२).

**रामाजी शामराज–निळो रघुनाथ** : मुलतानजी लांबहाते यांजकडून ऐवज मिळाल्याचे, श्रावण शु. ५, शके १६९९/८ ऑगस्ट १७७७ (२१९८४); श्रावण शु. १४, शके १६९९/३१ ऑगस्ट १७७७ (२१९८५).

**लक्ष्मण मुकुंद व कचेश्वर बाळाजी–देशमुख देशपांडे परगणे अंतूर** : खिसापूर व सक्रीपूर येथे भिल्लांचा दंगा म्हणून निवेदन व त्यांच्या बंदोबस्ताबद्दल (२२०७४).

**श्रीनिवास नारायण–इंदोली येथील इनामाचे वाटेकरी** : आप्पाजीपंत यांजकडे दिलेल्या इनामाच्या ऐवजाची पावती घेण्याबद्दल, ३ सवाल, सु. ११७६/२७ नोव्हेंबर १७७५ (२२०१४).

**सटवाजी घोगे–पांडुरंगपंत*** : रामजी कडूसकर यांचे बंडात तर्फ वाडेपैकी कोणी सामील असल्यास त्यांना हजर करून देऊ म्हणून आश्वासन, चैत्र व. १०, शके १६९७/२५ एप्रिल १७७५ (२१९८९); रामजी कडूसकर यांजकडील कुळे धरली त्यांची वस्तवाणी आज्ञेनुसार देऊ म्हणून, चैत्र व. १०, शके १६९७/२५ एप्रिल १७७५ (२१९९४).

**सदाशिव गोविंद केळकर–नरसोपंत दादा*** : व्यंकटराव यांजवळ दिलेला ऐवज आबाजीपंत नेने यांजकडे द्यावा म्हणून (२२०१८).

**सर्वोत्तम शंकर–रामचंद्रपंत आबा*** : नारो महादेव याजकडील तालुके त्रिंबक येथील वहिवाटीच्या बेहड्यासंबंधी, १ साबान, सु. ११७६/२७ सप्टेंबर १७७५ (२२०६६).

[फक्त प्रेषकांचा नामोल्लेख असलेलीं]

**आनंदराव धुळप – (—)** : लोकांचे रोजमुरे देण्यासाठी ऐवजाची मागणी, ३० र. वल, सु. ११८१/२६ मार्च १७८१ (२२०६९).

**कृष्णाजी कोन्हेर – (—)** : वडिलांस देवाज्ञा झाल्यामुळे खर्चासाठीं ऐवजाची मागणी, ८ सफर, सु. ११९२/७ ऑक्टोबर १७९१ (२२०७३).

**कृष्णाजी गणेश राहाळकर – (—)** : नसरापूर येथील बेहडा करण्याविषयी, रायगडच्या फडशाबद्दल (२२०६५).

**धोंडो अनंत सरदेशकुलकर्णी – (—)** : खिलणा येथील वतनाबाबत पंचांच्या मतानुसार वर्तणूक करण्याचे आश्वासन (२१९९६).

**बाळाजी राम – (—)** : कागदांचे गठ्ठे रवाना, १४ रजब, सु. ११७६/१० सप्टेंबर १७७५ (२२०६८).

**लक्ष्मण उद्धव – (—)** : लोकी गावावरील गवताच्या वरातीसंबंधी, १५ सफर, सु. ११८०/२१ फेब्रुवारी १७८० (२१९६५); पाडळी गावाकडे नेमून दिलेल्या कात्रजच्या कुरणापैकी गवत घेऊन जाण्याविषयी, १२ सफर, सु. ११८०/१८ फेब्रुवारी १७८० (२१९६६).

**लक्ष्मण महादेव – (—)** : कागदांचे गठ्ठे रवाना, ४ र. वल, सु. ११९२/१ नोव्हेंबर १७९१ (२२०७६).

रुमाल क्र. ४२, पुडके क्र. ३–पत्रे–चालू :

**सुलतानजी निंबाळकर** – (—) : वडिलांच्या श्राद्धासाठीं खर्चास ऐवजाची मागणी, ७ सवाल, सु. ११८७ / २ जुलै १७८६ (२२०५७).

[फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेलीं]

(—) – **आत्या महाजन** : किल्ले इडसर येथील जाजमासाठीं खरेदी केलेल्या खादीचा ऐवज द्यावा म्हणून, २८ ज. वल, सु. ११९६/ ११ डिसेंबर १७९५ (२२०४०).

(—) – **आप्पाजीपंत गोखले** : देवभट यास सरकारांतून द्यावयाच्या बक्षिसाचा खुलासा, ३ र. खर, सु. ११७४/२४ जून १७७३ (२२०६२).

(—) – **गणेशपंत जोशी** : दप्तरी सत्वर येण्याची विनंती, १ सवाल, सु. ११७५/५ डिसेंबर १७७४ (२२०१०).

(—) – **जनार्दनपंत*** : बाळकृष्ण दीक्षित पळनीटकर यांस पुण्यांत घर देण्याबद्दल (२२०१२).

(—) – **नारो आनंदराव** : फौजेच्या रोजमुऱ्याचा ऐवज रवाना, २९ साबान, सु. ११७५/ ४ नोव्हेंबर १७७४ (२२०६४).

(—) – **नारो आप्पाजी** : मुरारराव व दौलतराव घोरपडे यांना सरकारांतून तिळगुळाची पत्रे व थैल्या पाठवू म्हणून, १० जिल्काद, सु. ११७५ / १३ जानेवारी १७७५ (२२०११).

(—) – **नारो शिवराम** : अली माहात याजकडील पीलखान्याकडे द्यावयाची वैरण, २२ साबान, सु. ११९२ / १५ एप्रिल १७९२ (२२०४७).

(—) – **परशराम रामचंद्र** : शिलेदारांस रोजमुरा द्यावा म्हणून, २४ र. वल, सु. ११७९ / १२ एप्रिल १७७९ (२२०४८).

(—) – **बाजीराव आप्पाजी** : गोविंदराव सदाशिव यांचे पागेकडे वैरण द्यावी म्हणून, २ ज. खर, सु. ११८८ / ११ मार्च १७८८ (२२०४४).

(—) – **भिकाजी विश्वनाथ** : पुण्यांत अटकाविलेल्या तोफेच्या गोण्या सोडून देण्याबद्दल, १४ र. वल, सु. ११८० / २१ मार्च १७८० (२१९६७); सेकोजी काटे याने उंट खरेदी केल्यामुळे त्यांस जकातीचा तगादा करू नये म्हणून, ७ जिल्काद, सु. ११९० / ३० जुलै १७८९ (२१९६९).

(—) – **मनोहर गोविंद** : आप्पाजी गोविंद यास ऐवज देण्याबद्दल, २४ सवाल, सु. ११९२ / २७ जुलै १७९१ (२२०३६).

(—) – **मोकदम डापूर** : सिनाप्पा यास ऐवज देण्याबद्दल, २० मोहरम, सु. ११७९ / ८ फेब्रुवारी १७७९ (२२०१९).

(—) – **मोकदम मोडव** : त्रिंबकराव महिपत पुरंदरे यांजकडे दसऱ्याबद्दल तूप देण्याविषयी, ४ मोहरम, सु. ११८९ / ५ ऑक्टोबर १७८८ (२२०२५).

(—) – **मोरो हरि** : देशमुख वाडेकर यांचे मनसुबीबद्दल झालेल्या ऐवजाच्या कराराबाबत याद पाठविण्याबद्दल, २३ ज. वल, सु. ११७६ / २२ जुलै १७७५ (२२०१३).

पत्रे–चालू :

(—) – **रघुनाथ महादेव** : बाजी अनंत पंडित यांचे कोकणांतून येणाऱ्या तांदुळास जकातीचा तगादा करू नये म्हणून, १६ र. वल, सु. ११८९ / १५ डिसेंबर १७८८ (२१९६८).

(—) – **रामचंद्र*** : जमीचे कामाचा हिशेब करण्यासाठीं दप्तरी कारकून पाठवून देण्याबद्दल, १ साबान, सु. ११८० / १४ ऑगस्ट १७७९ (२२०२०).

(—) – **लक्ष्मणपंत देशमुख** : खतावणीच्या कामासाठीं कीर्दी लवकर पाठवण्याची विनंती, २९ ज. खर, सु. ११७६ / २७ ऑगस्ट १७७५ (२२०६७).

(—) – **विठ्ठल अनंत** : शेकोजी मुळे व गोविंदराव सदाशिव यांजकडे गवत देण्याविषयी, ३ ज. वल, सु. ११८५ / १५ मार्च १७८५ (२२०४२, २२०४३).

(—) – **शिवराम रघुनाथ** : कप्तानाकडे वैरण देण्याबद्दल, ५ सफर, सु. ११८५ / १८ डिसेंबर १७८४ (२२०४६).

(—) – **सखो रघुनाथ** : सिदोजी नरसिंगराव शितोळे देशमुख यांनी हक्काच्या ऐवजाचा खांबगांवी लावलेल्या रोख्याचा तगादा उठवण्याबद्दल विनंती (२१९६३).

(—) – **हरिभक्ती** : मानाजी निकम यांजकडील कोकणांत गेलेल्या घोड्यांस चंदीच्या खर्चासाठीं द्यावयाचा ऐवज, ६ रजब, सु. ११७८ / १० ऑगस्ट १७७७ (२२०३९).

[प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख नसलेलीं]

निलस येथील खंडणीबद्दल, २१ मोहरम, सु. ११७५ / २४ मार्च १७७५ (२१९९८); बहिरो विश्वनाथ दप्तरदार याजकडे बेहड्यासाठी नेमणुकी ऐवज, सु. ११७८ / इ.स. १७७७-७८ (२२०१६); भगवंतगडावरील कांहीं लोक भवानजी बने याजबरोबर लष्करांत पाठवणे म्हणून (२२०१७); नागोजीराव मेघःशाम यांजकडील इंदापूरच्या देशमुखीचे जमीच्या हिशेबासंबंधी निवेदन (२२०२१); म्हसावद येथील मोकाशाची कमाविसी धायभर यांजकडून दूर केली असून हिशेबासाठीं कारकुनाची मागणी, आषाढ शु. १५, सु. ११९५/ १२ जुलै १७९५ (२२०२२); बाबूराव हरि याजकडे नजर ऐवजाचा झालेला करार व याद रवाना, सु. ११८१ / इ. स. १७८०-८१ (२२०२३); रोशणाई खर्च, ६ ज. खर, सु. ११८६ / ६ एप्रिल १७८६ (२२०२४); आगलबे येथील कुरणापैकी गोदजी कड्ड याजकडे झालेली गवताची जमा, ८ ज. खर, सु. ११९० / २३ फेब्रुवारी १७९० (२२०२७); १२ ज. खर, सु. ११९० / २७ फेब्रुवारी १७९० (२२०२८); १० ज. खर, सु. ११९० / २५ फेब्रुवारी १७९० (२२०२९); २५ ज. खर, सु. ११९० / १२ मार्च १७९० (२२०३०); ४ ज. खर, सु. ११९० / १९ फेब्रुवारी १७९० (२२०३१); २३ ज. खर, सु. ११९० / १० मार्च १७९० (२२०३२); २१ ज. खर, सु. ११९० / ८ मार्च १७९० (२२०३३); ६ ज. खर, सु. ११९० / २१ फेब्रुवारी १७९० (२२०३४); राणोजी भालेकर यास द्यावयाचा ऐवज, ३ ज. वल, सु. ११९२ / १९ जानेवारी १७९० (२२०३५); भानसिंग खलटे यांच्या पागेकडील हिशेब त्वरित करावयाची व्यवस्था, ८ सवाल, सु. ११९१ / २२ जून १७९० (२२०४५); कानडे यांस

**रुमाल क्र. ४२, पुडके क्र. ३–तैनात जाबता चालू :**

द्यावयाच्या रोजमुऱ्याचा खुलासा, ६ सवाल, सु. ११८७/१ ऑगस्ट १७८६ (२२०५२); जोगोजी घाटगे यास श्राद्धाबद्दल खर्चास द्यावयाचा ऐवज, ६ सवाल, सु. ११८७/१ ऑगस्ट १७८६ (२२०५३); यशवंत महारुद्र व कृष्णाजी चव्हाण यांस श्राद्धाबद्दल खर्चास द्यावयाचा ऐवज, ४ सवाल, सु. ११८७/३० जुलै १७८६ (२२०५४); २९ रमजान, सु. ११८७/२६ जुलै १७८६ (२२०५५); भगवंतराव दुबे किल्ले बदामी येथे झालेल्या हल्ल्यांत जखमी झाल्यामुळे त्यांस खर्चास द्यावयाचा ऐवज (२२०५६); कासिबा गायकवाड याच्या अंत्यविधीसाठीं द्यावयाचा ऐवज, ६ सवाल, सु. ११८७/१ ऑगस्ट १७८६ (२२०५८); गाजी मालदार यास रोजमुरा देण्याविषयी, ६ ज. वल, सु. ११९२/१ जानेवारी १७९२ (२२०६०); गोविंद हरी यांस द्यावयाचे वेतन, १६ जिल्हेज, सु. ११९६/४ जुलै १७९५ (२२०६१); मानसिंग चोपदार याचे रुप्याच्या काठीची दुरुस्ती केली त्या खर्चाबद्दल, सु. ११८५/इ. स. १७८४-८५ (२२०७०); मोरो हरि याच्या तरवळ येथील इनामासंबंधीचा हिशेब करावा म्हणून (२२०७१); रघुपती याच्या चाकरीबाबत, माघ शु. ५, फ. ११८६/१२ फेब्रुवारी १७७७ (२२०७२).

**मुचलका :**

**गोजाजी गुरव पुजारी – सरकार* :** कोळ्यांकडे कोणी चाकरीस सापडल्यास गुन्हेगारी देण्याची कबुली, सु. ११७५/इ. स. १७७४-७५ (२१९९३).

**यादी :**

इंग्रजांकडील वकील मि. मॅलेट यास महादजी नीळकंठ पुरंदरे यांजकडील हत्ती देते समई त्यावर असलेल्या सामानाची, सु. ११८७/इ. स. १७८६-८७ (२२०५९).

**रसानगी यादी :**

भगवंतराव राम यास पागेकडील खर्चास ऐवज देण्याबद्दल (२२०५०); महादजी शितोळे व आनंदराव शिलेदार यांना नालबंदीचा ऐवज द्यावा म्हणून, २ सवाल, सु. ११८६/८ ऑगस्ट १७८५ (२२०५१).

**रोखा :**

**मोकदम वणेसी – खोत मौजे ढाके :** सदाशिवभट नानल यांस धर्मादाय नेमणूक देण्याबद्दल, ७ रजब, सु. ११९४/८ फेब्रुवारी १७९४ (२२०३८) (नक्कल).

---

**रुमाल क्र. ४२, पुडके क्र. ४** **सु. स. ११६६–१२०४**
**का. सं. ८० (२२०७८–२२१५७)** **इ. स. १७६५–१८०३**

**इनाम पत्रे :**

संताजी बिन नाईकजी मोगरा मौजे तांबवे तालुका हवेली यास मोकदमीपणाबाबत वतन इनाम दिल्याबद्दल, ७ रमजान, सु. ११९३/१९ एप्रिल १७९३ (२२१२५).

**फेरिस्ते :**

मुलतानपूर ता। अळे येथील पाटिलकी विकली त्यासंबंधीचे व बाजी देवराव याचे दानपत्राबाबत वगैरे वतनी कागदपत्रांचे, सु. १२०५/इ. स. १८०४-१८०५ (२२१५७).

**याद्या :**

प्रां। कऱ्हाड निा। श्रीनिवास शामराव याजकडून सरकारात घ्यावयाच्या तसलमाती ऐवजासंबंधीचा तपशील देणारी, २० जिल्हेज, सु. ११८१/१७ डिसेंबर १७८० (२२११२); प्रांत बुंदेलखंडपैकी तालुका काल्पी येथील हिशेब पूर्वसूचना देऊनही न पाठविल्यामुळे बाळाजी गोविंद यांची कानउघाडणी व रघुनाथ हरी यास झांशीकडील हिशेबासंबंधी सूचना वगैरे कलमांची, १ सवाल, सु. ११८१/३० सप्टेंबर १७८० (२२१२६-२२१२७); नारो आप्पाजी यांच्याकडील रोजकीर्द खर्चाच्या बंदाची, सु. ११७५/इ. स. १७७४-१७७५ (२२१२८); गोविंद अनंत यास किती नालबंदी ऐवज व कापड दिले याच्या तपशिलार्थ, २७ ज. खर, सु. ११७५/३ सप्टेंबर १७७४ (२२१२९); आबदुल कादर याजकडील गारद्यांकडे किती ऐवज शिल्लक राहिला यासंबंधीची, ज. वल, सु. ११७६/जून-जुलै १७७५ (२२१३०); मौजे बागाईत ता। हवेली सा। जुन्नर येथील वसुलासंबंधीची, सु. ११८५/इ. स. १७८४-८५ (२२१३१); सु. ११७७/इ. स. १७७६-७७ (२२१३२-२२१३३); कारकून सखो महादेव यांजकडील भोगवटा वसूल झाला त्या गांवाची, २५ सफर, सु. ११७७/४ एप्रिल १७७७ (२२१३४); सुरतेच्या मार्गावर पंतप्रधानांच्या (माधवराव नारायण) बंदोबस्ताच्या छबिण्यावर नेमलेल्या लोकांची, १० ज. वल, सु. ११८०/१५ मे १७८० (२२१३५); चिंतो विठ्ठल याजकडे असलेल्या मोत्यासंबंधीची, १२ रजब, सु. ११८३/२४ जून १७८२ (२२१३६); गहाळ झालेल्या बंदाची, सु. ११८४/इ. स. १७८३-८४ (२२१३७); गुंडेवाडी प्रां। मिरज येथील वसुलासंबंधीची, साबान, सु. ११८४/जुलै १७८३ (२२१३८); झांशीहून पुणे येथील व्यापाऱ्यावर किती रकमेच्या हुंड्या आल्या त्याचा तपशील देणारी, १५ साबान, सु. ११८४/१६ जुलै १७८३ (२२१३९); वस्त्रांची, सु. ११८४/इ. स. १७८३-८४ (२२१४०); विनायक भट शाळिग्राम यांच्या कन्येचे लग्नाकरिता द्यावयांच्या किरकोळ सामानाची, सु. ११८५/इ. स. १७८४-८५ (२२१४१); किल्ले बदामी येथील हल्ल्यांत जळालेल्या गर्भरेशमी वस्त्रांची, २१ रजब, सु. ११८६/२० मे १७८६ (२२१४२-२२१४३); मुधोजी भोसले यांनी इंग्रज वकील चार्ल्स मॅलेट यास हत्ती व दिलेल्या इतर साहित्यांची, १ सवाल, सु. ११८७/२७ जुलै १७८६ (२२१४४); बिरवाडी किल्ल्याच्या बांधकामाविषयी, ३ र. वल, सु. ११८८/१४ डिसेंबर १७८७ (२२१४५); बाळाजी मल्हार बापट यास दिलेल्या सामानाची, ९ रमजान, सु. ११९६/१९ मार्च १७९६ (२२१४६); धार्मिक कार्यास कापड वगैरे दिले त्याची, ९ रमजान, सु. ११९६/१९ मार्च १७९६ (२२१४७-२२१४८); मार्गशीर्ष शु. १, शके १७१७/१२ डिसेंबर १७९५ (२२१४९); २६ र. वल, सु. ११९६/१० ऑक्टोबर १७९५ (२२१५०, २२१५४); २९ ज. वल, सु. ११९६/९ डिसेंबर १७९५ (२२१५१); २६ साबान, सु. ११९६/७ मार्च १७९६ (२२१५२); ६ ज. वल, सु. ११९६/१९ नोव्हेंबर १७९५ (२२१५३); ८ र. वल, सु. ११९६/२२ सप्टेंबर १७९५ (२२१५५); विठोबा नाईक दादा मोहळेकर याजकडून शिबंदीचे हिशेब करवून घेतले त्याची, २५ र. खर, सु. १२०५/२ ऑगस्ट १८०४ (२२१५६).

* संपूर्ण नांवाचा उल्लेख नाही.

**रुमाल क्र. ४२, पुडके क्र. ४ चालू :**

**यादी करार :**

(खाली नमूद केलेल्या याद्या सरकारात येणे असलेला कर्जाऊ ऐवज कर्जदाराकडून एकोत्रा व मनोतीप्रमाणे वसूल करावा याच्या तपशिलार्थ असून प्रथम कर्ज कोणाकडून वसूल करावयाचे त्यांच्या नांवाचा उल्लेख करून पुढे पत्र क्रमांक दिलेला आहे.) भिकाजी गोविंद गोडबोले, २ ज. वल, सु. ११८०/७ मे १७८० (२२०८१); केसो अप्पाजी पटवर्धन, २० र. खर, सु. ११८०/२६ एप्रिल १७८० (२२०८२); रघुनाथ सदाशिव, १२ ज. खर, सु. ११८१/१६ जून १७८० (२२०८३); २ ज. खर, सु. ११८१/६ जून १७८० (२२०८४); १९ जिल्हेज, सु. ११८१/१६ डिसेंबर १७८० (२२०८५); चिंतामण नाईक ओंकार, ११ जिल्हेज, सु. ११८१/८ डिसेंबर १७८० (२२०८६); त्रिंबकराव दीक्षित पटवर्धन, १ साबान, सु. ११८१/२ ऑगस्ट १७८० (२२०८७); त्रिंबक विनायक, ३० जिल्हेज, सु. ११८१/२७ डिसेंबर १७८० (२२०८८); बाबूराव विश्वनाथ वैद्य, २७ साबान, सु. ११८१/२८ ऑगस्ट १७८० (२२०८९); आप्पाजी शंकर भिडे, २५ जिल्हेज, सु. ११८१/२२ डिसेंबर १७८० (२२०९०); ५ सफर, सु. ११८१/३० जानेवारी १७८१ (२२०९१); १० मोहरम, सु. ११८१/६ जानेवारी १७८१ (२२०९२); लक्ष्मणभट देवधर, २४ सफर, सु. ११८१/१८ फेब्रुवारी १७८१ (२२०९३); हरीभक्ती, २२ रजब, सु. ११८१/२५ जुलै १७८० (२२०९४); २९ जिल्हेज, सु. ११८१/२६ डिसेंबर १७८० (२२०९५); महादेवभट शारंगपाणी, २९ जिल्हेज, सु. ११८१/२६ डिसेंबर १७८० (२२०९६); १७ ज. खर, सु. ११८१/२१ जुलै १७८० (२२०९७); १६ जिल्काद, सु. ११८१/१४ नोव्हेंबर १७८० (२२०९८); ३ मोहरम, सु. ११८१/३० डिसेंबर १७८० (२२०९९); बापूजी वामन, ३० साबान, सु. ११८१/३१ ऑगस्ट १७८० (२२१००); रामचंद्र महादेव परांजपे, १९ सफर, सु. ११८१/१३ फेब्रुवारी १७८१ (२२१०१); कृष्णाजी भैरव थत्ते, २७ रमजान, सु. ११८१/२७ सप्टेंबर १७८० (२२१०४); मुरारराव जाधव, १७ जिल्हेज, सु. ११८१/१४ डिसेंबर १७८० (२२१२२); सदाशिव राम गुणे याजकडील येणे असलेला कर्जाऊ ऐवज शिवाजी थोरात याजकडून कसा कसा वसूल करावा या तपशिलार्थ, ४ जिल्हेज, सु. ११८१/१ डिसेंबर १७८० (२२१०३); पंत सचिव याजकडील नळपट्टी ऐवजासंबंधी, २१ जिल्हेज, सु. ११८१/१८ डिसेंबर १७८०(२२१०५); उज्जैन येथील मामलत तफावतीचा फडशा होऊन गणेश गोविंद गणपुले यांनी जयराम जोशी यास द्यावयाचा ऐवज त्यांचे मुलांकडून घेण्याबद्दल, १७ रजब, सु. ११८१/२० जुलै १७८० (२२१०६); अर्काट येथील इंग्रजाचा वेढा उठविण्याबद्दल नरसिंग कृष्ण तिरपती याजकडे सरकारातून द्यावयाच्या नजर ऐवजासंबंधी, १६ जिल्काद, सु. ११८१/१४ नोव्हेंबर १७८० (२२१०७); पो। येरंडोल येथील पोतनीस राघो नारायण परचुरे यांच्या तैनात नजर ऐवजासंबंधी, १४ जिल्हेज, सु. ११८१/११ डिसेंबर १७८० (२२१०८); प्रांत खानदेशपैकी सरंजाम व सरकार महालापैकी ऐवजातून गणेश विश्वनाथ बेहेरे यास रुपये ५,००० देण्याबद्दल, २७ जिल्काद, सु. ११८१/२५ नोव्हेंबर १७८० (२२१०९); किल्ले परळी उर्फ सज्जनगड येथे अटकेत असलेल्या गोविंद हरी शिंत्रे याची सुटका करून सरकारात ध्यावयाच्या नजर ऐवजासंबंधी, १७ सफर, सु. ११८१/११ फेब्रुवारी १७८१ (२२११४); जातीभ्रष्ट झालेल्या गंगाजी व सेठी व संताजी

**यादी करार चालू :**

बिा उदाजी सरवदे शिंपी, पुणे यांना अभयपत्र दिल्याबद्दल हरकी दाखल द्यावयाच्या नजर ऐवजासंबंधी, २० ज. खर, सु. ११८१/२४ जून १७८० (२२११६); काशिनाथ अनगल याच्या बुडीत मालमत्तेची त्याच्या दोन मातोश्री व एक स्त्री यांच्यात समान वाटणी करून सरकारात घ्यावयाच्या नजर ऐवजासंबंधी, १ मोहरम, सु.११८१/२८ डिसेंबर १७८० (२२११७); लक्ष्मण शेठ सोनार पनवेलकर यांच्या टंकसाळाची इंग्रजांनी लूट केली पण शिल्लक राहिलेल्या ऐवजाचे रक्षण केल्याबाबत घ्यावयाच्या नजर ऐवजासंबंधी, २ मोहरम, सु. ११८१/२९ डिसेंबर १७८० (२२११८); पुणेकर गुजराथी जोहरी यांचा सुरतेहून आणलेला चोरटा माल पकडला तो परत करून त्यावर घ्यावयाच्या नजर ऐवजासंबंधी, १७ जिल्काद, सु. ११८१/१४ डिसेंबर १७८० (२२११९); फंद फितुरी न करता सरकारसी एकनिष्ट राहण्याबद्दल कबुली देऊन बाबूराव जिवाजी एरंडे यांनी नजर ऐवज करार केला त्यासंबंधीची, ७ ज. खर, सु. ११८१/११ जून १७८० (२२१२०); मौजे कोनेर चिंचोली पा। कडेवळी येथील देशपांडे यांच्या हक्क गांवच्या भाऊपणाच्या कज्जयाचा फडशा करून हरकी करार केला यासंबंधीची, ९ जिल्हेज, सु. ११८१/६ डिसेंबर १७८० (२२१२३).

**रसानगी याद्या :**

गोपाळ केशव याजकडील अंजनवेल येथील मुदपाकाकडील आसामी रत्नागिरीकडे नेमून घेण्याबद्दल महिपतराव कृष्ण यास, २५ साबान सु. ११७५/३१ ऑक्टोबर १७७४ (२२०७८); नारायण भट बिा कृष्णाजी भट काशीकर मुक्काम सातारा व अंताजी कृष्ण मौजे बेलकामठी यांच्या लग्नसंबंधीच्या कज्जाचा फडशा करण्याबद्दल बाबूराव कृष्ण यास, १४ जिल्हेज, सु. ११८२/१ डिसेंबर १७८१ (२२०७९) (नक्कल); बाभूळगांव प्रा। नेवासे येथील उधो त्रिंबक कुलकर्णी यास विषप्रयोग करून मारल्याबाबत पत्नीवर करावयाच्या कारवायासंबंधी कोहज येथील मामलेदारास, सु. ११९१/इ. स. १७९०-९१ (२२०८०); भगवंत सिद्धनाथ यांच्या वेळापूर येथे जप्त केलेल्या ऐवजाच्या परत फेडीबद्दल हणमंतराव घाटगे यास, १६ ज. खर, सु. ११८१/२० जून १७८० (२२१०२); पा। अहिरवाडी ता। सोलापूर येथील फडणिसी नारो रामचंद्र याजकडे देण्याबद्दल रामचंद्र शिवाजी यास, २७ र. खर, सु. ११८१/२२ एप्रिल १७८१ (२२११०); पा। कसरावद ता। मंडलेश्वर येथील कमाविसी लक्ष्मण बल्लाळ याजकडेच चालू देण्याबद्दल त्रिंबक मोरेश्वर यास, २७ रजब, सु. ११८१/३० जुलै १७८० (२२१११); गबाजी केशव याजवरील जप्ती उठवून कराराप्रमाणे ऐवज सरकारात घेण्याबद्दल बाळाजी विठ्ठल यास, १२ जिल्काद, सु. ११८१/१० नोव्हेंबर १७८० (२२११३); किल्ला झाडावयास रवाना केलेल्या हलालखोरांच्या रोजमुऱ्यासंबंधी, २५ जिल्काद, सु. ११६६/५ मे १७६६ (२२११५); बापूजी हरी कारकून कोकणांत जाताना त्याजबरोबर द्यावयाच्या साहित्याविषयी व नरसो श्रीपत यांनी करार केल्याप्रमाणे ऐवज घेण्याची मुभा असल्याबद्दल, २५ रजब, सु. ११८१/२८ जुलै १७८० (२२१२१); सिदनाक दिम्मत भवाननाक धामणीकर ता। रायगड यास तैनात व शिरस्ता ऐवज देण्याबद्दल, २५ र. वल, सु. ११८१/२० मे १७८१ (२२१२४).

हमाल क्र. ४५, पुडके क्र. ५–पत्रे चालू :

उपद्रवाबद्दल निवेदन व त्याची समजूत करण्याची विनंती (२३५७०, ५७१); श्री विठोबाची टोपी भिवजी साठे याजबरोबर पाठविण्याची विनंती (२३५७२); घराच्या दुरुस्तीबाबत, मातोश्रींच्या प्रकृतीविषयी खुलासा (२३५७३); प्रतिनिधीने पाठविलेल्या वराता उगवावयाच्या नाहीत म्हणून आज्ञा व घरगुती मजकूर (२३५७४).

**बापू पाटणे** – (—): तेल्याकडील बैलाच्या मोकळिकेसंबंधी (२३४९८).

**मोरोबा*** – (—) : फडशे करावयाचे कागदपत्र घेऊन जेजुरीस येण्याबद्दल, १३ रजब, कार्तिक, सु. ११७०/१३ नोव्हेंबर १७६९ (२३५८६).

**राम*** – (—): पुण्यातील खर्चाचा झाडा पाठवीत असल्याचे, गवत कापावयास परवानगी देण्याबाबत (२३५०५).

**वामनाजी बाबूराव रहाळकर** – (—) : बाबुरावजी पोंक्षे यास घोडे न मिळाल्याबद्दल, सर्व प्रकारे चाकरी घडावी अशी इच्छा (२३५७७).

**विनायक*** – (—) : बाजुबंद व पोवळयाच्या बाळ्या तयार करून पाठविण्याविषयी (२३५५८).

**शामराव भिवराव** – (—) : हुसेनखान जमातदार याची हरवलेली घोडी नारोबा याजपाशी सापडली परंतु तो देत नसल्याने त्यास घोडी देण्याची आज्ञा करण्याबद्दल (२३६१३).

**हरि रामचंद्र** – (—) : कार्यात सहाय्य करण्याची विनंती, वृत्तीची वहिवाट चालती करून देण्याची विनंती (२३६१८).

[फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेलीं]

(—) – **आप्पाजीपंत आप्पा*** : तट्टूबरोबर येणाऱ्या माणसाबरोबर जमालगोटा व कागद पाठवीत असल्याचे, चरसांची मागणी (२३५५४).

(—) – **कमिशनर साहेब*** : बैल व बेगारी यांची मागणी (२३५७८).

(—) – **गोपाळपंत तात्या*** : मोरो हरि याजकडील दागिन्यांची मोजदाद करून किंमत आकारण्याबद्दल (२३५५०).

(—) – **गोपाळराव गोविंद** : हकीम महंमद अलीखान याचा जावई औरंगाबाद येथून त्यास भेटावयास येत असता त्याची वस्तभाव लुटली गेली सबब त्यास वस्तभाव घोडी वगैरे देण्याची विनंती (२३६२२).

(—) – **तात्या*** : चिंचोडीकर निंबाजी अनंत, निंबाजी विठ्ठल व महिपतराव नारायण यांच्या मनसुफीचे कागदपत्र पुण्याहून पाठविण्याबाबत (२३५१३).

(—) – **दादा*** : नायगाव येथून येणाऱ्या प्याद्यांना चाकरीस न ठेवण्याबद्दल रिसालदार यास ताकीद करण्याची सूचना (२३५०९).

(—) – **मोहिबा*** : किल्यासाठी चूड, लाकूडफांटा वगैरे इतर गांवांकडून मिळणारे जिन्नस देण्यास अंमलदार डेव्हिड कोनेगी याचा विरोध (२३५६९).

पत्रे चालू :

(—) – **रामराव दादाजी देशमुख** : रघोजी भोसले याने प्रापकास पाडे पेडगांव या इनाम दिलेल्या गावाबद्दल खुलासा (२३६३६).

(—) – **वडील*** : जिन्नस रवाना (२३५८०).

(—) – **विसाजी आप्पाजी*** : गणेश गंगाधर याचा रामराव अंबाजी याच्यातर्फे हिशेबाचा फडशा करण्यासाठीं सत्वर येण्याविषयी (२३५८४).

(—) – **विसाजीपंत जोशी** : नारायणाचार्य मांगलेकर याच्या वर्षासनाची वरात श्रीमंतांस दाखऊन मोर्तब करून पाठवून द्यावी व बाजी नारायण याजकडील हशमांचा नेमणूक जाबता त्यावर शिक्का करून पाठवून द्यावा म्हणून विनंती (२३५९८).

(—) – **सखाराम*** : विठ्ठलापूर व कामथे येथील कगदपत्र घेऊन येण्याबद्दल (२३६३०).

(—) – **साहेब*** : आज्ञा झाल्यास जगजीवनराव पवार भेटीस येतील म्हणून आश्वासन (२३५५२).

[प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख नसलेलीं]

कुलकर्णी हिच्या कजियाबाबतच्या इनसाफासंबंधी (२३५०३); सुपे येथील सरकारात अमानत असलेल्या शेताच्या वहिवाटीसंबंधी खुलासा (२३५०६); डुबेरे येथील हिशेबाचा फडशा करण्याबद्दल (२३५१९); सदाशिवपंत साठे यांस गडीराम व त्र्यंबकराव यांजकडून येणे असलेल्या ऐवजासंबंधी खुलासा (२३५२०) (मसुदा); गारदी व कोळी यांनी केलेल्या लुटीची चौकशी (२३५२९); महादजीपंत याजकडून कामाचा खोळंबा सबब त्यास करावयाची ताकीद (२३५३०); नारायण त्रिंबक यास प्रायश्चित्त घेण्यासाठीं यात्रेस जाण्याविषयीचे पत्र देण्याबद्दल (२३५३१); तूप देण्याविषयीचा खुलासा (२३५३८); सरकार चाकरीत एकनिष्ठ असल्याचा खुलासा (२३५४०); आर्थिक परिस्थितीचे केलेले निवेदन (२३५४३); देशमुखीच्या कामाबाबत खुलासा (२३५४६); नारो बाबाजीचे मोजणीचे कागदपत्रावरून कतबा लिहून देऊ म्हणून खुलासा (२३५४७); सांगितलेल्या गृहस्थाचा शोध करीत असल्याचे (२३५५३); मुजुमदार सोमण व फडणीस उदगीर यांचे हातून काम न घेण्याबद्दल सूचना (२३५५५); सैद बिदेसी याने आत्महत्या केली असून त्याची प्रापकाजवळ असलेली चीजवस्तु त्याच्या बायकोस परत देण्याबद्दल (२३५५७); मुलाण्यांच्या कागदपत्रांसंबंधी खुलासा (२३५६२); संताजी सावंत याने सांगितल्याप्रमाणे नारायणगांवच्या चौकशीचा मजकूर लिहून विनंतीपत्र पाठवीत असल्याचे (२३५६३); माहागिन्याविषयी पाठविलेल्या कागदांचा तपशील (२३५६८); नारंगी व चिंचोली येथील धान्य व मीठ प्रतिवर्षी चिंचवड देवास अन्नछत्रास जाते त्यावर दिलेल्या मार्गाचे दस्तक (२३५७६); रकमा पोहोंचल्या त्याचा तपशील आज्ञेनुसार पाठवीत असल्याचे (२३६०१); भोई लोकांचा रोजमुरा पाठविल्याचे, रोजमुऱ्याचा ऐवज परभारे देण्याचे आप्पाजीपंतांनी कबुल केल्यासंबंधी, बाबू सोनार याजकडे मागितलेली देवाची उपकरणी त्याने कोकणात पाठविली असल्याने ती आणून देण्याबद्दल आश्वासन (२३६२५); पिराजी मोरे याचा विठ्ठलपूरच्या मळयात गेलेला मोटेचा बैल मळेवाल्याने बांधून

* मूळ नांवाची निश्चिती होत नाही.

रुमाल क्र. ४५, पुडके क्र. ५–पत्रे चालू :

ठेवला तो सोडून देण्याबद्दल (२३६२८); आप्पाजी जगन्नाथ दोन दिवसात येत असल्याचे, सेकू याची जमीन त्याच्याकडेच चालावी व त्याजकडे राहिलेली बाकी भुतोजीबावास देण्याबद्दल (२३६३२); नारायणराव देशपांडे याजकडून खासा स्वारी जाते समई मौजे कनूर येथे करावयाच्या बंदोबस्तासंबंधी (२३६३७).

— —— —

| | |
|---|---|
| रुमाल क्र. ४५ पुडके क्र. ६ | सु. स. ११६९ |
| का. सं. ६९ (२३६३८ ते २३७०६) | इ. स. १७६८–१७६९ |

पत्रे :

**अंताजी बालाजी – आप्पा*** : आसद व सोनसल या दोन गावांच्या वसुलाबाबत (२३६४५).

**अंताजीराम सरदेशपांडे – नाना न्यायाधीश*** : स्वतःच्या वतनासंबंधी निवेदन (२३६५९).

**आनंदराव त्रिंबक – नाना*** : बहिरू पवार गुमास्त्याकडील बाकीमुळे सेटजी कोलते याची रिसे येथील गुमास्तगिरी हांडे पाटील चालू देत नसल्याबद्दल निवेदन (२३६६१).

**आप्पाजी दत्तात्रय देशपांडे – मोरो व बापू शामराज शेंडे** : तारगाव व तारगांव तर्फेतील दोन तीन इनाम गांवे वंशपरंपरेने उपभोगणे (२३६५३).

**कचो मल्हार – भास्करपंत कानिटकर** : प्रेषकास बुणग्याबरोबर खंडाळ्यास रवाना केले असून तेथून त्यास लष्करांत बोलावण्याची विनंती (२३६७६).

**गंगाधर बल्लाळ* – रामचंद्रपंत*** : आणलेल्या सरकारी उंटाची रवानगी (२३६९२).

**गणेश बाबूराव* – कुशाबा*** : बाळोजी जावजी यांच्या खटल्याबद्दल जप्त केलेला बहिरजी पाटील यांचा मळा मोकळा करण्याची विनंती (२३६८८).

**गोविंदराव सदाशिव* नारोपंत नाना*** : सेलबारीचे घाटी येत असल्याबद्दल (२३७०२).

**जगन्नाथ धोंडदेव फणसाळकर – विठ्ठलपंत*** : सिवडे येथील पाटीलकीविषयी व शेरी जमिनीविषयी खुलासा (२३६४७).

**जागोजी* व आत्माजीराम* – तात्यासाहेब*** : त्रिंबक येथे अनुष्ठानाच्या ब्राह्मणाकडे वण दिंडोरी येथील ऐवजाचा आज्ञेप्रमाणे भरणा (२३७०५).

**दत्ताजी केशव फणसे – हरिपंत करमरकर** : कृष्णाजीपंत आप्पा यांच्या सरकारातून आलेल्या इनामतीच्या ऐवजाबाबत (२३६५८).

**धोंडो गोविंद – नाना*** : नारायणगड येथील बेहड्याच्या ऐवजाची मागणी (२३६७०).

**नरहर लक्ष्मणराव* – बाळाजीपंत दादा*** : दप्तरच्या नेमणुकेच्या द्यावयाच्या ऐवजाबद्दल पुण्याच्या हुंड्याच्या ऐवजाची रवानगी (२३७०१).

**नार सावंत भोसले – दादा गोसावी** : आंब्याची रवानगी (२३६८३).

पत्रे चालू :

**नारो रामचंद्र – अंताजीपंत*** : वाकसई येथील पाटील व कुणब्यांच्या उपद्रवासंबंधी (२३७०६).

**बाबूराव कृष्ण – रावसाहेब*** : भास्करभट वैद्य याजकडे तांदूळवाडी येथे इनाम असलेल्या जमिनीच्या वसुलीबद्दल (२३६६५).

**भगवंत भुजंगे - बच्याजीपंत आण्णा*** : तोफखान्याकडील गावच्या सनदा व भिड सांगवीच्या सनदा न आल्यासंबंधी निवेदन (२३६५७).

**भास्कर रामचंद्र केळकर – आबा*** : आमदाबादकर पवार याजकडील जप्त केलेल्या सरंजामाच्या ऐवजासाठी पाठविलेल्या कारकुनास मनाई करण्याबाबत (२३६४८).

**माधवराव अनंत - नाना*** : अनंत ठेकणे यास महिपतरावजी यांनी आपले कुरणापैकी इनाम दिलेले म्हसवे येथील कुरणाची वहिवाट तशीच चालू ठेवण्याची विनंती (२३७०४).

**मोरो बाबूराव* – नाना*** : अवधूतराव व जीवनराव केशव यांच्या वैजापूर येथील देशपांडेपणाच्या जप्त असलेल्या वतनाच्या मोकळिकेबाबत (२३६६०).

**मोरो हरी – दादा*** : सदाशिवभट शेंड्ये यांना पाठविले असून त्यांची फिर्याद ऐकून घेण्यासंबंधी (२३६८५).

**यशवंतराव ताकपीर – चऱ्होलीकर मोकदम** : बाबासाहेब याजकडील जिन्नस घेऊन जाणाऱ्या जासुदास अटकाव न करण्याची विनंती (२३६६९).

**विसाजी आप्पाजी – गणेशपंत दादा*** : धोंडोपंत साठे यास प्रापकाकडे असलेल्या पागेच्या हरकीचे काम देण्याची विनंती (२३६९६).

**सखाराम चिंतामण खरशीकर – माधवराव*** : रामचंद्रराव नाईक निंबाळकर याच्या कोलेगांव येथील इनाम जमिनीच्या वहिवाटीबद्दल (२३६५२).

**सासवडकर देशमुख, देशपांडे व मोकदम – बाळोजी कुंजीर** : दंग्याचे दिवस असल्याने सरकारातून दिलेल्या जमिनीचा कारभार नीट करण्याचा सल्ला (२३६७१).

**हरी भगवंत व बाळाजी लक्ष्मण – सदाशिवपंत भाऊ*** : वराता घेऊन वसूल घ्यावा व घरचा बंदोबस्त ठेवण्याविषयी (२३६८६).

**[फक्त प्रेषकांचा नामोल्लेख असलेलीं]**

**गोपाळराव खंडकर – (—)** : मलंग पाटील याजकडील भुसार पनवेल व सजा बेलापूर येथील चढ देऊन सांगितलेल्या मामलतीबद्दल, श्री रामाच्या उत्सवासाठी जकातीकडून जात असलेल्या ऐवजासंबंधी मामलेदाराच्या पत्राची रवानगी, पनवेल येथे चोरांचा उपद्रव (२३६७७).

**गोविंद गोसो – (—)** : कारखेल येथील जमा वसुलाबद्दल व मल्हारी गायकवाड यांच्या तंट्यांत फितूर झालेल्याची चौकशी करणे वगैरे बाबतची कलमे (२३६७२-२३६७३); मेहेंदळे याजकडील शिपायाने राक येथे खरेदी केलेली बाजरी सासवडच्या कोठीत

**रुमाल क्र. ४५, पुडके क्र. ६–पत्रे चालू :**

आणण्याबद्दल, नांदूर खामगांव येथील सोडचिठ्ठी बाबतचे कलम, चॅपलीन साहेबाच्या मुक्कामाबाबत ( २३६७४–२३६७५ ).

**चिमणाजी महादेव** – (—) : जीवनराव मोरेश्वर याची तात्याकडे रवानगी ( २३६८१ ).

**चिमणाजी सदाशिव** – (—) : इनामाच्या जप्तीचा ऐवज परत मिळाल्याबद्दल व अन्नपूर्णाबाईच्या पोटखर्चाबद्दल वाफगांवकर सावकाराकडून अडथळा होऊ न देण्याबाबत, कुलकर्णाचे वतनाच्या मोकळिकेबद्दल पत्राचे मसुदे रवाना (२३६५६).

**दादा कृष्ण** – (—) : भट व करमरकर यांच्या तंट्यात जप्त झालेल्या सिरगांव येथील खोतीच्या वतनाच्या मोकळिकेसंबंधी खुलासा (२३६६२).

**नारायण विठ्ठल** – (—) : मोरोपंत तात्या यांच्याकडील पत्रांची रवानगी (२३६९१).

**बापूजी मोरेश्वर** – (—) : वसुलाबद्दल खुलासा (२३६६६).

**बाळाजी गोपाळ आगाशे** – (--) : बेलापूरच्या सरदेशमुखाकडील बंदरात कारकून मालावर घेत असलेल्या टिपेबाबत, मलंग पाटील पनवेल येथे देत असलेल्या उपद्रवाबद्दल वगैरेची कलमे (२३६७८).

**महादजी माणकेश्वर** – (—) : जुजबी पर्जन्यामुळे सूर्या परवत येथील कुरणांत गवताची चणचण, महाडाहून आणावयाच्या घोडो-संबंधी आज्ञा करण्याबाबत (२३६४३).

**हरी महादेव** – (—) : वरातविषयी पंत प्रतिनिधिशी झालेल्या चर्चेबाबत (२३६९३–२३६९४).

**[फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेली]**

(—) – **गंगाधरपंत*** : बोधे यांच्या वहिवाट करीत असलेल्या शेताच्या वसुलीसंबंधी (२३६८७).

(—) – **गोपाळपंत बिवलकर** : वाळुंज येथील नबाबास लावून दिलेल्या तनख्याच्या गांवाबाबत विचारणा, लोणी येथील जहागिरी असलेल्या विश्वासराव देवराव यांचा शोध करण्या-बद्दल वगैरेची कलमे (२३६८२).

(—) – **गोविंद गोसो** : सासवड येथील अमलाबाबत (२३६४४).

(—) – **गोविंदपंत*** : खाबले गांवच्या कुरणास होत असलेला उप-द्रव व त्याच्या रखवालीस जासुद ठेविला असल्याबाबत (२३६६७).

(—) – **नाना*** : फरासखान्याकडे जिनसांची मागणी (२३६४१).

(—) – **नारोपंत नाना*** : सगुणाबाई हीजकडील करार केलेल्या ऐवजाचा तपशील (२३६८९).

(—) – **परशरामपंत भाऊ*** : कुगांव येथे ठेवावयाच्या घोड्यास लागणाऱ्या बाजरीच्या खरेदीसाठी ऐवज रवाना (२३६९७); फौजेच्या पटाची मागणी (२३६९८).

(—) – **बाळाजीपंत दादा*** : आप्पांच्या सरंजामास दिलेल्या गावांच्या झाड्याबाबत (२३६४९).

**पत्रे चालू :**

(—) – **रामचंद्रपंत पंडित** : महिपतराव कवडे याजकडील हिशेबाची मागणी (२३६५१).

(—) – **हरिपंत तात्या** : निघोली येथील रखवालीसाठी स्वारांची रवानगी (२३६९९); गणाजी चंदररावकर याजकडील शिपायांस पेंढाऱ्यांनी लुटल्यासंबंधी (२३७००).

**[प्रेषक अथवा प्रापकांचा नामोल्लेख नसलेली]**

नालबंदीचा व रोजमुऱ्याचा ऐवज देण्याची विनंती (२३६३९); पाऊस जास्त झाल्याबद्दल, सटवाजी सोनार याचे कागदपत्र पाठविण्याविषयीची कलमे (२३६४०); पिंपल येथील खरेदी केलेल्या जमिनीच्या सनदेची मागणी ( २३६४२ ); सासवड येथील इनाम तिजाईच्या ऐवजाबद्दल व खर्चास ऐवज देण्याची विनंती (२३६४६); सरंजामाचा झाडा व रुजुवातीसाठी कारकून पाठवित असल्याबद्दल, आषाढ वद्य ४, सु. ११६९/४ जुलै १७६८ (२३६५०); रहिमतपूरचा मजकूर मागाहून पाठवू म्हणुन, गोखले प्रकरणी साहेबाच्या सहीच्या याद्दीसंबंधी (२३६५४); नांदूरकर रामोशाकडून येणे असलेल्या कर्जाऊ गल्याबद्दल, त्याजकडील सरकारातून नेमलेल्या इनाम जमिनीची लावणी सखो रघुनाथ याजकडे सांगितल्याबद्दल, नांदूरकर व खांबगावकर याजकडील बाकीचा वसूल सखो रघुनाथ याकडे गला खरेदीस देण्या-बद्दल आनंदराव धुमाळ यास द्यावयाचे पत्र (२३६५५); सासवड येथील कुलकर्णपणाच्या उत्पन्नाबाबतचे निवेदन (२३६६३); बापू बुधकर यांस इनाम जमीन (२३६६४); किरकोळ मजकूर (२३६६८); आकोले येथील अजमास व हिशेबाची मागणी (२३६७९); त्रिंबकराव शितोळे यास शिमग्याचा सण देण्याची विनंती (२३६८०); किरकोळ मजकूर (२३६८४); वैराटगडकऱ्यास मौजे इवर ता। कुडाळ येथील महाराकडून झालेल्या भुताच्या उपद्रवामुळे सिदोजी पारटे यास झालेली मारहाण (२३६९०); देशमुख, मोकदम वगैरे याजकडून जमिनीसंबंधी घ्यावयाच्या कतब्याबाबत ( २३६९५ ); तर्फ कऱ्हेपठार येथील सरंजामी गांवातील जमिनदारांच्या हक रुसुमाचा ऐवज किल्याकडे पावता झाला असल्याने पुन्हा वसुलाचा उपद्रव न करण्याबद्दल (२३७०३).

**यादी :**

दादा व खंडोपंत यांच्याकडे जमा झालेल्या सणग्यांची (२३६३८).

———

| | |
|---|---|
| **रुमाल क्र. ४५ पुडके क्र. ७** | **सु. स. ११९५** |
| **का. सं. १९४ (२३७०७ ते २३९००)** | **इ. स. १७९४९५** |

**कतबा :**

**[प्रेषक प्रापकांचा नामोल्लेख नसलेले]**

माधवराव यास द्यावयाच्या ऐवजाचा (२३७३६); संतू तेली याच्या जागेत त्याच्याच खर्चाने बाळा तेली याने बांधलेले घर पाहिजे तेव्हा खाली करू म्हणून दिलेला (२३८४८–२३८४९).

*संपूर्ण नांवाचा उल्लेख नाही.

रुमाल क्र. ४५, पुडके क्र. ७ चालू :

**जामीन कतबा :**

सीताराम तांबोळी याने गणपतीचे उत्सवात विड्याची पाने पुरविण्याबाबतचा (२३७३७).

**कबज :**

खासाराम व अंकुस राऊत यांच्या तैनातेच्या ऐवजाचे (२३७४१).

**करीना :**

सोनजी नाईक सुतार याच्याशी भागीत असलेल्या जमिनीच्या लावणीबद्दल व सुताराच्या कर्ज फेडीबद्दल (२३७३५).

**पत्रें :**

**कृष्णाजी जगन्नाथ–गोविंदपंत तात्या*** : माळशिरस येथील चौथाईच्या ऐवजाबाबत व तिळगुळाची रवानगी (२३७५९).

**कृष्णाजी बल्लाळ गोखले–गोविंदपंत*** : भात खरेदीबद्दल (२३७६१).

**केशव*–गोविंदपंत आपटे** : वासुदेवपंत गोगटे सांगतील त्याप्रमाणे काम करून द्यावे म्हणून (२३८६९).

**गिरमाजी विश्वनाथ–रावसाहेब*** : आछोनी येथे बापूच्या फौजेने दिलेला उपद्रव (२३७८२).

**तलागडकर–बापूजी मेणे मासगांव, महादजी फडके सिरवली :** वेटबेगार व साज, चुडी असे न देण्याबद्दल पाली येथे श्रीमंतानी सनद दिली असताही तलागड येथील महालकरी करीत असलेला तगादा (२३७३८).

**दादो गणेश साठे–नारोपंत*** : हरीपंताकडील ऐवजाबद्दल व रसदेच्या ऐवजाच्याबद्दलचा तगादा, ७ ज. वल, सु. ११९५/१ नोव्हेंबर १७९४ (२३७५६).

**द्वारकोजी*–रबोजी घारगे व त्रिंबकजी खरमले :** शिरगांव येथील गावकऱ्यांनी वसूल दिल्याने त्यांस ऐवजाचा तगादा न करण्याबद्दल (२३७२६).

**धोंडो विश्वनाथ–रावसाहेब*** : वरातेची भरपाई न झाल्यास मामलत काढून घेतली जाईल म्हणून प्रेषकास भिती, कृष्णराव गोविंद याच्याशी बुंदेल्यांचा तंटा (२३७६२); बुंदेल्यांकडून झालेल्या पारिपत्याबाबत निवेदन व कृष्णाजीपंत यांच्या देणे ऐवजाबाबत (२३७६३).

**नागोजी देवकर–लक्ष्मण शंकर** : रोजमुऱ्याच्या ऐवजाची पोंच (२३७७७).

**परशराम रघुनाथ–भाऊ* व बापू*** : राणीपुरा येथील वसुलासंबंधी निवेदन (२३७५५).

**पांडुरंग नानाजी–मोरोपंत* व बाबूराव*** : रेटवड येथील शेतसाऱ्याच्या ऐवजाची मागणी (२३७७६).

**पार्वतीबाई*–बाबा*** : बाबूराव याजबरोबर घरी असलेली चीजवस्तू पाठविण्याची विनंती (२३८४४).

पत्रे चालू :

**भगवंत बाळकृष्ण–आप्पा*** : केडगांव येथील अमलाबाबत व मदरुलकर गावकरी अमलास करीत असलेला बखेडा, शेलगांवकर जमेदार व महालकरी यांना कुरल्यांत अडकविल्याबाबत (२३८७७–२३८७८); **–जनोबा भाऊ आगाशे** : किरकोळ मजकूर (२३८७९).

**भवानीराव*–गोविंदपंत तात्या आपटे** : सुभेदाराकडील पैसे वसुलीसाठी पत्र पाठविण्याची विनंती (२३८७०).

**महादजी नीलकंठ–बाबासाहेब*** : आकोले व गोदे येथील जमिनीची जप्ती करून पडिक जमिनीची लावणी करून शिवेच्या जमिनीचा निवाडा करण्याविषयी (२३७४४).

**मोरो हरी–हरीपंत*** : आप्पाजी बल्लाळ याजकडून सिवनेचा मक्ता घेत असता कुणबावेकरी भरड जमिनीच्या शेतीचे घेत असलेल्या उत्पन्नाबाबत तक्रार व त्याबाबत श्रीमंत शास्त्रीबावांचे पत्र देण्याबद्दल (२३८७१).

**रघुनाथ सदाशिव केळकर–बाबा चोळकर** : भाजीसाठी केळ्याची रवानगी (२३८३४).

**रंगो गुरुनाथ–सुभेदार*** : पांडववाडी येथे नेलेले कागद व हुंडी यांची पोंच (२३७४३).

**रामचंद्र सिधेश्वर गुमास्ते–भगवंतराव देशपांडे :** कर्डे येथील कमाविसदारांनी जमीनदारांच्या चहाड्या करून वतनाच्या जप्तीची चिठ्ठी आणल्याचे निवेदन (२३७४८).

**रामचंद्रराव काळे–वासुदेवपंत*** : कारखड येथील कराच्या ऐवजाची पोंच (२३७४२).

**रामाजी शिवराम–अकोपंत*** : नाडगौडीच्या ऐवजाची पोच (२३८७५).

**व्यंकटराव नारायण–पांडुरंग नाईक** : गणेशपंत हशमनीस यास द्यावयाच्या वस्त्राबद्दल (२३७२३); हणमंत लक्ष्मण यास धोतरजोडा दिल्याबाबत, १० रजब, सु. १२६१/२२ जाने. १८६१ (२३७२५); गिर्याप्पा देसाई यास द्यावयाच्या वस्त्रांचा तपशील (२३७८१).

**वासुदेव विश्वनाथ–आबा*** : आमदाबादकर पवार याजकडील नेवासे येथील जप्तीची मनाचिठ्ठी देण्याची विनंती (२३७४५).

**विनायक दामोदर–आण्णा*** : मक्त्याने असलेले गांव उजाड झाल्याचे निवेदन व त्या गांवाची मक्त्याची चिठ्ठी नव्या सुभेदारास न देण्याची विनंती (२३८७२).

**विसाजी खंडेराव–रावसाहेब*** : शिवाजी विठ्ठल याच्या फौजेकडून होत असलेल्या उपद्रवाबाबत (२३७६४); जमाबंदीच्या वसुलाबद्दल (२३७६५); बुंदेले याजबरोबर तह ठरला नसल्याबद्दल (२३७६६); तालुक्याच्या वसुलाच्या अडचणीबद्दल निवेदन (२३७६७).

**शंकराजी हरी–रावजी*** : मौजे मुररिया येथील वसुलीस प्यादा पाठविण्याची विनंती (२३८७४).

**शिवराम ज्योती–बापू पवार** : सांगितलेले जिन्नस शिर्के याजबरोबर पाठविणे (२३८३२).

**सोयराजी अवधूतराव–गोविंदपंत* तात्या*** : गांव उजाड झाल्याने रसदेच्या ऐवजात सूट देण्याची विनंती (२३७५८).

रुमाल क्र. ४५, पुडके क्र. ७–पत्रे चालू :

**हणवंतराव भापकर–नरसोजी पाटील :** निंबाळकर याजकडील जामखेड परगण्यांतील गांवांच्या जप्तीची कमाविशी सरकारातून दादो गणेश यास सांगितल्याबद्दल (२३७४६).

[ **फक्त प्रेषकांचा नामोल्लेख असलेलीं** ]

**गोविंद*** – ( – ) : राघो नारायण याजकडील नेरळपैकी बाकीचा ऐवज बाळाजी ठोसर याजकडे कुरणाच्या गवताच्या मजुरीसाठी लावून दिल्यासंबंधी (२३८६८).

**वागसिंग चंदेल*** – ( ) : आपदेव यास घोड्याची अगर गाडीची परवानगी द्यावी म्हणून (२३७१०).

**बापूजी बल्लाळ जोगळेकर** – (—) : माटवण गावच्या जप्तीबाबत व मोकळीक करण्याबाबतचा खुलासा (२३७४७).

**बाळा*** – (—) : अजमासास धोंडोपंताचे नांव लावण्याची विनंती (२३८९५).

**बाळाजी महिपतराव*** – (—) : चढ देऊन मामलत करण्याबाबत (२३७५३).

**भगवंत सिधनाथ*** (—) : नाईक यास स्वतःबद्दल विचारण्याची विनंती (२३८५५).

**महादजी बल्लाळ*** – (—) : माहुली किल्यावरील नव्या लोकांची पहाणी करण्याची विनंती (२३८८२).

**मोरोबा*** – (—) : गोपाळपंत यांच्या मुलाच्या लग्नासाठी श्रीमंतानी बक्षीस दिलेल्या तांदुळाची वरात व कापडाची चिठ्ठी देण्याबाबत (२३८९६).

**मोरो गोपाळ बिवलकर, वासुदेव बहिरव पोंक्षे** – (—) : कमळगड व जोरखोरे येथील अजमास रवाना (२३७६०).

**रघोत्तम हैपतीराय** – (—) : वाजे येथील पाटलाकडून कृष्णराव देवाजी याचा फडशा न होताच पाटलास निरोप दिल्याबद्दल (२३८९३).

**राघोराम*** – (—) : सरकारांत पाठविलेल्या गाईची पोच (२३८२६).

**लक्ष्मण बल्लाळ** – (—) : आकाबाई व बापू यांच्यासह सुखरूप पोहोचल्याचे वर्तमान (२३८५८).

**वामनाजी नारायण*** – (—) : घरगुती मजकूर (२३७१५).

**हरी बल्लाळ** – (—) : बाजींपंत किरमिरे यांनी पाठविलेला गारद्यांच्या वरातेचा ऐवज सत्वर पाठवावा म्हणून (२३७७०).

**हरी बाबाजी** – (—) : श्री बनेश्वरी सांगितलेली सेवा मान्य असून त्यासाठी खर्चास २०० रुपये दिल्याबद्दल (२३८८३).

[ **फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेलीं** ]

(—) – **अंताजीपंत*** : तांदळीच्या कतब्याची व गोविंद मल्हार याजपासून घेतलेल्या हुमी पत्राची मागणी (२३७३२).

(—) – **चिंतोपंत तात्या***, **कुशाबा आण्णा*** : दसरच्या जासुदांच्या ऐवजाची वरात रामाजी रघुनाथ याच्या वेतनाच्या ऐवजी दिली असल्याबद्दल (२३७६९).

पत्रे चालू :

(—) – **चिमणाजीपंत आण्णा लेले** : मोरा माहात याजकडील पागेची वरात घेतली असल्यास पाठविण्याची विनंती (२३७१७).

(—) – **जनार्दनपंत*** : किरकोळ (२३८२९).

(—) – **तात्या*** : ओझर्डे येथून आल्यावर खोलीत राहिलेल्या रुमालाचा बंदोबस्त केल्याबद्दल, खंडापाकडील पैसे वसूल होत नसल्याबद्दल (२३८८८).

(—) – **दादा*** : काशीबा नाईक याच्या घरी झालेल्या चोरीबद्दल, वाई येथे पाऊस पडल्याने तेथील बाजारभावासंबंधी वर्तमान (२३७५७).

(—) – **दिनकरपंत तात्या*** : पांडुरंगपंत आबा याजकडील लखोट्याची रवानगी (२३७७२).

(—) – **नारोपंत नाना*** : आज्ञेप्रमाणे वर्तणूक करीन म्हणून (२३८२३).

(—) – **बगाजीपंत भाऊ*** : शिवाजी थोरात याजकडील पत्राची रवानगी (२३८८७).

(—) – **बळवंतराव*** : गोपाळराव केशव याजकडील मामलत शेषाद्री गोविंद यास देण्याबाबत (२३७७३).

(—) – **बापू*** : बाळाजी गिर्मे याच्या जप्याच्या जमीन वाटणीबद्दल (२३७७१); खाजगी मजकूर (२३७७८); थलझाड्याची मागणी (२३८०७); बाबासाहेब कमिशनर यांच्या आगमनाची चौकशी (२३८२२); हद्दीचा थलझाडा सत्वर पाठविण्याची विनंती (२३८७६).

(—) – **बापू सरनाईक** : जगताप याजबाबत वरातेचा पावलेला ऐवज लिहून पाठवावा म्हणून (२३७१९).

(—) – **बाबा चोळकर** : शिवराम याच्या लग्नाबद्दल विचार विनियम (२३८३५).

(—) – **बाळाजीपंत*** : कोऱ्या कागदाची मागणी (२३८६४).

(—) – **भिकाजीराम भिडे** : कर्जाऊ ऐवजाबद्दल द्यावयाच्या कापडापैकी द्वारकोजी निंबाळकर याजकडील शिलेदारांना कापड देण्याची आज्ञा (२३७७९).

(—) – **माणको*** : इमारतीच्या कामासाठी शंभर रुपयाची रवानगी (२३८३०).

(—) – **रामकृष्ण गोविंद*** : उंट, भाजी वगैरे जिनसा पाठवून द्याव्या म्हणून (२३८२७).

(—) – **रावजी* व देशमुख** : पुण्याच्या लखोट्याची पोच व पुण्याहून आणखी कागद आल्यास ठेवून घेण्याची विनंती (२३८९४).

(—) – **लक्ष्मण*** : खुर्चीबद्दलच्या पैशाच्या देण्याघेण्याबाबत (२३८४५).

रुमाल क्र. ४५, पुडके क्र. ७-पत्रे चालू :

(—) – **लक्ष्मणपंत देशमुख :** रुप्याचा देव्हारा व आंब्याची पोच (२३७८०); मखलाशीची यादी पाठविण्याची विनंती (२३८२५); रुप्याच्या समया पुण्यास रवाना कराव्या म्हणून (२३८६२).

(—) – **शिवरामपंत भाऊ* :** गोविंदपंत केतकर याजबरोबर सरकारी तिजोरीत भरण्यासाठी मोहरा पाठविण्याची विनंती (२३७३०).

(—) – **सवोबा* :** सूर्याजी डोंगरा याच्या रोजमुऱ्याबद्दल (२३८८९).

[प्रेषक वा प्रापकांचा नामोल्लेख नसलेली]

लष्करच्या गोटाभोवती रात्री पहाऱ्यासाठी होळकर अगर भाऊ यांजकडील फौज सांगण्याची विनंती (२३७०७); मुल्हेर येथील बंदिवानाचा झाडा पाठविण्याबद्दल (२३७०८); महादाजीपंत साबणे याच्या चाकरीबद्दल निवेदन (२३७०९); सन १७६९ मधील असलेली जमा लिहून पाठविण्यबद्दल (२३७११); मुनीम यास लिहिलेली चिठ्ठी कडक असल्याबद्दल (२३७१२); मुखेड येथील मामलत कोणाचे नांवे आहे ते लिहून पाठविण्याबद्दल (२३७१३); रोजमुऱ्याची पोच (२३७१४); बाबूराव हरी शिलेदार यास उरवडे येथील शेत सनदेपैकी सदाशिव पंडित सचीव याजकडून दिलेल्या ऐवजाबाबत (२३७१६); कडबा पाठविण्याची विनंती (२३७१८); रावे व वोवले येथील रसदेबद्दल झालेला ठराव लिहून पाठविण्याबद्दल (२३७२०); नेरळ येथील बाकीच्या रुजुवातीस कारकून देण्याच्या करारासंबंधी (२३७२१); आबासाहेब यांस जमीन इनाम आहे की सरकार खालसा आहे याबाबत चौकशी (२३७२२); सणगे रवाना (२३७२४); तोफखान्यापैकी दारुगोळा ऐवज वगैरे पाठविण्याची विनंती (२३७२७); खाजगीपैकी पीलखान्याकडे पावलेल्या जिनसांच्या रुजुवातीस कारकून पाठवावा म्हणून (२३७२८); नारायण पंढरपूरकर यास सासवडच्या पट्टीपैकी धर्मादाय ऐवज द्यावा म्हणून (२३७२९); मोरो हरी याजकडील कुणबिणीने चौकीच्या गारद्याकडे ठेवावयास दिलेल्या नगाच्या चौकशीबाबत (२३७३१); विश्वंभर परदेशी व मणिराम यांच्यातील पैशाबाबतचा तंटा (२३७३३); मणिराम व भागीरथ किराड हे लिंगरवाडा पो मेलसे येथील सरकारी बाकी घेऊन पळून गेल्याबद्दल व पाली येथील रामचंद्र कराड याजकडे सुरवास येथील नंदराम कराड याचे असलेल्या कर्जाबाबत (२३७३४); गोपाळ जिवाजी बडवे यांचा वाडा व इतर मालमत्तेबद्दल पांडुरंग व दादा जिवाजी बडवे यांचा तंटा (२३७३९); जगजीवन माधवराव यांच्या जोगेश्वरीनजीकच्या वाड्यात नानांनी ठेविलेल्या थत्ते यास जागा खाली करण्याबद्दल तगादा (२३७४०); पुणे सुभ्याकडील व जकातीकडील अमलाबाबत (२३७४९); उमरखेड येथील हिशेबाची मागणी (२३७५०); जगजीवन पवार याजकडील देपूर येथील बाबती, सरदेशमुखी व मोकाशाची कमाविशी जप्त करून रामचंद्र गणेश याजकडे दिल्याबद्दल (२३७५१); हरसूल व सातारे येथील अजमास करून घ्यावे म्हणून व सुमंत याजकडील बाबतीच्या ऐवजाच्या वसुलीबद्दल (२३७५२); राजापूर येथील पेठेचे काम बाळकृष्ण हरी याजकडून दूर करून दुसऱ्यास सांगितल्याबद्दल (२३७५४); दादासाहेबांकडील रसदेच्या ऐवजाच्या वरातेची नक्कल पाठविण्याबद्दल (२३७७४); सांगितलेल्या आज्ञेप्रमाणे सावधगिरीने असण्याबद्दल (२३७७५); हकीमजीचे मुलाकडील तफावतीच्या ऐवजाचा तपशील (२३७८३); मोरो गिरमाजी यास तिर्थविधीसाठी खर्चास देण्याबद्दल (२३७८७);

पत्रे चालू :

आप्पाजी शंकर सरनाईक यास रोजमुरा देण्याबद्दल (२३६९०); सोमाजी काळे यास तिर्थविधीसाठी खर्चास देण्याबद्दल (२३७९१); मालोजी निकम यास रोजमुरा देण्याबाबत (२३७९२); नारो गोविंद मराठे याजकडील मुर्डी येथील मामलत दूर न करण्याबद्दल (२३७९४); चिंतामणभट गोखले याजकडील पुणे येथील गणपतीच्या नेमणुकेबद्दल (२३८०६); बेडेकर व गोखले यांच्या खटल्यासंबंधीच्या कागदपत्रांची मागणी (२३८०८); कृष्णाजीपंत मेहेंदळे यास चिठ्ठीप्रमाणे ऐवज देण्याबाबत (२३८०९); छपावणीच्या कागदासंबंधी (२३८१०); उमेदवारास काय द्यावयाचे त्याचा खुलासा करावा म्हणून (२३८११); कतबा लिहून देण्याबाबत (२३८१२); सत्वर येत असल्याबद्दल (२३८१३); बापूजी खलनाथ याजबरोबर ऐवज पाठविणे (२३८१४); वासुदेव कृष्ण यास चाकरीस ठेवण्याची विनंती (२३८१५); गोविंदराव बापूजी व माधवराव गंगाधर यांचा आदा (परगण्याची खंडणी वसूल करण्यासाठी आलेल्यास गावकऱ्याकडून मिळावयाचे हक्क व बस्त्या) लिहून देण्याबद्दल (२३८१६); बाबूराव हरी यांची दस्तके दाखल झाली असल्याबद्दल (२३८१७); फौजेस पावलेल्या नालबंदीच्या ऐवजाचा परवाना लिहून पाठवावा म्हणून (२३८१८); प्यादा बोलवावयास आल्यास लष्करात गमन (२३८१९); रोजगाराच्या सोयीबद्दल विचारणा (२३८२०); रुप्याची रवानगी (२३८२१); जवाहिरखान्याकडे सत्वर ऐवज जमा करण्याची विनंती (२३८२४); धारवाड येथील फौजेच्या रोजमुऱ्यासंबंधी (२३८२८); देवळे येथील शेताचे वर्तमान व त्याबद्दल काळजी करू नये म्हणून सांगणे (२३८३१); कृपादृष्टी ठेवण्याची विनंती (२३८३३); खेमाजी मोरे याचे नांवे पंचेचाळीस आखाची दिलेली चिठ्ठी हरवल्याने दुसरी देण्याची विनंती (२३८३६); येथील मजकूर कोणास कळू नये म्हणून (२३८३७); घरचा समाचार घेत जाण्याची विनंती (२३८३८); रुईच्या मोळीची पोच (२३८३९); खंडेराव पोळ यास भेटण्याची विनंती (२३८४०); बस्त्याचा ऐवज रवाना (२३८४१); मर्जीस येईल तेव्हा भेटू म्हणून (२३८४२); निवांतपणे भेटण्याची इच्छा (२३८४३); राजारामपंत यांनी गोपाळ दादाजी यास लिहिलेल्या पत्राचे उत्तर पाठविण्याची विनंती (२३८४६); श्री सांब व नरनारायण यांच्या नव्या केलेल्या पालखाबाबत (२३८४७); रामचंद्रपंत यांच्या आगमनाची वार्ता (२३८५०); जानोजी भोसले व रामाजी बल्लाळ यांच्या संबंधीच्या पत्रांची मागणी (२३८५१); आज्ञेप्रमाणे पत्राची रवानगी (२३८५२); सुतार, गवंड्याजवळ हत्यारे नसल्याने काम अडल्याने हत्याराची मागणी (२३८५३); नवीन झाडे लिहावयाबाबत व मदगढीच्या पानाची मागणी (२३८५४); सासवड येथील पिशा महार याचे म्हणणे ऐकून त्याचे काम करण्याची विनंती (२३८५६); मसाल्याचा ऐवज देण्याबद्दल मागणी (२३८५७); येण्यास विलंब लागल्याच्या अपराधाबद्दल क्षमा करण्याची विनंती (२३८५९); कागदाची मागणी (२३८६०); मुलूख उज्याड झाल्याचे निवेदन (२३८६१); खर्चाची बेगमी करण्याची विनंती (२३८६३); कडुसकरांची यादी करण्याची विनंती (२३८६५); रामशास्त्रीच्या वेळचे न्यायाधिशाकडील वतनसंबंधी कागदाच्या रुमालाची मागणी (२३८६६); विश्वासरावजीकडील पाहुणचार चांगला असल्याचे निवेदन (२३८६७); मौजे तुलसी येथील मानपान, हक्क वगैरे गव्हाणे याजकडे चालू करण्याबाबत (२३८७३); श्री भवानराव व पटवर्धन याजकडील राऊतांचे येरंडोल येथे झालेल्या तंट्याबाबत (२३८८०); भाऊबरोबर पाठविलेल्या पत्राची पोच (२३८८१);

रुमाल क्र. ४५, पुडके क्र. ७–पत्र चालू :

शिवाजीराम कमाविसदार व राघो शिवराम यांना पाठविलेले पत्र वगैरे कागद घेऊन आज्ञेप्रमाणे जासूद रवाना (२३८८४); कुचामुळे चोपदारास येण्यास उशीर (२३८८५); सरकारांत न्यावयाची वरकड चीजवस्तू दोघांचे विचारे नेऊ म्हणून (२३८८६); उडिया येथे जाण्याची आज्ञा (२३८९०); घरगुती मजकूर (२३८९१); धरलेल्या चोराकडील सनगे ठेवून घेण्याबाबत (२३८९२); सरकारी कहीबरोबर कही पाठवित असल्याबद्दल (२३८९७); पावस्याच्या शेंगा रवाना व पुण्यास पाठविलेली सासवड येथील इनामपत्रे परत पाठविण्याबद्दल (२३८९८); सातारच्या सनदा व जासुदाच्या रोजमुऱ्याची यादी हे सबनिसाचे स्वाधीन केले असल्याबद्दल (२३८९९); जवाहिरखान्यांत गेलेली लोकांची चीजवस्तू यादीप्रमाणे त्याची त्यास देण्यासाठी केव्हा येणार म्हणून विचारणा (२३९००).

यादी :

मुदबखान्याकडे द्यावयाच्या सामानाची (२३७८४); लक्ष्मण नागनाथ याजकडे असलेल्या सरकारच्या घोडे व उंटांच्या चंदीच्या बेगमीची (२३७८५, २३७८६); शितोळे नाहवीकर याजकडील निरोपाची वस्त्रे द्यावयाच्या लोकांची (२३७८८); फरासखान्याकडील रसूलखान मृत्यु पावल्याने त्यास द्यावयाच्या खर्चाची (२३७८९); भिकाजी महादेव याजकडील पागेतील लोकांना, खासदारांना द्यावयाच्या रोजमुऱ्याची (२३७९३).

रसानगी याद्या :

[ फक्त प्रापकाचा नामोल्लेख असलेलीं ]

( — ) – रावसाहेब* : श्रीपतराव गणेश यांच्या मामलतीच्या रसदेच्या येणे असलेल्या कर्जाबद्दल भगवंतराव त्रिंबक याच्याशी तंटा ( २३८०३ ).

रसानगी याद्या चालू :

[ प्रेषक वा प्रापकांचा नामोल्लेख नसलेल्या ]

भुईंज येथील कामकाज रामाजी जाधव यांनी अमृतराव थत्ते यांचे हवाली केल्याबाबत ( २३७९५ ); विसाजी नारायण याची गोकाक येथील फडणिसीची नेमणूक पूर्ववत् चालू ठेवण्याबद्दल ( २३७९६ ); कृष्णराव जयराम बापट यांच्या वाई येथील घरून नेलेल्या कुळास स्वाधीन करावे म्हणून भाऊ पैठणकर यास पत्र ( २३७९७ ); विठू मिलारे याची बायको त्याचे स्वाधीन करण्याबद्दल कोरीगड येथील हवालदारास पत्र ( २३७९८ ); राजगोपाळ हत्तीस चंदी, वैरण देण्याबद्दल ( २३७९९ ); मोरघर हा गांव जिवाजी आप्पाजी याजकडे धर्मादाय दिल्याबाबत ( २३८०० ); तान्हाजी शिर्के याजकडील पौडखोर येथील वतनी, इनामी व सरंजामी गांवाच्या वसुलाबद्दल ( २३८०१ ); त्रिंबक सूर्याजी याजकडील मावळे लोक राजाराम गोविंद याजकडे चाकरीस पाठविल्याबद्दल ( २३८०२ ); खानदेश व गुजरात येथील कमाविसदाराच्या फाजिल ऐवजाच्या महालोमहालीच्या जमीनदारीच्या रुजुवातीसाठी हरी नारायण याची रवानगी ( २३८०४ ); बापू याजकडे मानूर येथील पागेच्या सरंजामास असलेले गांव विश्वासराव याजकडे दिल्याबद्दल ( २३८०५ ).

वरात :

[ फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेलीं ]

( — ) – शिवरामपंत आप्पा* : सरकारांत भरावयाच्या ऐवजाची काशी बल्लाळ याजकडील गारद्यांना द्यावयाच्या ऐवजावर ( २३७६८ ).

* संपूर्ण नांवाचा अर्थबोध होत नाही.

## रुमाल क्रमांक ४६, पुडके क्रमांक १ ते ३

पुडके क्र. १ — सु. स. ११५०–१२४३

का. सं. १५० (२३९०१ – २४०५०) — इ. स. १७५०–१८४३

कतबा :

**पाटील कुलकर्णी, सावडी – जनार्दन सुभेदार, ता बदामी :** पर्जन्याअभावी न देता आलेल्या जमाबंदी ऐवजाची व्याजासुद्धा फेड करण्याबाबत, २६ ज. खर, सु. १२१५/५ जून १८१५ (२४०४१).

जामीन कतबा :

**राणोजी महाडीक – सुभेदार मच्छिंद्रगड :** काशीबा वालोजी महाडीक व लक्ष्मण धनगर यांचे शेताचे खटल्यात काशीबा यास, २७ र. वल, सु. १२१४/२० मार्च १८१४ ( २३९१७ ).

पत्रे :

**अप्पाजी दामोदर – पांडुरंग आप्पाजी :** भेटीकरितां त्वरित निघून येण्याची आज्ञा ( २३९४३ ).

**अप्पाजी नरसिंह देशपांडे – विराप्पा कडतन :** शहापूर येथील ठाणे हवाली झाले त्याबाबत निवेदन ( २३९९८ ).

पत्रे चालू :

**अप्पाजी जोशी गोलदकर – भाऊ गोखले :** सौ. आवडाबाईने नवी वस्त्रे व दागिने घेऊन दिल्याबाबत, श्रावण शु. १, शके १७३९ / १३ ऑगस्ट १८१७ ( २३९६५ ); कौटुंबिक खुशालीचा मजकूर, २३ रमजान, सु. १२१८ / ७ ऑगस्ट १८१७ (२३९६६); जिन्नस पाठविले ते मिळाल्याबाबत ( २३९७३ ).

**अप्पाजी नारायण, किल्ले परळी – तात्या* व बापू* :** आज्ञेप्रमाणे अमीनखान मेवाती याची पुण्यास रवानगी, दरकदार वगैरेंच्या जप्त्या जरा सबुरीने करण्याचा सल्ला, रावजी कारखानीस व बापाजी मल्हार यांचेकडे समेटाची बोलणी, २० सवाल, सु. १२१५ / ५ ऑक्टोबर १८१४ (२३९१३).

**अप्पाजी नारायण बर्वे – बाळाजीपंत आटपाडीकर :** भाऊराव मराठे यांजकडे कांही कामानिमित्त पाठविलेल्या जासुदास रुपये देण्याबाबत ( २४०३९ ).

**अप्पाजी बल्लाळ – पांडुरंगपंत* :** घरची कामे उरकून त्वरित येण्याची विनंती (२३९४८).

रुमाल क्र. ४६, पुडके क्र. १-पत्रे चालू :

**अप्पाजी शामराव – मोरोपंत दादा*** : आपण कोकणांत जाऊन आल्यानंतर येथील राहिलेल्या कामासंबंधी बोलणी करण्यांत येतील याविषयी ( २३९९० ).

**अंताजी केशव बेहरे – राणोजी बलकवडे** : वरसवलीस जाण्या-करितां थलचे बंदरी मागितलेला हाजीर जामीन देत असल्याबाबत ( २३९०४ ).

**आनंदराव रत्नाकर जोशी – रावजी*** : महादाजी काका यास देवाज्ञा झाल्यासंबंधी व इतर घरगुती मजकूर ( २४०२९ ).

**आबाजी बल्लाळ, सुभेदार ता। अवचित – उंदरेकर** : मौजे वावे येथील कबाईचे कारखान्यांसाठी येणारी गलबते वागसेतच्या बंदरी लावणे, १८ र. वल, सु. ११७७/२७ एप्रिल १७७७ ( २३९२१ ).

**आवजी* – नारायण*** : प्रकृति स्वास्थ्याकरितां पुण्यास येण्याबाबत ( २४०३३ ).

**केशव महादेव – आत्मारामपंत दाजी*** : वस्तभावाची चौकशी करून नंतर पाठवू म्हणून व या प्रांतांत फौजेचा बंदोबस्त झाल्यावर वर्तमान लिहून पाठवू म्हणून निवेदन ( २४००८ ); – **दादासाहेब*** : वर्तमान वेळोवेळी पाठवीत असल्याबाबत ( २४०३४ ).

**गणेश बल्लाळ ओक – विठ्ठलपंत*** : धनाजीराव मोहिते याच्या दिमतीत ठेविलेल्या रामाजी गाडे याची कुटुंबीय मंडळी किल्यात येणार आहेत तरी त्यांचा बंदोबस्त करणे ( २३९८८ ).

**गणेश बहिरव – वीरप्पा धामणे** : सुंदरबा या स्त्रीने उसने घेतलेल्या ऐवजाच्या तक्रारीबाबत चौकशी करण्याविषयी, फसली १२५२/१८४२-४३ ( २३९९३ ).

**गणेश बाबूराव अभ्यंकर, कोथळे – गोविंदराव भिडे** : गावात गडकऱ्यांची स्वारी येणार होती त्यामुळे लग्नास येऊ शकलो नाही ( २४०१४ ).

**गोपाळ नारायण – कारखानीस** : किल्याची सबनिशी विठ्ठल पांडुरंग याजकडे दिल्याचे वर्तमान, जाधव याजबरोबर काही बोलणी झाली हे वर्तमान खोटे असल्याबद्दल ( २३९३७ ).

**गोपाळ विठ्ठल कर्वे बाळाजोपंत–हवालदार** : तांदूळ किल्यात रवाना करीत असल्याबाबत ( २४०१० ).

**गोविंद नरसिंह – आण्णा स्वामी*** : पागोटी पाठविली असून पोषाख नंतर पाठवू असे निवेदन ( २३९३० ); कापड वगैरे माल जसजसा येईल तसतसा रवाना करण्याबाबत ( २३९३१ ).

**गोविंद नारायण खत्री – आप्पाजीपंत गोसावी** : गोपाळ तुकाजी याच्या पेटीच्या चाव्या सरकारांत दिल्या होत्या त्या पोहोचल्याबाबत ( २३९०९ ).

**गोविंदराव दाभणे – राणोजी सुभेदार, उंदेरी** : निरोप घेऊन मुंबई येथे सुखरूप पोहोचलो असल्याबद्दल ( २३९३३ ).

**चिटको गोविंद, आवस – सुभेदार*** : आज्ञेप्रमाणे मानाची जप्ती केली त्याचा तपशील व सासवणे येथून भात नेण्याकरितां गलबताची वगैरे व्यवस्था करण्याची विनंती ( २३९५१ ).

पत्रे चालू :

**चिमणभट पेठ्ये–गणेशभट*** : माहुली येथील घाटाचे खर्चाकरितां विसाजी लक्ष्मण आपटे याजकडून घेतलेल्या ऐवजाची फेड करण्याबाबत, श्रावण व २, शके १७३९/२८ ऑगस्ट १८१७ ( २३९६१ ).

**चिमणाजी मोरेश्वर – भाऊ गोखले** : पत्रोत्तर पाठवून उपकृत करण्याची विनंती ( २३९६३ ).

**त्रिंबक नारायण गोडबोले, अवचितगड – बाळाजी विश्वासराव** : श्रीमंत परशरामाहून महाड येथे आल्यानंतर पुढच्या कार्यक्रमाचा वृत्तांत पाठविता येईल म्हणून ( २३९१२ ).

**दिलेवरखान समशेर बहादूर – तिमाजी पंडित** : आज्ञेप्रमाणे मुसे लाली व प्रेषक चेंजीस ( जिंजी ) जात असता घडलेल्या तपशिलाचे ( २३९७८ ).

**धारसी देसाई, मुंबई–सुभेदार*** : मचव्यातून आलेल्या तांदुळाची विक्री, श्रीमंत दादासाहेबांचे आगमन ( २३९३२ ).

**नारो बल्लाळ रानडे – विनायकराव देशमुख** : प्रचितगड येथील बंडवाल्यांचा बीमोड करण्याकरितां जदीद लोक नेमले त्याचा तपशील देणारे ( २४००१ ); प्रचितगडकरी यांनी संगमेश्वर व कोडिवरे महालावर रोखे केले आहेत तरी उपद्रव शमनार्थ जादा कुमकेची मागणी ( २४००२ ).

**परशराम गणपतराव – हरी सदाशिव** : मौजे वसगडे येथील जमाबंदी अवर्षणामुळे जरा सबुरीने करणेबाबत, २३ रमजान, सु. १२३५/२३ जानेवारी १८३५ ( २३९९६ ).

**बाजी गोविंद परांजपे – विनायकराव देशमुख** : परगणे साकसे पैकी निटकोपंत लिमये याजकडून वसूल न झालेल्या ऐवजाची वसुली करण्याबाबत, श्रावण शु. ५, सु. १२१८/१९ जुलै १८१७ ( २४०४९, २४०५० ).

**बापूजी गणेश – रामचंद्र सुभेदार** : पालखीचे सामान तयार असल्याबद्दल, रामचंद्र पंत, हरीभाऊ वगैरे लोकाकडील हुंड्यांचे ऐवज व्यवहाराबाबत, १० र. वल, सु. १२१५ / २० फेब्रुवारी १८१५ ( २४०४७ ).

**बापूजी बेहरे – महाराज*** : रोजमुरा ऐवजाची पोंच, शके १७३३/ १८११–१२ ( २४०४४ ).

**बाबाजी नारायण गोगटे – रावजी*** : जुन्नरच्या स्वारीचा शिल्लक ऐवज परत देत असल्याबाबत, स्वतःच्या तैनात ऐवज वळता करून घेण्याची विनंती, द्रव्य सहाय्य करण्याची विनंती ( २३९११ ).

**बाबूराव बल्लाळ पेठे, येरंडोल – मोरोपंत दादा*** : बापाजी गोसावी वगैरे ब्राह्मणाकडून येणे असलेल्या सरकारी ऐवजाची वसुली, महागाई फार असल्यामुळे जरा सबुरीचे धोरण स्वीकारण्याची विनंती, ६ मोहरम, सु. ११७०/३ मे १७७० ( २३९२४ ); ब्राह्मणाकडून वसुली करण्यातील अडचणींचे निराकरण करण्याची विनंती ( २३९२५ ); प्रांत बेटावद येथील वसुलीतील अडचण, वसुलातील अडचणींचे निवेदन व वसूल सुकर होण्याकरितां ताकीदपत्रें पाठविण्याची विनंती, २९ मोहरम, सु. ११७०/२६ मे १७७० ( २३९२६ ).

**बाबूराव शिवराम – मोरोपंत*** : आबाजीपंत यास कामाचे स्वरूप समजावून देऊन पाठविले आहे तरी ते लक्षांत घेऊन काम करणे (२४००६).

**बाळकृष्ण पुतळाजी, नागोठणे – सुभेदार, उंदेरी** : उसने घेतलेल्या भाताची गणेश अनंत भिडे याचे मार्फत हवाला देऊन परतफेड (२३९५०).

**बालाजी कृष्ण ठोसर – बाबूरावजी*** : आज्ञेप्रमाणे आप्पाजीपंत याजला मौजे निंबोज येथील सनद (२३९२२).

**बालाजी गोविंद – चिटकोपंत गोसावी** : ब्राह्मणाकडील भात जप्त न करण्याच्या सूचना (२३९४२).

**बालाजी नारायण – रामचंद्र दादा*** : नारायणराव ढमढेरे यांच्या मोकाशाचे मामलतीवर नीळकंठराव याची जप्ती आल्याबाबत (२४०१२).

**बाळाजी बाबूराव – आबा*** : कारखान्याचे रखवालीतील धाकोजीराव राणे व आप्पा सावंत यांचे लोक पुण्यास पाठवून देण्यासंबंधी, २३ साबान, सु. ११९९/३० जानेवारी १७९९ (२४०१७).

**भास्कर शिवदेव – पांडुरंग भास्कर** : कृष्णंभट केशवभट विश्वांस यास नवीन वर्षासन नेमणूक ऐवज सावनूर तालुक्यातून नेमून दिल्यामुळे त्याप्रमाणे ऐवज देणे, १२ सवाल, सु. ११९२/१५ जून १७९१ (२३९९७).

**भिकाजी शंकर दामले – व्यंकोबा नाईक सिराळकर** : किले मच्छिंद्रगड येथे अकराशे रुपयाच्या हुंड्या दिल्या त्याची भरपाई करण्याबाबत, माघ व. ३, शके १७३५ / ७ फेब्रुवारी १८१४ (२३९१५).

**महादाजी आप्पाजी आठवले – तात्यासाहेब*** : कुशल पत्रोत्तर करण्याची विनंती (२४०३०).

**मोकदम, पाडळी – दादासाहेब*** : हिमतबहादर, बाबूखान यांचेकडे व तोफखान्याकडे गवत गेल्यामुळे आता गवताची मागणी करू नये व इतरास परवानगी देऊ नये म्हणून, माघ व. ३०, सु. ११९९/ ६ फेब्रुवारी १७९९ (२४०१५).

**यशवंत नथोजी नायेगावकर – राघोपंत दादा*** : आर्थिक मदत करण्याची विनंती (२४०३६).

**योगाबाई* – भाऊ गोखले** : स्वारीसमागमे असलेल्या हरी भाऊ मामाजी याच्या स्त्रिया कोणीकडे गेल्या याबाबत विचारणा, २६ रमजान, सु. १२१८/१० ऑगस्ट १८१७ (२३९५७).

**रघुनाथ बच्याजी दांडेकर – भाऊ जोशी** : नाथाजी कदम याजबरोबर पाठवून दिलेल्या ऐवजाची पोंच, श्रावण व. ३०, सु. १२१८/१२ ऑगस्ट १८१७ (२३९५३); बोली केल्याप्रमाणे ऐवज पाठवून देण्याची विनंती, २६ रमजान, सु. १२१८/१० ऑगस्ट १८१७ (२३९५५).

**राघो रामचंद्र गोडबोले – आबा*** : सरकारांतून नेमणूक केलेल्या ता। वोतूर येथील मोकाशावर प्रेषकातर्फे लक्ष्मण भास्कर केळकर याची नेमणूक (२३९२८).

पत्रे चालू :

**राणोजी बलकवडे, ता। जयदुर्ग – पंतप्रधान*** : दक्षिणेकडून फौज येऊन अवचितगड घेतला व रेवदंड्यावर जाणार आहेत या बाबतचे बातमीपत्र (२४०२०).

**लिंगो नारायण – बाजीपंत आण्णा*** : कर्नाटकातून कुशल पत्रोत्तर करण्याची विनंती, आप्पाजी केशव याने कर्ज ऐवजाची फेड केली नसल्याची तक्रार (२३९२९).

**विठोजी सुभेदार – भिकाजी शंकर दामले** : कामाकरितां त्वरित येणे, बोली केल्याप्रमाणे त्वरित ऐवज पाठवून देणे वगैरे कलमे, १७ ज. खर, सु. १२१५/६ जून १८१४ (२३९०७).

**विनायक चिंतामण देशमुख – विसाजीपंत दांडेकर** : नेमून दिलेल्या मौजे निनाम व कुरणे येथील कमाविशी वहिवाट ऐवजापैकी जमा झालेल्या ऐवजाचा तपशील, १५ रमजान, सु. १२१८/३० जुलै १८१७ (२३९५८) – **नारोपंत तात्या*** : आपण रत्नागिरीचा येणे ऐवज कसा द्यावा त्या संबंधीचा तपशील, श्रावण शु. १, शके १७३९/१३ ऑगस्ट १८१७ (२३९६०).

**वीरभद्र वीर गोसावी – मोरोपंत आप्पा*** : सावनूर येथील मठाचा ताबा, मुलुखातील मुरारराव घोरपडे याचा उपद्रव, मुलुखाची झालेली हानी वगैरे (२३९०३).

**विष्णू महादेव महाजनी – रघुनाथराव मल्हार** : विठू पाटील याच्या विनंतीप्रमाणे मौजे कर्डे तर्फ सातारा येथे जमाबंदीचे चौकशीचा तगादा न करण्याची विनंती, ११ सवाल, सु. १२३५/१० फेब्रुवारी १८३५ (२३९१९).

**विश्वनाथ गोखले – गणेशपंत*** : अनंतभट बापट या कोकणांत जाणाऱ्या गरीब ब्राह्मणास मदत करण्याबाबत (२४०२८).

**विसाजी नारायण – येसाजीपंत*** : तालुके धारवाडमधून रघुनाथराव श्रीनिवास व भानजी वेंकटराव यांचा जो ऐवज येणे आहे तेवढा ऐवज मनोलीच्या पोता रकमेतून द्यावा अशी विनंती (२३९९२).

**शिवाजी आनंद देशमुख–मोरोपंत दादा*** : वेदमूर्ती रंगजोशी बाबा यांना घरचे प्रयोजन देण्याबाबत आज्ञेप्रमाणे केले जाईल (२४०२६).

**शेठी राणनाईक महार, नेवरी – विठोजी कारके** : महार वतनाचे शेतास उपद्रव देणाऱ्या केरू व हरी महार यांना ताकीद देण्याबाबत (२३९१०).

**श्रीधर बल्लाळ – गणपतराव*** : कारखान्याचे हिशेबाबर मखलाशी केल्याबाबत समाधान (२३९७६).

**सदाशिव जोशी – बाळाजी गोरे** : गोपसेठ सोनार याच्या हवाल्याच्या रकमेची फेड करू असे निवेदन, शके १६९२/१७७०-७१ (२४०३२).

**संभाजी पाटील – बाजीपंत दादा*** : गाड्यावर पैसा मागणाऱ्या गाडेकऱ्यास पैसा देणे कसे उचित आहे त्याचे निवेदन (२४०३७).

**संभाजी सावंत – राणोजी बलकवडे** : दारवलीचे नारोजी देशमुख यांचे वर्तमान पाठविणे, तांदूळ वगैरे जिन्नस पाठविणे वगैरे विषयाबाबत (२३९४५).

रुमाल क्र. ४६, पुडके क्र. १–पत्रे चालू :

**सिद्धेश्वर कृष्ण – रामचंद्र गणेश गणपुले :** ठाण्याचे हिशेब कसे द्यावे, टप्पे कसे ठरवावे, आणेवारी कशी घ्यावी या बाबतीत मार्गदर्शन, कारकुनाकडून योग्य ते काम करवून घेण्याबाबत, १० मे १८२८ (२४०४६).

**सुभानजी व राणोजी पाटील, निंब – तात्यासाहेब* :** निंब येथील लव्हा महाराची बायको पुण्यांतील गारद्याने बळकाविली ती परत करण्याबाबत (२४०३८).

**हरी महादेव – मोरोपंत दादा* :** बाबूराव व सदाशिव फडणीस यांचे साहित्यपत्र घेऊन आलेल्या भास्कर वैद्य यास उत्तर देण्याबाबत (२३९२३).

[फक्त प्रेषकांचा नामोल्लेख असलेलीं पत्रे]

**आबाजीराव गोडबोले – (—) :** पालख्यांचे भोयांचा रोजमुरा, नगर शहरांतील कमाविशीसंबंधी बाबाजी सहस्त्रबुद्धे यांची तक्रार, मौजे भिंगार येथील अंजिर बागेस पाणी देणे वगैरे विषयाबाबत (२४०१६).

**कमलाकर भास्कर – (—) :** केशवपंत व मल्हारपंत यांचा फडशा करावयाचा असेल तर सरकारचे नावे खत लिहून द्यावे (२४००७).

**कृष्णराव बापूजी – (—) :** आज्ञेप्रमाणे लवकरच दर्शनास येत असल्यासंबंधी (२४०४२).

**केशव बहिरव – (–) :** खजिन्यांतील ऐवज पाठविण्यास कां उशीर होत आहे त्याची कारणे (२३९७५).

**गोपाळ नारायण – (—) :** आज्ञेप्रमाणे कागदपत्र रवाना (२३९३८); प्रापकाच्या भेटीस येत असल्याबद्दल (२३९३९).

**गोविंद नारायण – (—) :** आवासचे खाडीत बारा हात लांबीचा सोटा (बांबू) लागल्याबाबत (२३९४०).

**नारो बाबूराव – (–) :** परगणे साकसे येतील भाताची विक्री, त्याचा विक्रीचा दर, झाडा वगैरे ब बींचा संपूर्ण तपशील (२३९८५).

**पांडुरंग विश्वनाथ दातार – (—) :** आबाजीराम याजकडील असलेल्या कोठीच्या शिलकीच्या हिशोबांत कांही गोंधळ नसल्याबाबत (२३९४१).

**महादेव अनंत कुळकर्णी – (—) :** बाजीपंत दादा पटवर्धन याजकडील माणसे घोडे चारणीस अडथळा करून शिवाय मारहाण करीत असल्याची तक्रार (२४०२७).

**महिपतराव सखाराम, सुरगड – (–) :** अवचितगड सुभ्याची व किल्याची हाजिरी, ऐवजाबाबत लोकांचा बोभाटा व सत्य परिस्थिती याबाबत निवेदन, २८ ज. खर, सु. १२०८/३ ऑगस्ट १८०७ (२४०००).

**रघुनाथ आप्पाजी सहस्त्रबुद्धे – (—) :** हरी बहिरव यास वरातदार निकड करीत असल्यामुळे प्रेषक समक्षच भेटीस येत असल्याबद्दल (२३९४६).

**रघुनाथ बच्याजी दांडेकर – (—) :** आज्ञेप्रमाणे स्वयंपाकाची भांडी व भाजी पाठवीत असल्याबाबत, श्रावण व. १४, सु. १२१८/११ ऑगस्ट १८१७ (२३९५४).

पत्रे चालू :

**राघो भिकाजी आपटे – (—) :** हुबळी मुक्कामी आण्णाची भेट होऊन चारपांच ठाण्यावर नेमणूक झाली असल्याबद्दल, खर्चाची फार तारांबळ असल्यामुळे मदतीची विनंती (२४०३१).

**राघो विठ्ठल सहस्त्रबुद्धे – (—) :** आण्णा सुखटणकर व भाऊ पाटील यांचे शेताचे कजियामुळे जो वसूल आज्ञेप्रमाणे अमानत ठेवण्यांत आला होता त्याबाबत पुढील कार्यवाही कोणती करावी याबाबत विचारणा (२३९९४).

**राघो विष्णू सहस्त्रबुद्धे – (—) :** प्रां मेलसे येथील स्वराज्य अंमलपैकी कांही ऐवज निकडीने वसूल करून पाठवीत असल्याबाबत (२३९९५).

**रामचंद्र महादेव जोशी – (—) :** प्रापकाकडून पत्रोत्तर कां येत नाही त्याबद्दल विचारणा, पांडुरंगपंत काका जोशी भेटत असल्यास कुशल वर्तमान लिहिण्यास सांगावे अशी विनंती (२३९८०).

**रावजी खांडेकर – (—) :** शामराव देसाई व जीवनराव देशपांडे यांच्या कैफियती पाठविणेबाबत, त्रिंबकराव यशवंत याजकडील तो धारवाड येथील महालांची जप्ती करून ऐवज सरकारांत भरण्याबाबत, हजरतसाहेबांकरितां कुंचा जोडी, वाड्याचे शाकारणीकरितां द्यावयाचा ऐवज वगैरे कलमांबाबत, सु. ११९५/इ. स. १७९४ – ९५ (२४०४८).

**शिवाजी गोविंद – (–) :** बापू* व नाना* यांचे आज्ञेप्रमाणेच मनसुबीचे कामकाज चालवावे असा शास्त्रीबावांचा आदेश (२३९८४).

[फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेलीं]

(—) – **आप्पा* :** येसाजी खंडेराव याजकडील घोडी पाठवीत असल्याबाबत (२३९७४).

(—) – **गणपतराव विठ्ठल, मुा ठाणे संगमेश्वर :** प्रापकाची चाल सरळमार्गी नसल्यामुळे मुलुखास उपद्रव न देण्याचे धोरण प्रेषकास बदलावे लागेल अशी समज देणारे, ८ रमजान, सु. १२१८/२३ जुलै १८१७ (२३९८१).

(—) – **दादा* :** सातान्यास जाण्याच्या मजकुरासंबंधी पत्रव्यवहार (२४०१८); विठ्ठल भगवंत व्याहालकर याजकडे मौजे वाहागांव इनाम दिला असल्यामुळे त्या गांवाचा वसूल प्रापकाने न घेणे, १३ रमजान, सु. १२१५/२९ ऑगस्ट १८१४ (२३९३५).

(—) – **पांडुरंगपंत फडणीस :** बाळाजी विश्वासराव याची घोडी सार्तीज येथून तूर्त आणू नयेत म्हणून (२४०२३).

(—) – **बापू* :** ल्हासुर्णे येथील मनाई विषयी नाना लिहितील, पुण्याचे घरापुढे सोपे करणे वगैरे घरगुती मजकुराचे (२४०४५); कृष्णाजीपंत जोशी याजकडून गडकरी यांची सनद आणीत असल्याबद्दल (२३९१४).

(—) – **बाबासाहेब* :** भिल्ल व चोरांचे उपद्रव शमनार्थ राऊतांची मागणी (२३९६८).

(—) – **बाळाजीपंत दादा*** : एका ब्राह्मणाने जिव्हा तोडून देवावर ठेवली त्या प्रमाद प्रक्षालनार्थ पूजा अर्चा करावयास ऐवज व्यवस्था करण्याबाबत (२४००४).

(—) – **भाऊ गोखले** : प्रेषकाचे भटजी कोकणांतून आले असून त्यांची यजमानांशी भेट करवून द्यावी अशी विनंती (२३९५९); आज्ञेप्रमाणे कागदाचा दस्ता पाठवीत असल्याबाबत (२३९६४).

(—) – **मल्हार शंकर** : बडोद्याहून बाणकोटास जाणारी गलबते अडवून ठेवण्याबाबत (२३९२०).

(—) – **मोकदम, मौजे आष्टे पाा भोसे** : पोता जमा झालेल्या ऐवजाचा तपशील, २७ ज. वल, सु. ११५०/२४ एप्रिल १७५० (२३९८२).

(—) – **रामचंद्र सुभेदार** : रायाजी व बापूजी या रवाना केलेल्या जासुदांना ठरलेल्या वेळांत इनाम देणे, १० र. वल, सु. १२१५/२० फेब्रुवारी १८१५ (२३९१८).

(—) – **शिवराम सुभेदार** : वोझरी येथील भटजीने देवावर जिव्हा कापून ठेविली त्याचे पापक्षालनार्थ पूजाअर्चा करण्यास लागणारा ऐवज पाठवून देण्याबाबत (२४००३).

(—) – **सदाशिवपंत*** : कोरेगडहून येणाऱ्या बैलांस जकात विषयी मनाचिठ्ठी करण्याबाबत (२४०३५).

[प्रेषक अथवा प्रापकांचा नामोल्लेख नसलेलीं]

सर्जेराव घाटगे याजकडील बापूजी शिंदे व आरब लोक घेऊन खंडाटकीचे घाटाचे आसपासचे गावावर रोखे करून ऐवज घेतला त्याबाबत (२३९०१); शहाजी भोसले याजकडून आलेल्या जिवाजी रुद्र याने कथन केलेल्या वृत्ताप्रमाणे बंदोबस्त करण्याबाबत (२३९०२); सिद्दीगडकरी यास वसुली करून ऐवज देणे, रायगड तालुक्यातील परिस्थितीचे, लोकांच्या कर्तव्याचे बाबतीत टाळाटाळ करण्याचे, ऐवज व्यवस्था वगैरे बाबींचा तपशील देणारे (२३९०५); श्रीमंतांकडून निशाण घेऊन आलेल्या स्वारीस दहा रुपये आदा करीत असल्याबाबत (२३९०६); मखलाशीची परवानगी झालेल्या धावडे यांच्या यादीवर मनसुबी करण्याबाबत (२३९०८); सखाराम बापू व फडणीस यांना मागणीप्रमाणे ऐवज देण्याबाबत, ऐवज टंचाईचे निवेदन, १७ ज. खर, सु. १२१५/६ जून १८१४ (२३९१६); मौजे कातर खटाव व किले वारुगड यांचे बेरजेवरील जो जास्त ऐवज (चढाचा) होता तो वामनराव तात्या यांचेमार्फत देण्याचे आश्वासन पूर्ण करण्याबाबत (२३९२७); कृष्णाजी रघुनाथ देशपांडे सरकार जुन्नर यांची बाकी इसाफतीबद्दल व इनाम व शेताचा आतापर्यंतचा हिशेब पूर्ण करून त्वरित पाठवून देण्याबद्दल ताकीद (२३९३४); विसाजीराम गोखले याजकडील गारद्यांपैकी तीन आसामींची जदीद नेमणूक केल्याबाबत (२३९३६); तांदूळ पाठवीत आहोत त्याचे पैसे गोपाळपंत दादा यांचे विद्यमाने देण्याबाबत (२३९४४); तुमच्याकडून घराचे काम होत नसल्यास किल्यावर निघून येणे (२३९४७); सिदगडकरी लोक पाठवावयाचे आहेत तरी त्यांच्या हजेऱ्या, रजा वगैरेबाबतचा तपशील देण्यासंबंधी (२३९४९); कागद आणावयास व रेवदंडा येथे गेलेल्या महादजी केशव यास बोलावणे



पाठविण्याकरितां दोन शिपाई पाठविणेबाबत (२३९५२); दाजिबा जोशी यांचे औषधाकरितां मनुका वगैरे जिन्नस आणल्याबाबत (२३९५६); दीक्षित यांना पाचशे रुपयांचा ऐवज देण्याबाबत (२३९७०); दादा देशपांडे, पाा पाच्छापूर यास सांगून मानपान करणे, सरकारांत सहाय्याविषयी विनंती करणे वगैरेंबाबत (२३९७२); आठवले याजकडील मनसुबीचा मजकूर विल्हेस लावण्याबाबत (२३९७७); कारकून न पाठविता स्वतः जातीने येण्याबाबत हुकूम (२३९७९); दौलतराव नलवडे याचा मुशाहिरा पोता रकमेतून देण्याबाबत, ६ रजब, सु. १२१४/५ जुलै १८१३ (२३९८३); भांडी कल्हईस दिली, पाने पाठविली वगैरे घरगुती मजकूर (२३९८६); मच्छिंद्रगडाचे मामलतीवर महादजी आप्पाजी भिडे याची नेमणूक तरी ज्वारी खरेदी व्यवहाराचे पैक्याबाबत त्याजकडे व्यवहार करण्याबाबत, २९ रमजान, सु. १२१८/१३ ऑगस्ट १८१७ (२३९८७); बाळाजी त्रिंबक यांचे गुजारतीने फकीर तांडेल यांचेकडे तांदूळ दिले त्याबाबत कागद लिहून देण्याविषयी (२३९८९); पत्र लेखक दर्शनाकरितां जेजुरी येथे जाणार असल्यामुळे पैक्याची व्यवस्था करणे विषयी विनंती (२३९९१); ह. भ. प. कृष्णाप्पा गोसावी वगैरे लोकांवरची जप्ती उठवून त्यास त्यांची शेते परत देण्याबाबत (२३९९९); मौजे परडेवाडीचे कराराप्रमाणे ऐवज घेऊन येण्याविषयी (२४००९); मौजे आळंदी व चऱ्होली येथील ज्योतिष-कुलकर्णी वतनाचे ताळेबंदाची पाहणी करण्याबाबत, पौष व. ५, सु. १२१४/१० जानेवारी १८१४ (२४०११); कृष्णाजी गायकवाड हे किल्याचे सनद गडकरी असून साताऱ्यास चौथाईचा ऐवज घेत असतात तरी त्यांना पाठवून देत असल्याबाबत (२४०१३); प्रापक व तात्या एक झाला आहात तरी देशमुख यांचा सहानुभुतीने विचार करून त्यास आवश्यक ती मदत करण्याबाबत (२४०१९); महालास शिपायांची अत्यंत आवश्यकता असल्यामुळे ते पाठविण्याची विनंती (२४०२१); बाळंभट गोलवीकर याला मौजे अर्थवणपिंपरी व नागापूर ताा हवेली माभळे बीड येथील बाबतीचा अंमल खेरीज मक्ता ऐवज त्याजकडून घेण्याबाबत (२४०२२); गावचे हिशेब पाठविण्यांत येणाऱ्या अडचणीबाबत (२४०२४); नारायण गोविंद पटवर्धन यांच्या पंढरपूर येथील इनामास कृष्णाजीपंत अडथळा करीत असल्याबाबत (२४०२५); लक्ष्मणराव वगैरेंची वस्तभाव पाठवून देण्याबाबत (२४०४०); खपली गहू व साडे पंचवीस मण तूप पाठविल्याची पावती नंतर पाठवीत असल्याबाबत, १६ र. वल, सु. ११९२/१३ नोव्हेंबर १७९१ (२४०४३).

**मसुदा :**

अतिवृष्टीमुळे पिकांची नुकसानी झाल्यामुळे कौल देऊन वसुलीबाबत सवलती देण्याविषयी, सु. १२१८/इ. स. १८१७-१८ (२३९६२).

**रसानगी यादी :**

फडणिसाकडील हरी गोविंद यास कोकणातून पुण्यास तांदूळ आणावयाकरितां दस्तक देण्याबाबत (२३९६७).

**वरात :**

**शहाजी भोसले** (अक्कलकोटकर) – **आनंदराव शिर्के** : दरबार खर्चाचे ऐवजातून नारो गोपाळ याचे वेतन देऊन कबज घेणे, १ जिल्काद, सु. ११८५/१७ सप्टेंबर १७८४ (२३९७१).

रुमाल क्र. ४६, पुडके क्र. १–वराता चालू :

(फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेल्या)

(—) – **जनार्दन वेंकाजी** : गोपाळ नाईक तांबवेकर यांच्या नजरेचा ऐवज त्यांनी तुम्हाकडील कर्ज ऐवजातून घेण्यास लिहिल्याबाबत, सु. ११८२/ इ. स. १७८१-८२ (२४००५).

(—) – **दासाप्पा नाईक** : गोपाळ नाईक तांबवेकर याचे नजरेचा ऐवज सरकारांत येणे त्याबाबत त्याचे प्रापकाकडील येणे ऐवजात लावून दिल्यामुळे ऐवज देऊन कबज घेण्याबद्दल, सु. ११८२/ इ. स. १७८१-८२ (२३९६९).

---

रुमाल क्र ४६, पुडके क्र. २ — सु. स. ११६७–१२१८

का. सं. ११२ (२४०५१–२४१६२) — इ. स. १७६६–१८१७-१८

अर्ज :

[फक्त प्रेषकांचा नामोल्लेख असलेला]

**सकशेट सोनार – (—)** : गुजराथी सोनाराच्या मुलीशी विवाह केल्यामुळे भावाचा संबंध तोडल्याबद्दल (२४१५९).

आज्ञापत्रे :

**चवसिंग राजे–तुरळकर मोकदम** : १८ रजब, सु. १२१७/१५ जून १८१६ (२४१४६) (तालीक) व **मावलगेकर खोत** : तुरळ व मावलगे गावांच्या वसुलीची मागणी, १८ रजब, सु. १२१७/१५ जून १८१६ (२४१४७) (तालीक).

कतबा :

[फक्त प्रेषकाचा नामोल्लेख असलेला]

**दत्ताजीराव विचारे – (—)** : संभाजी व गंगाजी नलवडे खोत यांच्याशी असलेल्या करंजुत्रे येथील ठिकाणाच्या तंटानिवाड्यास मान्यता, ११ ज. खर, सु. ११७०/१२ ऑक्टोबर १७६९ (२४१३४).

पत्रे :

**आडिवरेकर कमाविसदार – सरसुभेदार*** : महादेवभट रानडे व बाळंभट काळे यांच्या आडिवरे येथील जागेच्या तंट्यासंबंधीची माहिती (२४०९२) (नक्कल).

**आनंदराव जिवाजी–हरिपंत*** : बाहाळ–भडगांव येथे मुक्कामास असलेल्या फौजेच्या खर्चासाठी सावकार व धनवान लोकांकडून ऐवज घ्यावा म्हणून तेथील लोकांना तगादा, तरी त्या ऐवजाबद्दल त्रिंबकपंत करंदीकर यास उपद्रव न देण्याबद्दल विनंती (२४०९६).

**आप्पाजी मल्हार–बच्याजीपंत* व गोपाळराव*** : पठाणांच्या उपद्रवाबद्दल व बारी लोणार येथील मामलतीबद्दल निवेदन (२४०९४).

**आप्पाजी व संताजी कदम–मोरोपंत*** : माहादेवकर ब्राह्मणाच्या घरी झालेल्या चोरीच्या आरोपांतून मुक्तता करण्याची विनंती (२४१४४).

**आप्पाजी मल्हार–बाबा*** : वावी येथील जमीनीचा हिशेब रवाना व त्याच्या मखलाशीबद्दल विनंती, १४ ज. खर, आश्विन, सु. ११७०/१५ ऑक्टोबर १७६९ (२४१२९).

पत्रे चालू :

**आबाजी यादव व दत्ताजी नारायण–दादासाहेब*** : पारनेरा किल्ल्यावरील बेगमीबद्दल खुलासा (२४०९१).

**आबाजी सदाशिव देशमुख–विनायकराव देशमुख** : बागलाण प्रांतातील बंडाच्या व भिल्लांच्या बंदोबस्ताबद्दल विनंती (२४०८३).

**कमलाकर भास्कर–नाना*** : भाऊ व कृष्णराव यांची भेट, स्वारांच्या रवानगीबद्दल खुलासा (२४११७).

**कृष्णाजी शिवदेव – बाबासाहेब*** : उदेपूर येथून खरेदी केलेल्या पंतप्रधान यांच्या उंटाबद्दल जकातीचा उपद्रव न देण्याबद्दल तत्संबंधित कमाविसदारांना ताकीदपत्रे देण्याची विनंती (२४०७८).

**कृष्णाजी महादेव शेखदार – रामशास्त्री** (प्रभुणे) : जन्माष्टमीच्या उत्सवासाठी बांधावयाच्या ओट्यासंबंधी सखो केशव याजकडील भाऊबंदांच्या तंट्याबद्दल (२४१३२).

**गोविंदराव बल्लाळ – बाबूराव*** : लष्कराचा नंदीगड येथे मुक्काम असतांना तात्या यांजकडे पाठविलेला निरोप, सेर किल्ल्याचा बंदोबस्त करून स्वारीचे पुणे येथे आगमन (२४०७१).

**चिटको गोविंद – सुभेदार*** : गलबतांत भरावयाच्या भाताबद्दल आबाजीपंत व रामाजीपंत पुराणिक यांच्याशी झालेला तंटा (२४१४२–२४१४३).

**जिवाजी पाटील भोसले – शास्त्रीबाबा*** : त्रिंबकराव देशमुख याच्या पलायनामुळे जप्त केलेल्या वाई येथील पाटिलकी वतनाच्या मोकळिकेबद्दल विनंती (२४१३१).

**जिवाजी रघुनाथ – बापू*** : चिमणाजी नीळकंठ व नरसिंगराव कृष्ण यांजबरोबर पाठविलेल्या वस्तू व पत्रे रुकनुद्दौला व नबाब यास प्रविष्ठ, त्रिंबकराव व भोसले हे माटीची गढी, वजरातीर येथून आल्याची नबाबाकडे आलेली बातमी (२४०५१).

**त्रिंबक विश्वनाथ – बहिरोपंत* व शामराव*** : पागेकडील चरसाच्या ऐवजाखेरीज बाकी राहिलेल्या ऐवजाची मागणी, ७ साबान, सु. ११८०/२० ऑगस्ट १७७९ (२४०८०).

**धाक सावंत भोसले – महादजीपंत*** : राघ सावंत व आप सावंत यांजबरोबर पाठविलेले लोक रुजू करून घेण्याची विनंती (२४१६०).

**धोंडो गणेश सहस्त्रबुद्धे – गणेशपंत दिवाणजी*** : धोंडोपंत रानडे व गोपाळपंत दिवाणजी यांचे तळे येथे गमन, बाघोजी शिंदे याचे रेवदंडा येथे आगमन व दुर्गाजी शिंदे याच्या आगमनानंतर लढाईचा बेत (२४११४).

**नरसिंगराव बल्लाळ – बहिरो रघुनाथ व भिकाजी धोंडाजी** : रघुनाथ सदाशिव गद्रे यास रद्दकर्जाच्या वरातेबद्दल मिळालेल्या ऐवजाची पोंच, ५ सवाल, सु. ११८० / १६ ऑक्टोबर १७७९ (२४०७२) (नक्कल); – **कृष्णाजी लक्ष्मण व भिकाजी धोंडाजी** : शिवराम रघुनाथ याजकडे द्यावयाच्या खाजगीकडील ऐवजाची सरकारच्या वरातेवर हुंडी, १८ साबान, सु. ११८० / ३१ ऑगस्ट १७७९ (२४०७३) (नक्कल).

---

*संपूर्ण नांवाचा अर्थबोध होत नाही.

**रुमाल क्र. ५४, पुडके क्र. १ चालू :**
**पत्रें चालू :**

दुमालेगांवची चौकशी करावी का याबद्दल विचारणा (२८२२५); **रायगांव** येथील हिशेबाची रुजुवात व सरकार किफायती वगैरेसंबंधी रंगराव मोहिते याची कुडाळ मुक्कामी बोलणी (२८२२६); रंगराव मोहिते यांना सातान्यास बोलाविले असल्याने जाणेविषयी परवानगीची मागणी (२८२२९, २८२३०); रायगांव येथील कुलकर्णी यांनी खंडाने केलेल्या जमिनीच्या सारावसुलातील तफावतीसंबंधी चौकशी चालू असता मामलेदाराने गांवकऱ्यास तंबी देऊन वाई येथे नेल्याचा खुलासा (२८२३२), रंगराव मोहिते सातान्यास गेल्यामुळे चौकशीचे कामकाज स्थगित (२८२३४); रायगांव येथील वतनदारांच्या खटल्याच्या चौकशीसाठी सरकारी कारकून आल्याचे निवेदन (२८२३५); पट्टापावती नसलेल्या गांवांच्या चौकशीबाबत काय धोरण आखावे त्याविषयी विचारणा (२८२१८); बेलवडी, नापगांव, कुडाळ वगैरे ठिकाणी सरकारी हिशेब, बोटखते वगैरे कागदांची चौकशी चालू असल्याबाबत (२८२१९, २८२२०, २८२२४, २८२२७, २८२२८); हुमगांव येथील गांवगन्ना व नेमणुकी ऐवज परभारे पाटीलच खर्च करीत असल्यामुळे बटा जमेस धरण्याविषयी गावकऱ्यांची तक्रार (२८२२१); रुजुवात झालेल्या दहा बारा गांवांचे कागदपत्र घेऊन येण्यासंबंधी विचारणा (२८२२२); गुरवाची चौकशी प्रापकाने लिहिल्याप्रमाणे कार्याकारणेच करीत असून जास्त करीत नसल्याबद्दल निवेदन (२८२३१); आवजी गुरवाचा पुतण्या जवळू याच्या अनैतिक कारणास्तव घडून आलेल्या खुनासंबंधी जबान्या घेण्याचे काम चालू असल्याचे निवेदन (२८२३३); पैसे घेतल्याशिवाय लखोटा नदीपलीकडे पोहोचविणार नाही अशी अकबरखान जमादाराची तक्रार (२८२३६); मोकासा व जमिनीच्या अमलावरील बट्टा देण्यास खरशीता कुडाळ येथील गांवकऱ्यांचा नकार (२८२३७); आज्ञेप्रमाणे सायगांवकडे लखोटा रवाना (२८२३८).

**गोपाळ नारायण फणसळकर –** जोरखोरे, ओजपूर, वाघोली येथे रुजुवात चालू असल्याबाबत (२८२५८, २८२७२, २८२७४); वाईहून आलेली पत्रें प्रापकाकडे रवाना (२८२५९); वाई येथील कारकुनाकडील झाड्याबाबतची व हिशेबासंबंधीची कागदपत्रें मिळाल्याबाबत (२८२६०); कुलकर्णी यांच्या अनुपस्थितीमुळे वाघोली, दह्रीगाव आसगांव, तळे येथील रुजुवात स्थगित झाल्याचे निवेदन (२८२६१, २८२६२, २८२७३); गांवगन्ना वसुलासंबंधीचे वगैरे नमुनापत्रक पाठविण्यासंबंधी (२८२६३); दस्तूरमाफक प्रकरणी हजर राहाण्याचा निरोप दिला असतानाहि गोळेगांव येथील कुलकर्णी दुर्लक्ष करीत असल्यासंबंधी (२८२६४); आज्ञेप्रमाणे खर्चासाठी ऐवज रवाना (२८२६५); प्रापकाकडे घोडे रवाना (२८२६६); स्वारांच्या रोजमुऱ्यासंबंधी (२८२६७); प्रापकाचा मुक्काम बोपर्डीस होणार असल्यास किती दिवस होणार वगैरे बाबतची चौकशी (२८२६८); इंग्रजी महिन्याची याद व विश्वनाथ बापूजीचा फुटका लखोटा पेट्याहून प्रेषकाकडे आला तो परत रवाना (२८२७०); गोळेगाव परिसरांतील कांही गांवी बट्टा घेतल्याचे निदर्शनास येत असल्याबाबत (२८२७१); वाई येथील तगाईझाडा, सूटीच्या याद्या व १८२४ सालचा हिशेब यावर सरकारातून सूट मिळाल्याचा उल्लेख तेरजेस असल्यामुळे हिशेबाची वहिवाटपद्धत कळविण्याबद्दल (२८२७५); जांभळी येथील १८२३ साली दिलेला सुटीचा दाखला व मूळ रुजुवातीत भिन्नता आढळून येते त्याविषयी (२८२७९).

**पत्रें चालू :**

**बालाजी दत्तात्रय –** करंजखोप वगैरे गावच्या बंदोबस्तासंबंधी कुलकर्णी यांस तगादा करण्याबाबत (२८२१६).

**रंगराव मोहिते –** कृष्णाजीपंतबापू यांची सातारा येथे रवानगी करण्याबाबत विनंती (२८२८१); कृष्णाजीपंत याजकडे आज्ञापत्र घेऊन आलेल्या शिपायाचीच आम्हाकडे रवानगी केली जावी असा निरोप (२८२८२); रायगांव येथील गांवगन्ना चौकशी जरा सबुरीने करण्याबाबत कृष्णाजीपंतबापू यास कळविल्यास बरे होईल (२८२८३).

**राघो नारायण व समस्त देशपांडे, वाई –** अतिवृष्टीमुळे प्रवास करणे कठिण झाले असल्यामुळे वाईस येणार असल्याचे निवेदन (२८२७८).

**रामचंद्र भास्कर आठवले –** पंत अमात्य याजकडील गांवची चौकशी करू नये म्हणून सूचना (२८२७६); मौजे सुखेड पोा शिरवळ येथील नकला वगैरेसंबंधीचे कागदपत्र कुलकर्णी याजकडे असल्यास चौकशी करून रवाना करण्याबद्दल (२८२७७) (नकल).

**रामचंद्र सदाशिव भागवत –** हिशेब लिहिण्याच्या कामांत कुलकर्णी लोकांची मदत घेत असतां शेखदार यांचे शिपाई अडथळा निर्माण करतात तरी त्यास ताकीद करण्याविषयी (२८२३९); असवली, विंग, लोणी, वाठार, कान्होली वगैरे गांवांचे कुलकर्णी अनुपस्थित असल्यामुळे रुजवातीचे कामकाज स्थगित झाल्याचे निवेदन (२८२४०, २८२४१, २८२५२); खेड बुा। येथील गांवगन्ना संबंधित कांही पावत्यावर बऱ्याचा उल्लेख नाही सबब कसर काय भरावी म्हणून विचारपूस (२८२४२, २८२४३); रुजुवातीसाठी नेलेल्या विंग, सुखेड व शिरवळ येथील रुमालाच्या रवानगीबाबत (२८२४४, २८२४८, २८२५४); दुमाले व मोघम असलेल्या गांवांच्या रुजुवातीसंबंधी तेथील पाटील कुलकर्ण्यांची मनाई (२८२४५, २८२४६); कुलकर्ण वतनाबाबतचे रुमाल देण्याविषयी वाई येथील सुभेदाराची निरर्थक तक्रार (२८२४७); आज्ञेनुसार शिबंदीच्या लोकांची प्रापकाकडे रवानगी (२८२४९, २८२५५); स्वारांच्या रोजमुऱ्यासंबंधी (२८२५०); सुभेदार जर कुलकर्णी लोकांना पाठवून देत नसतील तर सरकारांत तक्रार करावी अशी सूचना (२८२५१); शिरवळपैकी रुजुवात संपवून निरथडीपैकी रुजुवातीस प्रारंभ (२८२५३); पाटील – कुलकर्णी भोर येथे गेल्यामुळे बावडे येथील रुजुवातीस विलंब (२८२५६); पगाराची रकम आणण्याकरितां शिपाई पाठविण्याची आवश्यकता आहे किंवा काय त्याबाबत विचारपूस (२८२५७).

**गणेश राम – नारोपंत* :** भाजीपाला, धान्य वगैरेची पोंच, ६ सफर, सु. १२०४/१६ मे १८०४ (२८१६४ – २८१६८); जमादार यांनी ऐवजाविषयी निकड केली असल्यामुळे वरातेप्रमाणे बाकी राहिलेला ऐवज त्वरित पाठविण्याची विनंती (२८१८१, २८१८३, २८१९९); गल्लाखरेदीपैकी ऐवजातून शक्य झाल्यास धान्य पाठवून द्यावे अथवा वरात लिहून देण्याची सूचना (२८१८२); जयाजी पवार यांची आसगांवास रवानगी करून तेथील शासकीय परिस्थितीचे वर्तमान प्रेषकाकडे कळविण्यांत यावे म्हणून निवेदन (२८१८४); तुपाच्या घागरी वाई येथे रवाना (२८१८५, २८१९८); कृष्णाजी दाते वाई येथे जात असल्याने मदतनीस म्हणून महालापैकी एक शिपाई बरोबर देण्याची सूचना (२८१८७); सोमनाथ यांच्या रोजमुऱ्यासंबंधी दिलेली वरात चुकती करण्याबाबत (२८१८८); गल्लाऐवजाची किती प्रमाणांत हप्तेबंदीने फेड करून घ्यावी याविषयी

रुमाल क्र. ५४, पुडके क्र. १ चालू :
पत्रें चालू :

विचारपूस (२८१८९); भाजीपाला व फळे वगैरे रवाना (२८१९०, २८१९२, २८१९७, २८२०३, २८२०५, २८२०७ – २८२१०); रखमाजी बरोबर पाठविलेले धान्य वाई येथे पोहचविण्याबाबत (२८१९१); वरातेपैकी बाकी राहिलेल्या ऐवजाचा फडशा करण्याबद्दल सूचना (२८१९३, २८१९५); राजपुरी याजकडून निवडुंगाचा तिवडा घातल्याचे सबबीवर दंडादाखल घेतलेला ऐवज परत करण्यासंबंधी सूचना (२८१९४); खंडोजी इंगवले याची औषधपाण्याअभावी आबाळ होऊ देऊ नये (२८१९६ - २८२१३); सौ. काशीबाईकडे वाई येथे तांदळाची चणचण असल्याने त्यांचेकडे तांदूळ पाठविण्याची दिरंगाई न करण्याबद्दल (२८२००); भोजनखर्चास किती धान्य लागेल याची यादी रवाना (२८२०१); रावजी यास उगाच नावे ठेवल्याच्या आरोपासंबंधी खुलासा व्हावा अशी मागणी (२८२०२); बापू या इसमाच्या मृत्यूबद्दल दुखवटा व्यक्त केल्यासंबंधी (२८२०४); संतू याजकडे सातारा येथे तांदूळ रवाना (२८२०६); रावजीस दिलेल्या पत्राची नक्कल प्रेषकाकडे पाठवावी म्हणून सूचना (२८२११); धान्य वसुलाबाबत निकड झाली पाहिजे (२८२१२); पत्राचा आशय लक्षांत घेऊन रावजीशी गल्ला प्रकरणी बोलणी करण्याबद्दल सूचना (२८२१४); – **राणोजी ठोंबरे :** मालेखान याने माजविलेल्या दंग्याचा बंदोबस्त करण्याबाबत (२८१६९); –**बापूजीपंत* :** श्रीस श्रीफळ अर्पण करून प्रसाद व अंगारा रवाना (२८१७०); चोळखण व कुंकवाचा पुडा वगैरे वाटेतच गहाळ झाल्याचे निवेदन (२८१७१); कबूल केल्याप्रमाणे हरभरे पाठवून देणे (२८१७२); मालेखानाच्या दंग्याचा युक्ती युक्तीने बंदोबस्त करणे रास्त असल्याने प्रापकास महाली न राहाता मसूर येथे जाण्याची सूचना (२८१७३); आप्पाजी नाईक पवार याच्या दिंमतीस असलेल्या लोकांचा रोजमुरा देण्याबद्दल (२८१७४); प्रापकाने सुचविल्याप्रमाणे लोकांची रवानगी केल्याबद्दल (२८१७५); दीपकच्या व्रतबंध समारंभास भाऊ जोशी यांना बरोबर घेऊन येण्याविषयी (२८१८६); – **आप्पा सावंत :** बच्याजी परब याजबरोबर पाठविलेल्या वरातेप्रमाणे ऐवज घेणे (२८१७६); –**परशुरामपंत*:** मानाजी पाचंगणे यांना भोपळे देण्याबद्दल सूचना (२८१७७); मापट्याने घेतलेल्या धान्याची याद व भाजीपाला (दीपावलीसाठी) रवाना करणे (२८१७८); सोमनाक यास इटेकरी याजकडून अद्याप वरातेचा ऐवज मिळालेला नाही यासंबंधी (२८१७९); मुगाविषयीचे रुपये वजा करून बाकी रुपयाचे धणे पाठवून द्यावेत (२८१८०).

**गोपाळ नारायण फणसळकर – रामचंद्र सोळकर, मु. दरेगांव बाा :** मराठा बिगारी लोक कमी करून वाई येथे पाठवून देण्यासंबंधी (२८२६९).

**राजाराम* – रामचंद्र* :** कणूर येथील कुरणाच्या झाड्यासंबंधीच्या जाबसालासाठी गांवकरी आणविले असल्याचे निवेदन, १७ जिल्काद, सु. १२२७/२४ जून १८२६ (२८२१५).

[फक्त प्रापकाचा नामोल्लेख असलेले]

(—) – **रामचंद्रपंततात्या* :** रुजुवातीचे कामकाज संपताच कुलकर्णी यांची रवानगी करणार असल्याचे निवेदन, १६ सफर, सु. १२२७/९ सप्टेंबर १८२६ (२८२८०).

* मूळ नांवाची निश्चिती आढळून येत नाही.

रुमाल क्र. ५४, पुडके क्र. २ — सु. स. ११५५–१२२६
का. सं. ३०३ (२८२८४–२८५८६) — इ. स. १७५४–१८२५

**अर्जदास्त :**

कुलकर्णी आजारी असल्यामुळे हिशेब घेऊन येण्यास उशीर लागला म्हणून मोकदम काा पाचवड प्रांत कराड पेटा वाई याची (२८३०१).

**कबूलात कतबे :**

**बापू गुरव – सुलाजी मारवाडी :** गोविंदा व प्रेषक भागीदारीत असल्यामुळे गोविंद याजकडून येणे असलेली रक्कम त्याने न दिल्यास स्वतः देण्याची हमी (२८४५०).

[केवळ प्रेषकाचा नामोल्लेख असलेले]

**हरी व गोविंद पाध्ये – (—) :** मौजे देगाव येथे विठ्ठलदास यांनी पाध्ये कुटुंबास सत्पात्र ब्राह्मण म्हणून इनाम जमीन दिली त्याची योग्य प्रकारे वहिवाट करण्याबाबत (२८२९३).

**पत्रे :**

**आप्पाभट शारंगपाणी – हरीपंततात्या* :** नाशिक येथे मुलाबाळांसह मुक्काम केल्याचे निवेदन (२८५६७).

**आप्पाजी यशवंत – मोरोपंत* :** प्रकृति अस्वास्थ्य असून वेतनाचा ऐवज मिळत नसल्याची तक्रार (२८२९२).

**अंताजी नारायण – लक्ष्मण कोन्हेर :** सरकारी मुदपाकखान्याकडे द्यावयाच्या सामानाचा तपशील (२८४०२).

**अंताजी लक्ष्मण देसाई – जगन्नाथतात्या* :** पाा रावेर येथील मामलत गोविंद चिंतामण याजकडून दूर केल्याबाबत (२८३२१).

**काशीराज* – दादासाहेब** (रघुनाथ बाजीराव) **:** बळवंत बाबूराव यांच्या पत्रांतून मजकूर कळला असून स्नेहभाव वाढविण्याची इच्छा (२८३३५).

**गणेश तुकदेव – पांडुरंगपंतदादा* :** ऐवजचिठ्या केल्या आहेत त्यातून प्रापकानी मागितलेला ऐवज घेण्याबद्दल (२८५६४).

**गणेश बल्लाळ रहाळकर – शिवरामपंततात्या :** पिंगळे यांच्या इनामांची चकबंदी पाटील कुलकर्णी घेऊन आले असल्याबद्दल (२८३६८).

**गणेश विठ्ठल – मोरोपंत* :** प्रापकाकडील वाईच्या मामलतीवर विष्णुपंत यांनी परभारे रोखे केले त्यास ताकीद करण्याबाबत व यासंबंधी नाना फडणीस यास गुप्तपणे कळविण्याबाबत (२८३७२).

**गोविंद नीळकंठ – आण्णा* :** कर्जाऊ ऐवज त्वरित परत करण्याबाबत (२८५५३).

**गोविंद हरी – लक्ष्मणपंत* :** मौजे भोवर प्रांत दिसोळ येथील रयत परागंदा झाल्यामुळें गाव उज्याड झाला तरी मक्ता ठरवून देऊन आबादी करून देण्याबाबत (२८३६४).

**गोविंदराव कृष्ण – सदोबा* :** गोळे यास लग्नाबाबत विचारण्याविषयी व प्रेषक लवकरच निघून येत असल्याबाबत (२८३८१).

**रुमाल क्र. ५४, पुडके क्र. २ चालू :**
**पत्रें चालू :**

**गोविंदराव पाटील डेंगळे–सदाशिवपंतभाऊ* व आबाजी फडणीस :** निरनिराळ्या ठिकाणचे भात अजून विकले गेले नसल्यामुळे संपूर्ण ऐवज पाठविता येत नाही परंतु बाकी ऐवज पाठवीत असल्याबद्दल (२८३२४).

**जानराव* – परशरामपंतभाऊ* :** मौजे महीगांव येथील कुणबावा आपण दिला नाही व भास्करपंत कुळास दहशत घालतात तरी अशा प्रकारचे गैरवर्तन न करणे अशी सूचना (२८३२८).

**ज्योतिबा देवकर – गोविंदपंतआप्पा* :** पूर्वी लिहिल्याप्रमाणे सणगे पाठविली नाहीत तरी आता जानबा गरुडे याजबरोबर सणगे पाठविण्याबद्दल (२८४८२).

**तुळसाजी पाटील – बहिरोपंत* व खंडोपंत* :** कुसाजी पाटील गुळुंबकर यास तीन मण गल्ला देण्याबाबत (२८४५९).

**त्रिंबकराव* – तात्या* :** विठ्ठलराव शिवदेव याजकडील तोफखान्याकडील माणूस सोडून देण्याबाबत (२८५१३).

**देशमुख, देशपांडे ता मेढे – नारोपंतनाना* :** मेढे येथे कऱ्हाड येथून पंत सेनाकर्ते यांच्या मोकासबाब ऐवजाबाबत रोखे आले त्यासंबंधात सूचना (२८२९७).

**धारो बहिरो माळी – इराप्पाआप्पा इटे :** वडिलांनी घेतलेल्या कर्जाऊ ऐवजाची फेड करण्याबाबत (२८४६७).

**नारायणभट खटावकर – बापाजी भट :** अवर्षणामुळे गवताचा अभाव असल्याने गुरांची चिंता वाटत असल्याबाबत (२८३९५).

**नारायण व्यंकट घोरपडे – मोकदम, मलेवाडी :** विराजी पाटील यास ऐवज देणे, १७ मोहरम, सु. ११५५/३ नोव्हेंबर १७५४ (२८४००).

**नारुबाबा पोतदार – हरिबा नाईक पोतदार :** वरात-ऐवज पाठविण्याची कळकळीची विनंती (२८४५५).

**नारो महिपत देशपांडे, वाई – विष्णुपंततात्या* :** एकमेकांत पत्रव्यवहार चालू ठेवण्याबाबत (२८३३७).

**नारो भिकाजी – भगवंत गाडेकर :** आलेल्या शिपायास ऐवज देण्याची सूचना (२८५७२).

**नारो मैराळ कुलकर्णी – मोकदम, तळे :** पत्र व रोखा पाठविला त्याची पोंच (२८३५०).

**परशराम खंडेराव – बाळकृष्णदाजी* :** दाजीच्या प्रकृतिस्वास्थ्याविषयी (२८३८०).

**पांडुरंग बल्लाळ – नाना* :** आंबे पाठवित असल्याबाबत (२८४८८).

**फतेखानभाई पा, सरदेशमुख ता देवपूर – बापूजीपंत* :** मौजे जवळके येथील शेतीची सेडचिठ्ठी आणीत आहे तरी गावकऱ्यास त्रास न देण्याची विनंती (२८३२५).

**बळवंतराव गोपाळ – मोरोपंतदाजी* :** प्रेषकाकडे शिंदे याजकडील पूर्वी ज्या मामलती होत्या व ज्यावर आता वराता केल्या आहेत त्या वराता ज्यांनी काढल्या त्यांच्याकडून घेणे व बळवंतराव यास त्याविषयी त्रास न देणे असा पंतप्रधानांचा हुकूम असता केशव गोविंद त्रास देतात तरी त्यास ताकीद द्यावी अशी विनंती (२८३६९).

**पत्रें चालू :**

**बाजीराव बल्लाळ – मोकदम, कुमारपूर :** वरातदारास मनाचिठ्ठी देण्याबद्दल, सु. ११९७/इ. स. १७९६-९७ (२८५६८); **– मोकदम, तुजारपूर :** वाळवेकर यास पत्रावळीची जरुरी आहे तरी तुजारपूरच्या गुरवाकडून पत्रावळी घेऊन देण्याविषयी, १ र. बल, सु. ११९५/ २६ सप्टेंबर १७९४ (२८५७७).

**बापूजी कदम – बाबाजी* :** आबा याजकडून घेतलेला ऐवज परत करण्यासंबंधी (२८३४१).

**बापू कोळी, कामेरी – कृष्णाजीदादा*, भिलवडी :** चावडी भरण्याकरिता ऐवज पाठवून देण्याची विनंती (२८३४२).

**बाबा* – वडील* :** बाळू जाधव याच्या लग्नाकरितां सामान व ऐवज पाठविण्याबाबत (२८३९२); मलपेठ येथील वसुलाचा ऐवज खजिन्याबरोबर पाठविल्याबाबत (२८३१४).

**बाबाजी प्रल्हाद – मोरोपंत* :** दाजी आनंदराव देशपांडे पा बेल्हे याची निवाडपत्रे, सरकारी मोर्तबे वगैरे झाल्यावर त्यानंतर आठ दिवसांनी नजरेचा ऐवज घेणे असा करार झाला असता त्या अगोदरच वराता झाल्या आहेत तरी त्यास मनाई करण्याबद्दल (२८३१७).

**बाळकृष्ण जोशी व विनायकभट – त्रिंबकपंत गानू :** भात व नाचणीची पोंच (२८४६९).

**बाळाजी गणेश – मोरोपंतदाजी* :** सदाशिव रानडे व मुरार गोविंद यांच्या मौजे नाठे ता राजापूर येथील मोकदमीवतनाच्या कज्जाचा योग्य तो निवाडा करण्याबाबत (२८३३१).

**बाळाजी कृष्ण, वाई – मोकदम, दिघी :** हिशेब सरकारांत पूर्ण दिल्याशिवाय फडणीस सोडत नाहीत त्यामुळे तिकडे येण्यास असमर्थ (२८४३९).

**भगवंत गोविंद – नागनाथ महार, इटे :** कर्जाऊ ऐवजाची फेड करण्याबाबत, ११ जिल्काद, सु. १२०३/६ मार्च १८०३ (२८५७६).

**माणिकराव सिद्धेश्वर कुलकर्णी – गोविंदपंतबापू* :** सदोजी मोरे यास द्यावयाचा बाकी ऐवज तहकूब करण्याबाबत (२८५३७).

**मोकदम, परले, ता तारगाव – बापूसाहेब* :** परले येथील ज्या लोकांवर सरकारी वसुलाची बाकी निघाली त्याजवर केलेले रोखे, पिकांचा हंगाम नसल्यामुळे मनाई करावी म्हणून विनंती (२८३०५).

**मोकदम, बिजवड – भाऊसाहेब*, मावडी :** बिजवड येथील देवस्थानच्या बाकी ऐवजापैकीं राघू चपराशी याला कांही ऐवज देण्याबाबत (२८४५८).

**मोकदम, साकर्डे प्रा इटे – गोविंदपंतबापू* :** पेठेच्या स्वारास मनाई चिठ्या करण्याची आज्ञा (२८४७४).

**मोरो हरी – तात्या* :** नरसिंगराव व गोपाळराव यात पूर्वीच्या मामलतीच्या ऐवजाचा लढा दिसत नाही तरीहि आज्ञेप्रमाणे नरसिंगराव याची चौकशी केल्यासंबंधी (२८३२२).

**यणू येवले खोत, हणमंतवाडी किले भूषणगड – गोविंदपंतबापू, का इटे :** बाकी ऐवजाकरितां स्वार व तगाईकरितां शिपायांचे धरणे इत्यादि ऐवजाच्या निकडीच्या गोष्टींबाबत (२८४९१).

**यशवंत मैराळ – अन्याबा सुभेदार :** बापू शेट यास एक हजार रुपयांचा ऐवज देण्याबाबत (२८४१२).

रुमाल क्र. ५४, पुडके क्र. २ चालू :
पत्रें चालू :

**रघुनाथ जिवाजी – पांडुरंग आण्णा*** : गोविंदराव देशमुख यांचा निशा ऐवज पाठवून देण्याबाबत (२८४९२).

**रघुनाथ बाजी – बापूसाहेब*** : सरकारांतील नवरात्र उत्सवाकरिता धान्याची तरतूद वासोटा किल्याहून करण्याबाबत (२८३७८).

**राघो बल्लाळ जोशी – विष्णुपंततात्या महाजनी** : प्रेषकाकडे शिपाई नसल्यामुळे आठले याजकडील शिपाई आल्यास चिरंजिवाकडे पाठविण्याबद्दल (२८३०४); श्रीहरेश्वर कसबे वाई येथील देवस्थानच्या रथाकरिता गोविंदशास्त्री याने लोणारी याची जागा घेतली त्या जागेच्या वादाबाबत (२८३०६).

**राघो रामचंद्र गोडबोले – आप्पाजीपंत*** : आप्पाजी धोंडो व नीळकंठ पांडुरंग या दोघांमध्ये डोंगरच्या कुलकर्णाबाबत पंचाईत होऊन आप्पाजी धोंडो यांच्या बाजूने न्याय झाला असता नीलकंठ पांडुरंग गैरवाका कजीत असल्याबाबत (२८३१५).

**रामचंद्र बापूजी सिधये – रामचंद्रनाना वाघ** : सरकारच्या कानावर घालून मगच प्रेषकास कामावर ठेवावे म्हणून (२८२९१).

**रामचंद्र भास्कर आठवले वाई – कृष्णाजीपंत बापू*** : शिरसी ता कुडाळ येथील मोकासा अंमल गणेश कोन्हेर पटवर्धन याजकडून दूर करून रघुनाथ बगाजी याजकडे दिल्यामुळे त्यांचा ऐवजाचा वारा न धरण्याबद्दल (२८३०२).

**रामचंद्र व्यंकटेश – सुभेदार*** : प्रांत कऱ्हाड येथील गावावर रोखे होत असले तरी या लावणीचे दिवसात रोखे करून गांवकऱ्यास त्रास न देण्याबद्दल, ३ ज. खर, सु. १२१३ / १३ जून १८१२ (२८३१९).

**रामचंद्र हरी देवधर – गोविंदपंत देवधर** : कोकणचे पहाणी खर्डे नेरळच्या झडत्या, तालुक्याचे बाकी ऐवज, फाजील झाडे वगैरेसंबंधी सूचना व त्या त्या बाबींचे हिशेब पूर्ण करण्याबाबत (२८३२०).

**लिंगाप्पा* – दाजी अप्पाजी भवलकर** : प्रापकाकडे येणे असलेला ऐवज राणूजी माने याजबरोबर पाठवून देण्याबद्दल (२८३४७).

**विनायक चिमणाजी मोकाशी दालमोडी – रामाजीपंतभाऊ** : साताऱ्याकडील किरकोळ घडामोडीबाबत निवेदन (२८३२३).

**विष्णु आबाजी देवधर आचरे – जगन्नाथतात्या गोखले** : भाऊ दांडेकर येथे नसले तरी गणेशपंतांच्या सहाय्याने आरमाराची गणती, दरमहा रोजमुरे, हजेरीपट वगैरे तयार करण्याचा प्रयत्न करीत असून सरकार रीतीनेच खर्च करीत आहे, अडसेरी खर्चाची मंजूरी देण्याबाबत व खटारे याचा मोजणीझाडा तपशीलवार पाठविण्याबाबत कृष्णाजीपंत लेले यास लिहिण्याविषयी (२८३७५–२८३७६, ३७७).

**विश्वनाथ गंगाधर मालपाठक – बाळकृष्ण सुभेदार** : इ. स. १७७५–७६ या सालच्या वर्षासनच्या ऐवजाची पोंच, श्रावण व. १, शके १७०१ / २८ ऑगस्ट १७७९ (२८५८३).

**व्यंकाजी जनार्दन चोपडे – दादा*** : सुभेदाराने भावजी लक्ष्मण गुमास्ता यास प्रेषकाच्या तर्फेने देशमुखीच्या कामावर ठेवले असून सर्व कारभार त्याच्याच तंत्राने चालतो व प्रेषकाकडील जप्ती असूनसुद्धा प्रेषकास कोणत्याहि प्रकारचा मान दिला जात नाही म्हणून निवेदन (२८३२६, २८३२७).

पत्रें चालू :

**व्यंकटराव नारायण – पांडुरंग नाईक** : पासोडीकरितां ऐवज पाठविण्याबाबत (२८३४८); कृष्णमूर्तीकरितां सणगे आणली त्याचा ऐवज देण्याबाबत (२८४१३).

**शिवजी पाटील – दाजीबा*** : मौजे केलवडे येथे कहीचे गवत आहे ते शिपांच्या लष्करांत बेगारीने पोंचविण्याची तजवीज करण्याबाबत (२८३१२).

**सखाराम बाबाजी – गणेशपंततात्या भावे** : मौजे कंदी ता सातारा येथील जमीन वसंतगडच्या चंदो याचे नांवे लिहून दिलेली असल्यामुळे वसंतगडच्या पेठ्याचा हिशेब त्वरित पाठविण्याबाबत (२८४६५).

**संपतरावबापू* – मोकदम माबकर** : बाकी ऐवजाची पोंच (२८५७१).

**सुब्बाराव जगताप पाटील – गोविंदपंत बापू*** : सरदेशमुखीचे बोलणे करण्याकरितां भेटण्यास येत असल्याबाबत (२८५३६); **–भवानराव जगताप पाटील** : मौजे वाडदे प्रा रायेबाग येथील बोलणे ठरावास पडले आहे त्याकरितां त्वरित येण्याची विनंती (२८३००).

**हणमंतराव गंगाधर – गणपतराव*** : कोरे कागद पाठविण्याबाबत (२८३९६).

**हरिबा इटेकर – नारोबा पोतदार** : पोताकडील प्रापकाच्या संबंधातील रकमेच्या हिशेबाचा उलगडा करून घेण्याबाबत (२८४५७).

**हैबतराव पाटील निगडे – रामचंद्रदाजी*** : राहुटी व खांब पाठविण्याबाबत (२८५५७).

**[ फक्त प्रेषकांचा नामोल्लेख असलेलीं ]**

**आप्पाजीराम बाबूराव पाटणकर – (—)** : कडबा देण्याबाबत आज्ञा करण्याची विनंती (२८५१६).

**आनंदराव त्रिमल, चौकशीदार पेटा वाई – (—)** : निरनिराळ्या गावास जाऊन तेथील रयतेकडून गावगन्ना हिशेब घेऊन तफावत काढून त्याचा तपशील सादर केला त्याबाबत, मौजे वेले (२८२८४); मौजे कवठे, खानापूर, वाहागांव (२८२८५, २८३३३); मौजे बोपेगांव, गुळुंब, वेले, चांदक (२८२८६, २८३०३); मौजे भुईंज सा। निंब पेटा वाई येथील पगाराच्या ऐवजाची मागणी व बारावर्द लिहून पाठविण्याबाबत (२८२८७, २८२८८); भुईंज, ओझर्डे, देगांव, चिंधोली येथील हिशेबाची रुजवात (२८२८९); मौजे उडतरे (२८२९०); मौजे आनवड, पांडे, वेले, गुळुंब (२८३०३).

**काशीबा शिंदे – (—)** : कुळांच्या खटल्यांत तोड काढून त्याकरितां गांवकरी (ढवळेश्वर येथील) घेऊन येत असल्यासंबंधी (२८४८१).

**गडकरी मच्छिंद्रगड – (—)** : वहिवाटीचा हिशेब रवाना (२८३५२).

**गोपाळकृष्ण* – (—)** : पोताकडील परभारा हिशेबाचा ताळेबंद तयार केला आहे तो घेऊन येत असल्याबाबत (२८५८४).

**गोविंद नीळकंठ – (—)** : खेराड्या येथील लागवण, देशमुखी सरदेशमुखी ऐवजाची वसुली वगैरेबाबत (२८४८९).

रुमाल क्र. ५४, पुडके क्र. २ चालू :

पत्रें चालू :

**जानराव माने** – ( — ) : खर्चास ऐवज दिल्याबाबत, २६ ज. खर, खमस / २० डिसेंबर १७६४ ( २८४०९ ).

**जिवाजी गणेश** – ( — ) : आज्ञेप्रमाणे रुस्तुमगज हत्तीची रवानगी ( २८५२१ ).

**त्रिंबक मोरेश्वर जोशी** – ( — ) : तूप पोहोचल्याची पोंच, तांदूळ व शाकभाजीविषयी विचारणा ( २८४७१ ).

**त्रिंबक रामचंद्र बापट** – ( — ) : मौजे गोटणे देवाचे येथील जप्ती सरकारांतून प्रेषकातर्फे केली असता त्याच्या मोकळिकेविषयी सनद न आणताच खोत जबरदस्तीनें वसूल करीत असल्यासंबंधी ( २८३०९ ).

**नरसो मेघःशाम** – ( — ) : भाऊ दांडेकर याजकडून ऐवज घेऊन पाठविल्याबाबत ( २८४१० ).

**निळो गोपाळ** – ( — ) : प्रत्यक्ष प्रापकास भेटूनच कांही वर्तमान सांगण्याची इच्छा ( २८३३४ ).

**बावजी पाटील** – ( — ) : शेताच्या उभारणीकरितां ऐवज देण्याची विनंती ( २८४५२ ).

**बाळाजी कृष्ण ठोसर** – ( — ) : हैबतराव शितोळे यांचे मौजे लवळे येथील कुरणाच्या जप्तीची मोकळीक करण्याबाबत हरीपंत-तात्याचे पत्र आले आहे त्याबाबत निवेदन करणारे ( २८३२९ ).

**बाळाजी सदाशिव व गोविंद नीळकंठ** – ( — ) : वेजेगांव येथील शिवेच्या खटल्यासंबंधी चौकशी करून येत असल्याबाबत ( २८४७५ ).

**भिकाजी सिधये** – ( — ) : वाड्यांत येऊन पूर्वीप्रमाणे हिशेब लिहावयास घेतले आहेत, ते हिशेब कोण कोणाकडे कसे कसे सोपविले त्यासंबंधी तपशील, इ. स. १८१७-१८ ( २८३०८ ).

**महादजी नारायण दिवेकर** – ( — ) : पा। भेलसे व खामडोहा येथील ( हिशेबी ) कराराची याद व अजमास पाठविला त्याची पोंच, आश्विन व. १०, सु. ११७६/१९ ऑक्टोबर १७७५ ( २८३१६ ).

**महादजी शिवदेव** – ( — ) : कर्जाऊ ऐवजाचा व्यवहार झाला त्याचा हिशेब करण्याबाबत ( २८५६३ ).

**मानाजी जाधव व सटवोजी राऊत** – ( — ) : सरकारी कुरणात अनधिकृत शिरलेली बकरी प्रापकाकडे पाठवीत असल्याबद्दल ( २८५६९ ).

**मोकदम खरोडी** – ( — ) : खरोडी येथील रसदेचा ऐवज पाठविला त्याचा तपशील ( २८४२९ ).

**मोकदम वाजे का। इटे** – ( — ) : पुजारी मल्हारी गुरव येथे नसल्यामुळे दुसऱ्याकडून पूजा करून घेण्यासंबंधी तजवीज करण्याबद्दल ( २८४७८ ).

**मोकदम सोकर्डे का। इटे** – ( — ): देशमुखाचा रोखा रुपया मसाला घेऊन वसूल करण्यासंबंधी आज्ञा देण्याबद्दल ( २८४७९ ); मडगांव येथून स्वारास मनाई हुकूम आला आहे त्याची नक्कल पाठविण्याबाबत ( २८४९० ).

**मोकदम सिवणी का। भालवाणी** – ( — ) : इस्लामपूर येथून पत्र आल्याची खबर व पाटील कुलकर्णी येणार असल्याची बातमी ( २८४८३ ).

पत्रें चालू :

**मोकदम, हणमंतवाडी इटे** – ( — ) : कारसाई ऐवज पाठवीत असल्याबाबत ( २८४८७ ).

**मोरो वासुदेव** – ( — ) : मौजे कावी येथील प्रेषकाच्या शेतातील वाईट व खराब झालेला तेवढाच तीळ काढून टाकला असून बाकी तसाच आहे याबाबत कोणीतरी गैरसमज करून दिला असल्याबद्दल ( २८३३६ ).

**मोरो हरी** – ( — ) : शास्त्रीबावास येण्याची विनंती केली असून त्यास त्यांची मान्यता ( २८३६६ ).

**मोरोबा*** – ( — ) : बाजीपंत गोगटे यांचे मंगळवारी पुण्यास गमन व बुधवारी संध्याकाळी लष्करांत परत आगमन ( २८४०५ ).

**यादवराव रघुनाथ** – ( — ) : प्रेषकाकडे एकाच महालाचा बंदोबस्त सोपवावा ही विनंती ( २८३५८ ).

**यादव रंगनाथ** – ( — ) : पवार याजकडील पा। नेवासे येथील चौथाई मोकाशाची जप्ती बापूजी निंबाजी याजतर्फे प्रेषक करीत असता रामचंद्र नाईक परांजपे या जमीनदाराने हरकत घेतल्याबाबत ( २८३१३ ).

**रंगो विश्वनाथ नि॥ जकात** – ( — ) : दोनशे रुपयांचा हवाला देण्याविषयीच्या हुकुमाच्या अंमलबजावणीबाबत तक्रार ( २८३६३ ).

**रामचंद्र नारायण** – ( — ) : पक्षाबद्दल खर्चास ऐवज देण्याबाबत ( २८३७९ ).

**रामाजी सदाशिव** – ( — ) : तर्फाच्या वतनासंबंधी तंटा म्हणून रामजी पाटील, बाबाजी व प्रापक भेटावयास येण्याबाबत ( २८४५६ ).

**विष्णु लक्ष्मण आठल्ये** – ( — ) : चौकशीस असलेल्या वाई पट्यातील गांवांची चौकशी पूर्ण झाल्याबाबत ( २८३०७ ).

**शिवाजी अनंत** – ( — ) : वनचराई व कुरणे याचा वसूल प्रेषका-कडून घेण्याबाबत हुकूम झाले परंतु पर्जन्याभावी उत्पन्न नाहीं तरी हुकूम मागे घेण्याची विनंती ( २८२९५ ).

**सदाशिव अनंत** – ( — ) : गांवच्या कुळांना मदत करण्याची विनंती ( २८५७८ ).

**सदाशिव जोशी** – ( — ) : जकात बंदर पनवेल, प्रांत कल्याण भिवंडी येथील झाडा, गुमास्ते यांची रुजुवातीची पत्रें, रोजनिशीची टीप वगैरे हिशेबी कागदपत्रें पूर्ण करून पाठविली त्याचा तपशील ( २८३१० ).

**सदाशिव भिकाजी** – ( — ) : वराता पाठविल्या त्यांची पोंच व त्यांची वसुली करून ऐवज पाठवून देण्याची तरतूद करीत असल्या-बद्दल ( २८३११ ).

**हरी माणकेश्वर कुलकर्णी** – ( — ) : मौजे धानवड येथील हिशेब घेऊन येत असल्याबाबत ( २८४८० ).

[ फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेली ]

( — ) – **आनंदराव*** : गांडापूर येथील सोडचिठ्ठी त्वरित घेऊन येण्याबाबत ( २८४३४ ).

( — ) – **आण्णासाहेब*** : मौजे बोबळे तोफखान्याकडील तोफ व बैल अलीकडेच शेतात सोडल्याबाबत ( २८३६२ ).

रुमाल क्र. ५४, पुडके क्र. २ चालू :

पत्रें चालू :

(—) – **गणेशपंत तात्या*** : आज्ञेप्रमाणे ज्योतिर्सिंग शिपाई याजकडून दोन रुपये गुन्हेगारी घेत असल्याबाबत (२८४६६).

(—) – **गणेशपंत भावे** : पगाराचा ऐवज पाठविणे, जिन्नसांची खरेदी, पत्रांची पोंच, तारगांवचे हिशेब वगैरे कलमाबाबत (२८२९४).

(—) – **गंगाधर पंडित** : कुशल पत्रोत्तर (२८५६२).

(—) – **गोविंदपंत देवधर** : मौजे कोहोज पा नेवासे हा म्हसोजी थोरात याजकडील गांव केशव विश्वनाथ याजकडे दिला आहे तरी त्याचा संपूर्ण जमाखर्ची हिशेब पाठवून देण्याबद्दल (२८३५५).

(—) – **दाजी*** : विरवाडी येथे ताकीद पाठवून ऐवज वसुली करीत असून वरात पूर्वीच काढली असल्याबाबत (२८३४६).

(—) – **दाजीबा*** : बहुल येथे केलेला रोखा आठ दिवसांकरिता मना केल्याबाबत (२८३४३).

(—) – **दादास्वामी*** : कडबा व लाकडे याविषयी कमाविसदारावर चिठ्या देण्याबाबत (२८५२२).

(—) – **नरसीपंत*** : वसई व मुंबईकडील बातमी पाठविली तिची पोंच (२८३४९); गारद्यांच्या रोजमुरा ऐवजांकरिता धर्माजी गोगटे याजवर गुन्हेगारीकरितां वरात दिली त्याचा ऐवज त्वरित वसूल करण्याबाबत (२८३८५).

(—) – **नारोपंत*** : राजापूर वगैरे प्रांतांच्या गांवकुलकर्णाच्या मनसुबीकरितां आज्ञा होईल तेव्हांच येण्याबद्दल (२८४३१).

(—) – **बच्याजी जोगळेकर** : पा डभई येथील इ. स. १८०५-०६ चा ताळेबंद परत पाठविण्याबाबत (२८४४५).

(—) – **बापूसाहेब*** : शिरेढोण येथील लोक देशमुख देशपांडे यांच्या ताकीदीची दिक्कत करितात तरी त्याबाबत योग्य त्या आज्ञा देण्याबाबत (२८५५८).

(—) – **बाळाजीपंत*** : आपण गांवास जाऊन बरेच दिवस झाले तरी लवकर परत येण्याबाबत (२८३४४).

( ) – **महादजी डुबल** : दोन महिने झाले तरी अजून गांवचा वसूल पाठविला नाही म्हणून ताकीद (२८५७३).

(—) – **माणकोबा*** : स्वारीबरोबर सामान पाठविण्याच्या सूचना (२८५५६); गोविंदपंत विठ्ठल याजकडे पाठविलेल्या वरातेचा ऐवज वसूल झाला किंवा कसे त्याबाबत विचारणा (२८५५९).

(—) – **मोकदम इंदापूर** : पोता ऐवजामध्ये वसुली ऐवज जमा झाल्याबाबत (२८४०६).

(—) – **मोरोपंत*** : महाजनी भोंडवे प्रेषकाकडे चाकरीस नसल्याबाबत (२८५४९).

(—) – **मोरोपंतदाजी*** : कांही खाजगत बोलणी करण्याकरितां प्रेषकाकडे येण्याची विनंती (२८५६०).

(—) – **मोरोपंतदाजी*** : वाईचे देशपांडे यांच्या ऐवजाचा ठराव करून पाठविण्याबाबत (२८५३८).

पत्रें चालू :

(—) – **रामाजीनाना दांडेकर** : बळवंतराव याचे कर्ज त्याच्या चालू महिन्याच्या पगारातून कापू नये म्हणून विनंती (२८३४०).

(—) – **रायाजी रघुनाथ कुलकर्णी** : मोजे तुजारपूर येथील तीन सालच्या बटाच्याची झडती घेऊन इस्लामपूर येथे येणे, २० र. वल, सु. १२२६/२ नोव्हेंबर १८२५ (२८२९८).

( - ) – **शिवरामपंत*** : गोविंदराव कृष्ण काळे याच्या जप्तीपैकी आबा काळे याच्या घरी असलेले दागिने पाठवून देण्याबाबत (२८४०४).

(—) – **हरीपंत*** : सासवडच्या मनसुबीकरितां प्रेषकास आणले असून अजूनपर्यंत निरोप होत नसल्याची तक्रार (२८४७३).

(प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख नसलेली पत्रे व सरकारी चिठ्या अत्यंत त्रोटक स्वरूपात असून प्रत्येक ठिकाणी अर्थबोध होतोच असे नाही तरी शक्य तेवढा खुलासा करून पत्रे व चिठ्या लिहिल्या आहेत.)

[प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख नसलेलीं]

पाटीलकीचा मान जप्त झाला असला तरी मोकाशाचा मान मात्र तसाच चालू राहाण्यासंबंधी (२८२९६); का नांदणज येथील अंमल सुरळीत घेतल्याबाबत समापत्र, कडेवलीत वगैरे ठिकाणचा मोकासा अंमल घेण्याविषयी सूचना (२८२९९); विनंतीप्रमाणे ऐवज पाठवीत असून गवत कापून रचून ठेवले असल्याबद्दल (२८३१८); संभाजी पाटील पवार व शंकराजी पाटील यांच्या मौजे अरफळ संमत नींब येथील मोकदमीच्या खटल्यात मोकदमीच्याच कागदत्राची चौकशी करण्याची विनंती (२८३३०); पटवारी यांनी दिलेल्या आसामींची याद पाहून योग्य त्या आसाम्या ठेवण्याविषयीं (२८३३२); प्रेषकाने रणदुल्लाबाद येथील मामलत करावी या सूचनेवर विचार करण्याकरितां प्रापकाच्या भेटीस येत असल्याचे निवेदन (२८३४५); विनंतीप्रमाणे ऐवजाची रवानगी (२८३५१); कसबे शिराळे पेटा वाळवे येथील गोरखनाथांचे गोसावी यांच्या विनंतीप्रमाणे अर्धा आण्याची सूट दिल्याबाबत (२८३५३); रघोजी जगताप याजबरोबर २०० रु.चा ऐवज पाठविल्याबाबत (२८३५४); तोडापूर पा जामनेर ह्या बयानखान याजकडे जहागीर असलेल्या गावाची जप्तीची मोकळीक केल्याबाबत मोरो नारायण यास लिहिण्याबाबत (२८३५६); संताजी व चिमाजी देशमुख यांच्या जप्तीचा हिशेब त्वरित पाठविण्याबाबत ताकीद, इ. स. १७८४-८५ (२८३५७); रत्नागिरी येथील जमेनिशी प्रेषकाकडे देण्याबाबत (२८३६०); समसामद्दौला याजकडून तीन लक्ष ऐवजाचा (दीड लाख नक्त व दीड लाख जिन्नस) करार गंगोबा याच्या तर्फे झाला त्याची नक्त चिठ्ठी धोंडीबा नाईक याजवर देण्याबाबत (२८३६१); बनाजी पाटील याच्या भावास पाठवून देण्याबाबत (२८३६५); स्वामी प्रतिपदेपासून दरबारात येणार असल्यासंबंधी (२८३६७); गदग व नवलगुंद येथे लागोपाठ दोन वर्षे पडलेल्या दुष्काळामुळे रयतेस सूट मिळण्याकरितां सरकारतर्फे विठ्ठल नारायण यास पहाणीकरितां पाठविण्याबाबत, पा खानापूर येथील सरदेशमुखी वतनाबाबत कित्तूरकर व जांभोटकर याच्या कजियाचा निकाल करण्याबाबत (२८३७३); देवगड व दौलताबाद येथील अजमास पाठविले ते पावले, उंदेरी, अंजनवेल, नेरळ, विजयदुर्ग येथील अजमास, कर्ज व व्यवस्था यासंबंधी सूचना, इ. स. १७६८-६९ (२८३७४); येणे असलेल्या ऐवजापैकी आण्णाजी व बापूजी कानडे

रुमाल क्र. ५४, पुडके क्र. २ चालू :

पत्रें चालू :

यास शंभर रुपये देण्याबाबत (२८३९४); पेटा वाळवे येथील वसूल खजिन्याबरोबर पाठविला त्याचा तपशील (२८३९७); भगवंत काशी यास शेतास उपद्रव न देण्याबद्दल ताकीद देण्याविषयी (२८४०१); किल्ले माहुलीपैकी धोंडजी बुरुडास अडसेरी देण्याबाबत (२८४०३); बापूसाहेब, शिवराम हरी व कावजी पारसी याजमधील ऐवजाच्या देवाणघेवाणाविषयी (२८४१६); शिलेदार लोकांच्या तैनातेचा कागद रुजु पहावयाचा तो रुमाल कृष्णाजी गोडबोले याजबरोबर पाठवून देण्याबद्दल (२८४१८); सरदार लोकांस द्यावयाचा ऐवज पाठविण्याची विनंती (२८४२४); दुल्लभ याचा मसुदा घेऊन येण्याबाबत (२८४२७); पेंडसे यांच्या बागाचे अर्जितखत घेऊन फडशा करण्याबाबत (२८४२८); सातारा येथील भानाजी तेली याजकडून कडब्याच्या कलागतीबद्दल गुन्हेगारी घेतली ती अयोग्य (२८४३०); आनंद कृष्णाजी यादव याजबरोबर पगार वगैरेचा ऐवज पाठविला तो पोहोचला (२८४३७); मौजे अजणूज व बावडे येथील कुलकर्णी यांना कडक ताकीद देऊन गांवी पाठवून देणे (२८४३८); पुण्यास जाण्याकरितां आज्ञेप्रमाणे पाच प्यादे तयार ठेविले असल्यासंबंधी (२८४४०); मौजे सुरंगली येथील पाटील कुलकर्णी, कजियाचे कागद पाठविले त्याची पोंच (२८४४२); पाटणहून आलेले फिरंगी व त्याजबरोबरील स्वार कारखान्याचे जवळ ढाल उभी करीत आहेत अशी नाथूराम याची बातमी (२८४४३); गोसावीबावा यांचा कजिया नीट तऱ्हेने विल्हेस लावण्याकरितां परसवा गोसावी याजकडून योग्यता पाहूनच जामीन घ्यावा याविषयी (२८४४४); मौजे वाहले येथील कुरणाच्या कजियाबाबत राऊत रवाना (२८४४६); खंडो सामराज याच्या वाढासंबंधीच्या कागदपत्रांत त्यास जोशी कुलकर्णी या नावाने संबोधले नसल्याबद्दल (२८४४७); बाळाजी घोरपडे यास घरी जाण्याविषयी आज्ञा करण्याबाबत (२८४४८); विजयदुर्ग व धुळूप याजकडील आरमाराच्या कामकाजाच्या बंदोबस्ताबाबत (२८४४९); पाटील देहगांवकर यांची चिठ्ठी निशा करावयास परत नेली ती पाठवून देण्याबाबत (२८४५३); प्रापकाच्या पत्राप्रमाणे चौगुले पंचवीस रुपये घेऊन आल्यावर मना चिठ्ठी पाठवितो म्हणून (२८४५४); शिवराम रामचंद्र यास पोताकडून कर्जाऊ दिलेला ऐवज बाजीराव रामचंद्र याजकडील हिशेबात वजा केल्याबाबत (२८४६२); कोठीपैकी सामान मिळाले त्याची यादी (२८४६३); प्रेषकाने पाठविलेले लखोटे बापू काशीकर याजपाशी देऊन प्रेषकाच्या घरी देण्याबद्दल (२८४६४); दामोदरपंत याजकडील काम करून घेण्याबाबत (२८४६८); नागेवाडी येथील पट्टी भरून वसूल चालता करून भाजी वगैरे सामान आज्ञेप्रमाणे पोहोचते केल्याबद्दल (२८४७६); घरगुती कुशल समाचार (२८४७७); कनातीसुद्धा राहुटी पाठविली त्याची पोंच (२८४८४); देवस्थानच्या हिशेबाकरितां एक दस्ता कोरे कागद पाठवुन देण्याबाबत (२८४८५); केडगांव येथून सरदेशमुखीच्या ठरावाकरिता आलेल्या पत्रास उत्तर पाठविल्याबाबत (२८४८६); खंडेराव बल्लाळ याच्या बागेकडील विष्णु पांडुरंग कारकून याजविषयी तात्यांना पत्र लिहिण्याबाबत (२८४९७); कृष्णराव बल्लाळ यास लाकडाचा पुरेसा साठा देण्याबद्दल (२८५०२); वैरणीची तरतूद करण्याविषयी (२८५०३); विष्णु पांडुरंग, विष्णु राम व भास्कर अनंत या आंसामीबाबत तात्यांना पत्र देण्याबाबत (२८५०४); लछीराम याजबरोबर वाड्यात येण्याबद्दल (२८५०५); राधाबाई व बाळाजीपंत ठोसर यांचे थेऊर येथे बोथाटी बारदारास साक्षीस बोलाविण्याबाबत बोलणे झाले तेव्हां स्वतः उपस्थित असल्यासंबंधी (२८५०६); थट्टी (गायी बैल

पत्रें चालू :

वगैरेच्या देखरेखीस असलेले खाते) कडे द्यावयाच्या धान्याचा तपशील (२८५०७); वैशाख महिन्यांत तोडलेल्या सागवानी लाकडांचा तपशील (२८५०८); लिहिण्याकरितां कोरे कागद देण्याविषयी विनंती (२८५०९); बाबूराव याजकडून पाच शेरी सुपारी देण्याबाबत (२८५१०); गणतीस कारकून नेमून देण्याची विनंती (२८५११); धोंडो महादेव यास सांगून नारो बाबाजी याजवर वरात लिहिण्याबाबत (२८५१२); ऐवज देण्याविषयी विनंती (२८५१४); प्रापकाकडे आलेल्या जिन्नस व धान्यांतून सरकारची चिठ्ठी देण्याबाबत (२८५१५); उंबऱ्याच्या पागेबरोबर आलेले चांगले बोरू पाठवून देण्याबाबत (२८५१७); प्रतिनिधीकडील चांगले आंबे पाठविण्याबाबत (२८५१८); महंमदअली यास फाल्गुन महिन्याचा रोजमुरा दिला असल्याबाबत (२८५१९); गारदी यांची पावती लिहून पाठविली त्यातील चुका कारकून याजकडून रुजु करून घेण्याबाबत (२८५२०); लिंगोजी नाईक, नारो शंकर याजकडून आले त्यांचा रोजमुरा देण्याबाबत (२८५२३); हैबतसिंग याजकडील हिशेबाकरितां आलेल्या कारकुनांची यादी नांवनिशी लिहून पाठविण्याबाबत (२८५२४); विठोबा यानें घेतलेल्या घरासंबंधी वाद आहे तेव्हा त्याचा निकाल करण्याची विनंती (२८५२६); खटल्यांत ज्याचे खरे होईल त्यानें दुसऱ्यास नुकसान भरपाई देण्यासंबंधी (२८५३१); भगवंतराव सावकार याजकडून जकातीचा ऐवज येणे असल्याबाबत (२८५३३); फैसल्याच्या एका प्रतीवर रुजु पहाणाराचे नांव घालण्याबद्दल (२८५३५); गहाणपत्र प्रत्यक्ष पाहिल्याविना पत्र घालता येत नसल्याची तक्रार (२८५३९); शिवेच्या कजियाच्या जमिनीचा कब्जा घेणार त्या जमिनीचा तपशील (२८५४०); शास्त्रीबावास चिठ्ठी लिहिण्याबाबत (२८५४१); भंडारी याचा न्याय विल्हेस लावण्याबाबत (२८५४२); मुडगी येथून आलेले वासुदेवपंतदादा याचे व मोहनसिंग याचे पत्र प्रापकाकडे रवाना (२८५४६); मुसापीत याजकडील माणूस सोडून देण्याबाबत शिपाई यांनी अंतोबाचा माणूस मारला होता तो झोळीत घालून आणिला होता तरी त्यास आज्ञा असल्यास सोडून देतो म्हणून (२८५४७); मखलाशी करावयाच्या यादीवर जमिनीसंबंधात बेवारस व जाकीर्द (नापिक) लिहिण्यासंबंधी सूचना (२८५४८); विडे, कोरे कागद वगैरे सामान आज्ञेप्रमाणे रवाना (२८५५०); गलबतावर भात भरून पाठविण्याबाबत (२८५५१); खंडेराव पोळ यास भेटीस घेऊन येण्याबाबत (२८५५४); रामाजीपंत काका याचे काम यादी प्रमाणे करून घेण्याबाबत (२८५५५); पाल आले म्हणजे निघावयाचा मानस (२८५६१); मारामारी प्रकरणाबाबत जे कतबे दिले आहेत त्याचा फडशा करण्याबाबत (२८५६५); दागिन्याची पेटी यादीसकट पाठवून देण्याबाबत (२८५६६); रामजी नाईक निकम यास तीनशे रुपयाचा ऐवज देण्याबाबत (२८५७०); कुशाबा करखडे याजबरोबर पाठविलेल्या ऐवजाची पोंच (२८५७४); गावापैकी साडेआठ पायलीचा शिधा देण्याबाबत (२८५८०); प्रतापगड किल्ल्याच्या कोठीकडे जमा झालेल्या जिन्नसांचा तपशील (२८५८२); चोरांच्या कजियाबाबत मसाले करून ढालाईत देवविण्याची विनंती (२८५८६).

मसुदा :

मौजे कोले प्रांत कऱ्हाड येथील यकीनशहा फकीर यास इनाम जमीन होती त्याचा करार संपल्यामुळे व तो मयत जाहल्यामुळे जप्ती करण्यांबाबत (२८३५९).

**रुमाल क्र. ५४, पुडके क्र. २ चालू :**

**याद्या :**

आप्पाजी माणकेश्वर याजकडील कमाविसदाराकडून तिवट वगैरेची व गोपाळसिंग याजकडील बंदुका, गलेफा वगैरे सामानांची (२८३९३); खाशाकडे वर्षश्राद्धाकरितां केशर व कस्तुरी देण्या-संबंधीची (२८४९६).

**रसानगी याद्या :**

विजयदुर्ग येथील मामलतीबाबत रामचंद्र भिकाजी करंदीकर व केशव भास्कर सोवनी यांचा ऐवजाचा लढा पडला, त्याची पंचाईत होऊन निर्णय होईल तो मान्य करण्याबाबत (२८३७१); गोविंदभट पालकर याजकडे पदाजी देशमुख याजकडून कर्ज येणे त्याची वसुली त्रिंबक विश्वनाथ याने केली असून त्यापैकी सरकारात घ्यावयाचा चौथा हिस्सा त्रिंबक भालेराव यास नालबंदी म्हणून देण्याबद्दल (२८३७०); शिवाजी काकडे यास मातोश्रीच्या श्राद्धानिमित्त ऐवज देण्याबाबत (२८५५२).

**सरकारी चिठ्या :**

हरी गंगाधर यास लिहिलेले पत्र त्यास ऐवज द्यावयाचा तेव्हा देणे (२८३३८); आण्णा याजकडून लष्करचे वर्तमान व घाटाची बातमी आल्याबाबत (२८३३९); त्रिंबक विनायक याजकडील श्रीवर्धन प्रांत राजापूर येथून सुपाऱ्या वगैरे सामान आल्याबाबत (२८३८२); महंमद शरीफ कमानदार यास रोजमुरा ऐवज देण्याबाबत, सु. ११६७/इ. स. १७६६-६७ (२८३८३); राणोजी नाईक निंबाळकर यास हत्ती व पालखीकरितां दुमाही रोजमुरा ऐवज व्यवस्था, सु. ११६७/इ. स. १७६६-६७ (२८३८४); सदाशिव नरसिंह घोरपडे शिलेदार यास रोजमुरा ऐवज देणे, २६ ज. खर, सु. ११६५/२० डिसेंबर १७६४ (२८३८६); त्रिंबकजी, भिकाजी नाईक, धुळोजी देवकांते वगैरेंच्या जासूद जध्यास द्यावयाच्या रोजमुरा ऐवजाबाबत, २६ ज. खर, सु. ११६५/२० डिसेंबर १७६४ (२८३८७); केरोजी यास जामदारखान्यापैकीं रुमाल वगैरे देण्याबाबत (२८३८८); रावजी शितोळे यास निरोपाच्या वस्त्राबाबत कापड देण्याबाबत (२८३८९); खासा व कारकून या आसामींच्या रोजमुऱ्याकरितां रघुनाथ थोरात यास ऐवज देण्याबाबत, १४ मोहरम, ज्येष्ठ समान/१२ जून १७६७ (२८३९०); शामराव बल्लाळ कृष्ण यास रोजमुरा ऐवज देण्याबाबत (२८३९१); नारो कृष्ण कारकून, पागा यास पायदुखीवर लक्ष्मी विलास तेल देण्यासंबंधी (२८३९८); भवानीशंकर रघुनाथ याज-कडील माणसास रोजमुरा ऐवज देण्याबाबत, ८ सफर, आर्बा/१८ ऑगस्ट १७६३ (२८३९९); चवकोजी काटे यास मौजे लोहम ता निरथडी प्रांत पुणे येथील मोगलाई, बाबती, मोकासा करून देण्या-बाबत (२८४०७); राघोबा जोगळेकर यास रोजमुरा ऐवज देणे, १ जिल्हेज, १२०३/२५ मार्च १८०३ (२८४०८); मालोजी पिसाळ याजकडील लोकास नालबंदी ऐवज देण्याबद्दल (२८४११); श्राद्ध खर्चास भिकाजी साबाजी यास ऐवज देण्याबाबत, २० सवाल, सु. ११७१/६ फेब्रुवारी १७७१ (२८४१४); राणोजी मुळें यास नालबंदी-ऐवज देण्याबद्दल (२८४१५); सटवोजी आटोळे यास नालबंदीऐवज देण्याबाबत (२८४१७); परशराम पावगे यास नालबंदीऐवज देण्याबद्दल (२८४१९); महादजी बल्लाळ जोगळेकर यास नालबंदी-ऐवज देण्याबद्दल (२८४२०); स्वारीतील शिल्लक व प्रत्यक्ष मोजदाद यात तफावत असल्याने शिलकेचा झाडा तपशीलवार पाठविण्याबाबत

**सरकारी चिठ्या चालू :**

(२८४२१); नागोजी शिंदे यास नालबंदीऐवज देण्याबाबत (२८४२२); गारदी यांची बाकी आता कोणत्याहि प्रकारे राहिली नसल्याबाबत (२८४२३); गोविंदराव मोरेश्वर, दप्तरयाने खाजगत पाच खंडी तांदळाचे दस्तक पूर्वीप्रमाणे पावले असल्याबाबत (२८४२५); खुशालसिंग वगैरे गारदी यांचा रोजमुरा ऐवज देण्या-बाबत (२८४२६); सोनपेठची सनद कमाविसदार महादजी अनंत व बाळाजी हरी यांच्या नांवे लिहून देण्याबाबत (२८४३२); आप्पाजी शंकर नीळकंठराव यास खाजगी नेमणुकीपैकीं बाकी राहिलेला ऐवज देण्याबद्दल (२८४३३); रामाजी मल्हार याजकडील ताकीदपत्रें व रुद्राजी खंडेराव याची पत्रें देण्याबद्दल (२८४३५); त्रिंबकराव बगाजी पारसनीस यास नाना फडणीस याजकडून पाऊणशे आख कापड देण्याबद्दल (२८४३६); कोरू न्हावी यास पांघरूण घेण्याकरितां ऐवज देण्याबद्दल (२८४४१); सदाशिव अवधूत मुनशी यास अब्दागिरीचा रोजमुरा ऐवज देण्याबद्दल (२८४५१); अवचितगड व बिरवाडी येथील बाबूराव पासलकर व भास्कर बल्लाल यास निरोप समयी वस्त्रे दिली त्याची यादी पाठविण्याबाबत (२८४६०); राहुटी दुरुस्त करावयास शिंपी पाठवून देण्याबद्दल (२८४६१); शंकराजीपंत, शामराव वगैरे याजकडील तांब्या पितळेची भांडी व त्याच्या वजनाबाबत (२८४७०); पांडुरंगपंत याजविषयी कागदपत्र देण्याबाबत (२८४७२); शिलेदार यास नालबंदी ऐवजाची पोंच, सु. ११६७/इ. स. १७६६-६७ (२८४९३); राघो संताजी याच्या शेतातील माल पैसा न देता नेणाऱ्या गणेश भिकाजी यास ताकीद देण्याबद्दल (२८४९४); तुळसाजी पाटील याजकडील माणसास जखम झाली आहे तरी खर्चास ऐवजाची मागणी (२८४९५); बंडगर यास श्राद्धतिथीकरितां ऐवज देण्याबद्दल (२८४९८); सुभानजी जगताप पुरंदर यास तिवटे, पासोड्या वगैरे सनगे देण्याबाबत (२८४९९); आनंदीबाईकडील केरो माने आब्दागिऱ्या यास रोजमुरा ऐवज देण्याबद्दल, १५ ज. खर, खमस/९ डिसेंबर १७६४ (२८५००); वातीस व दिवट्याकरितां चिथडे दीड मण दीड शेर देणे (२८५०१); मनोहर कोन्हेरे संबल-गडकरी याजकडे दिलेल्या वस्तूंबाबत (२८५२५); सिद्दी अरब यास तोफखान्यापैकी दारू देण्याबद्दल (२८५२७); डुगोजी नाईक याजकडील जासूद जध्यास रोजमुरा ऐवज देण्याबद्दल (२८५२८); तैवजखर्चाच्या तपशिलाबाबत, सु. ११६७/इ. स. १७६६-६७ (२८५२९, २८५३०); रायमल याजकडील जासुदास रोजमुरा ऐवज देण्याबाबत (२८५३२); पागेकडील खर्चाबाबत (२८५३४); जमखंडीच्या जमीनदारावर शंभर रुपयाचा मसाला व दालाईत देणे (२८५४३); राणोजी चासकर याचा ऐवज व नक्त नरसिंगराव याजकडे देण्याबद्दल (२८५४४); पागेकडील सामान देण्याबाबत (२८५४५); बालंभट यास धर्मादाय ऐवज दिला त्याबाबत, ३ ज. खर, सु. ११९८/२३ नोव्हेंबर १७९७ (२८५७५); मौजे नागेवाडी येथील गांवकरी बसवून ऐवजाची निशा करून घेण्याबाबत (२८५७९); बाबूराव चव्हाण व लक्ष्मण फाळके यांची कोलापूर (कोल्हापूर?) स्वारीवर नेमणूक केली असता धटाई करून तिकडेही जात नाहींत व पांडवगडकडेही येत नसल्याचे निवेदन (२८५८१); सदाशिव यशवंत यास नालबंदी म्हणून पन्नास रुपयाचा ऐवज देण्या-बद्दल (२८५८५).

* मूळ नांवाची निश्चिती होत नाही.

रुमाल क्र. ५४, पुडके क्र. ३ — शु. स. ११३८

का. सं. ६१ (२८५८७–२८६४७) — इ. स. १७३७

**अर्जदास्त :**

**भगवंतराव साबळे – दिवाण-वंदनगड :** संभाजी पाटील यांच्या वडिलांनी मोहरी येथे दिव्य केले नाही त्याचे कागदपत्र दसरा झाल्यावर घेऊन येत असल्याबद्दल (२८६०५).

**जामीन कतबा :**

**यमाजी संताजी कुंभार – पंतप्रधान* :** रखमाजी पारनेरकर कुंभार यास जातीबाहेर टाकलेल्या तंट्यात दिलेला (२८६४०).

**पत्रें :**

**चिमणाजी आप्पाजी – गोविंदपंतबापू* :** घरगुती मजकूर (२८६४७).

**चिमणाजी बल्लाळ – नाना* :** पुण्यास पाठविलेल्या नूर महंमद यास रोजमुरा देण्याबद्दल (२८६४३).

**बापूजी रामचंद्र – पांडुरंगपंत* :** इंग्रजांच्या फौजेचे पाडळी येथून सातान्यास कूच, पुढे चंदन वंदन पर्यंत येणार अशी बातमी (२८५९७).

**बाळाजी बाजीराव – जनार्दन बल्लाळ :** बेलदार, शिंपी, न्हावी, वेलदोडे, विड्याची पाने वगैरे जिन्नस रवाना करण्याबाबत (२८६३१).

**महिपत परशराम – देवराव गोपाळ :** अंगरखा शिवण्यास दोऱ्याची मागणी (२८६११).

**रखमाबाई* – रामशास्त्री* :** नीळकंठराव याचे लग्न ठरल्याची बातमी (२८५९२).

. **लक्ष्मण* – नानासाहेब* :** भेटीस सत्वर येत असल्याबद्दल (२८६३३).

**वासुदेव जोशी – आप्पास्वामी* :** फिरंगाण येथे चोरांच्या होत असलेल्या उपद्रवाचा बंदोबस्त करण्याची सूचना (२८५९८).

**विठ्णु आबाजी देवधर – जगन्नाथपंततात्या* :** आचरे येथील किल्ले सर होऊन सुभेदार विजयदुर्गात जाणार असल्याचे वर्तमान (२८५९९).

**विसाजी दादाजी – रामशास्त्री* :** नेले येथील बहिरजी व रखमाजी यांचा व केदारजी व अनसोजी डांगे यांच्या शेताच्या तंट्याचा निवाडा करण्याबाबत (२८५९०).

**सखाराम धोंडदेव करंदीकर – बापूजीपंतबापू* :** चिमणाजीपंत-आप्पा याजकडून हिशेबाच्या रुजुवातीसाठीं आसी-उंबरी येथे आलेल्या कारकुनांस रुजुवात देण्याच्या आश्रेवरून विंचूरकर यांचे दहशतीने उज्याड झालेल्या गांवांच्या व लावणीबद्दल निवेदन (२८६०३).

**हरी परशराम – ताई* :** आप्पा पलुसकर याचा पिराजी शेळ्के याजकडे असलेल्या कर्जाऊ ऐवजाचा फडशा करण्याची विनंती (२८६०७).

**हरि बल्लाळ – रामचंद्रपंत* :** किल्ल्याच्या बेगमीसाठीं लक्ष्मण नाईक यास ऐवजाची मागणी (२८६०८).

**पत्रें चालू :**

**[पंतप्रधान यांना आलेलीं]**

**गणेश कृष्ण –** नाशिक येथून घोडी पळून गेल्यामुळें खेडे व उगाऊ प्रा चांदवड येथील पाटील, कुलकर्णी यांना जिवाजी पवार यांनी विनाकारण धरून नेल्याबाबत निवेदन (२८६३७).

**जोत्याजी जाधव –** गोईनवई येथील हिशेब आठ दिवसांत देण्याचे आश्वासन (२८६३५).

**त्रिंबक गोपाळ –** तंबूसाठीं रंगीत खाब रवाना (२८६३६).

**नारो जनार्दन –** संताजी शिंदे व तांदळे याजबरोबर पाठविलेल्या गुरे व शेळ्या यांची पोंच (२८६२९).

**महंमद हुसेन –** चाकरीची माणसे व बारगीर यांच्या नेमणुकेबद्दल विनंती (२८६३९).

**महादजी गोविंद –** खाजगी पत्रव्यवहारासंबंधीचा मजकूर (२८६४४).

**राघो रंगनाथ –** कृष्णाजी पवार यांच्या उर्जिताची विनंती (२८६४५).

**रामचंद्र कृष्ण –** महादजी व बाजी गलंडे यांच्या सांगवी येथील पाटीलकीच्या तंट्याबाबत निवाडा करण्याविषयी (२८६३८).

**रामाजी कृष्ण बापट –** प्रांत बेलापूर येथील जकातीच्या मामलतीवर घाट बंद झाल्याने आलेल्या तोट्याच्या बाकीची रक्कम माफ करण्याची विनंती व करणारकर जहागिरदार याजकडून मुंबईस जाणाऱ्या भाताच्या गलबतावर मिळत नसलेल्या जकातीबद्दल विनंती (२८६४६).

**[शास्त्रीबावा यांना आलेलीं]**

**भोंद जोशी –** नवीन इमारत बांधण्यासाठीं सरकारशी करारनामा झाला असताही सुभानजी याने दिलेल्या द्वाहीबद्दल (२८५८७).

**मावजी हांडे, शेटीबा भगत वगैरे –** चवेणीची पाने रवाना (२८५९३).

**रंगाजी राम –** प्रकृति ठीक नसल्याने चिरंजीव भेटीस येत असल्याबद्दल (२८५९५).

**लक्ष्मण भिकाजी :** वादी सरकारातून ताकीदपत्र आणून आपल्यास बोलावण्याच्या विचारात असल्याचे निवेदन (२८५९४).

**हरी कृष्ण –** चौल येथील पाटीलकीचे कामकाज स्वाधीन करण्यासंबंधी (२८५९६).

**हरी रघुनाथ भिडे –** श्रीमंतांचा ब्रह्मावर्तास जाण्याचा मनोदय, म्हसाजी जाधव यास पुन्हा चाकरीवर ठेवण्याची विनंती (२८५९१).

**हाजी महंमद इस्माईल –** हजरतशहा जानुलासाहेब यांच्या दर्ग्यातील हक्काच्या कागदपत्रांची मागणी (२८५८८).

**[फक्त प्रेषकांचा नामोल्लेख असलेलीं]**

**आबाजीराम गोडबोले – (—) :** गणपतराव, बळवंतराव व वेणुबाई यांची रवानगी, चांबळी येथील भाऊबंदकीच्या तंट्याबद्दल गावकऱ्याकडून घेतलेल्या गवताचे पैसे परत दिल्याबद्दल कऱ्हाड

**रुमाल क्र. ५४, पुडके क्र. ३ चालू :**

**पत्रें चालू :**

येथील रामचंद्रपंत भिडे याजकडील बाकी ऐवजाबद्दल (२८६२०-२१); गणपतराव याच्या लग्नाबाबत, आकलूज येथील मामलतीचे काम बळवंतराव याच्या नांवे करण्याबाबत (२८६२२); रावजी देशमुख याना देवाज्ञा, गणपतराव याची रवानगी करीत असल्याबद्दल (२८६२३).

**कृष्णाजी नारायण बापट** – (—) : हुमगांव, सरतल, कुडाळखोरे, सांगवी वगैरे ठिकाणच्या हिशेबाच्या रुजुवातीबद्दल निवेदन (२८६२६ – २८६२८).

**बाजी बल्लाळ** – (—) : ताकीदपत्र देण्याची विनंती (२८६४२).

**रंगराव मोहिते** – (—) : रायगांव येथील वतनदारांची वतनें कुलकर्णी करीत असल्याची वतनदारांची तक्रार व त्याबद्दल चौकशी (२८६२४).

**रामचंद्र भास्कर आठवले** – (—) : शिबंदीपैकीं शिपाई वाईपेठ्यास रवाना करण्यासंबंधी (२८६१४); वाई येथील बारावर्दीची रवानगी व कऱ्हाड, तारगांव येथील बारावर्दी आज्ञेप्रमाणे तयार करू असे निवेदन (२८६१५, २८६१६); परखंदी पेठ वाई येथील कागदपत्र जळाल्यामुळे नवीन तयार केलेल्या कागदपत्रांच्या रुजुवातीबाबत व रायगांव येथील कुलकर्णी याजकडील वहिवाटीस असलेल्या इनाम जमिनीच्या चौकशीसंबंधी (२८६१९).

**[फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेलीं]**

(—) – **आप्पासाहेब*** : केशव गोपाळ यांस बटकी खरेदीबद्दल सांगणे (२८६३४).

(—) – **चिमाजीआप्पा*** : गुदरलेल्या संकटाबद्दल निवेदन (२८६३२).

(—) – **देवराव गोपाळ** : महिपतराव कारखानीस यांच्या घरचा झोपाळा पाठवून द्यावा म्हणून विनंती (२८६०९); मंगळा-गौरीसाठी फुलांची मागणी (२८६१०); काशी दामोदर यास खालापूरपर्यंत बेगारी द्यावा म्हणून विनंती (२८६१२).

(—) – **देवराव गोसावी** : खरवडी येथील गांवापैकी दिलेला ऐवज खर्च झाला असल्यास कळविणे म्हणजे दुसरा पाठवू म्हणून निवेदन (२८६१३).

**पत्रें चालू :**

(—) – **नारोपंत*** : खंडो नारायण जोंधळे यांच्या सोमणगांव व जोहोरपूर पा। शेवगांव येथील समाईक असलेल्या कुलकर्ण वृत्तीस भाऊबंद तंटा करीत असल्याची तक्रार (२८६०२).

(—) – **पंतप्रधान*** : वसईच्या जनरलास पाठविलेल्या पत्रांच्या उत्तराची रवानगी (२८६३०).

(—) – **रामचंद्र भास्कर आठवले** : कुडाळखोरे येथे चौकशीस असलेल्या कृष्णाजी नारायण व कारकून ह्यांच्या पगाराची बारावर्दी रवाना (२८६१७, २८६१८).

(—) – **रामाजी रघुनाथ** : तुजारपूर येथील हिशेब तयार नसल्याने चिठी पावताच इस्लामपूर येथे बोलावणे (२८६०६).

(—) – **विसाजी भास्कर मामलेदार वाई** : परशराम रामचंद्र कोल्हटकर यांना दत्तक घेतल्यामुळे घ्यावयाचा नजरेचा ऐवज त्यांच्या उत्पन्नाप्रमाणे घेण्याची आज्ञा (२८६००).

(—) – **शास्त्रीबावा** : हंसाजी निकम यांच्या माहागांव येथे इनाम असलेल्या शेतातील नागलीच्या पिकाची नारोपंत देशमुख याने केलेली नासाडी (२८५८९).

(—) – **सदाशिव कृष्ण मामलेदार-जावळी** : जावळी येथील जमाबंदीसाठीं हुजूर बोलावणे (२८६०१).

**[प्रेषक व प्रापकाचा नामोल्लेख नसलेले]**

हिवरमाड येथील वसूल गांवकरी सुरळित देत नसल्याबद्दल (२८६२५).

**यादी जबानी :**

**जानकाई*** – (—) : स्वतःच्या पतीने बापू भोसले याजकडून घेतलेल्या कर्जाचा कागद कमाविसदाराने फाडून स्वतःच्या घरावर जप्ती आणल्याबद्दल (२८६४१).

**वरात :**

**पंतमंत्री*** – **कालवडेकर मोकदम** : बाबाजी अनंत याच्या ऐवजाची कालवडे येथील मोकदमावर, २२ सफर, सु. ११३८/ १० जून १७३७ (२८६०४).

* संपूर्ण नांवाची निश्चिती नाही.

## रुमाल क्रमांक ५५ पुडके क्रमांक १ ते ६

**पुडके क्र. १**

**का. सं. १११** (२८६४८ – २८७५८)

**पत्रें :**

**अहिल्याबाई पाटील जाधव – सखोपंतबापू*** : सिवमपूर येथील पाटीलकीच्या शेतांत नांगर न घालण्याबद्दल कारकुनास पत्र देण्या-बद्दल विनंती (२८६८४).

**आनंदराव आबाजी – श्रीधरपंत*** : पाठविलेल्या ताळेबंदाप्रमाणे बारागांव – नांदूर येथील रुजुवात दाखविण्याबद्दल विनंती (२८६८०).

**पत्रें चालू :**

**आनंदराव धुमाळ – शेखोजी धावरी** : पळशीकर पाटील यास बोलावून आणल्याबद्दल व गुळुंबकर यांनी दिलेल्या वायदारोख्याबद्दल (२८७४०).

**आप्पाजी नाईक पवार – बापूजीपंत*** : ऐवज व बकऱ्यांची मागणी (२८७०७).

**इटेकर गांवकरी – बाईसाहेब*** : इटे येथील पटांतील जारी इनाम जमिनीच्या तपशिलाबद्दल व जप्तीच्या अंमलाबद्दल झालेली विचारणा (२८७३१); कंपनी सरकारातून शिक्का मारून आलेला इटे येथील

**रुमाल क्र. ५५, पुडके क्र. १ चालू :**

**पत्रें चालू :**

१० सालचा हिशेब समजविण्याबद्दल गणेशपंत लिमये व अहिरराव यांनी केलेली विचारणा (२८७५०).

**कृष्णाजी बाबूराव भाटे – जगन्नाथपंत *** : मसाल्याचा ऐवज रवाना, शंकराजी बल्लाळ वगैरेंनी केलेल्या फिर्यादीबद्दल (२८७५८).

**केशव राम गाडगीळ – परशरामपंत *** : बापू यास दिलेल्या वस्त्रांच्या ऐवजाची मागणी (२८६६६).

**खंडोजी लाड – गणेशपंत *** : ककाणीकर व म्हसदीकर यांच्यातील शींवतंट्याबद्दल व मालाच्या तंट्याबद्दल विनंती (२८६८५).

**खरगसिंग हजारी – मोरो हरि** : गोपाळसिंग व बलराम यांच्या तंट्यासंबंधी (२८६९८).

**गणेश जिवाजी – गणोबानाना*** : मुदबखाकडील बंदोबस्ताबद्दल विनंती (२८६६२).

**गोविंद व्यंकटेश – बाईसाहेब** : मोर दीक्षित याजकडील कारकून जप्तीस आल्यासंबंधी व पेठ्याच्या चौकशीसंबंधी गणेशपंत लिमये यांनी केलेली चौकशी (२८७२९).

**चिंतो वामन देशमुख–नागोपंत देवधर** : गोरेगांवपैकी तर्फ रायगडाकडील नेमणुकेस असलेल्या गावांच्या कमाविशीवर आप्पाजी केशव याची नेमणूक (२८६६०); – **काशीपंत फडके** : भिकंभट साठे याच्या साखरवाडी येथील घराच्या बांधकामास बाळाजीपंत व राघोपंत साठे यांजकडून होणाऱ्या उपद्रवाची चौकशी करण्याचा आदेश (२८६९३); – **आण्णा देशमुख** : मुलीच्या लग्नासाठी आण्णा देशमुख यांच्या आसामीच्या वेतनापैकीच्या वरातेस परवानगी घेतल्याबद्दल (२८७३८).

**जावजी कोठवळे – आबासाहेब* व दादासाहेब*** : किन्हई येथील घरासंबंधी किन्हईकर यांजकडून होणाऱ्या उपद्रवाच्या बंदोबस्ताबद्दल (२८७१४).

**जिवाजी दिसळे – ताईसाहेब*** : सांगली येथील स्वतःची जागा व शेत दिसळे यास सुरळीतपणे देण्याबद्दल सांगलीकर गांवकऱ्यांस ताकीद करावी म्हणून (२८७५७).

**नारायणराव साबाजी – आनंदराव*** : वसूल बाकीच्या पत्रकाच्या मागणीबद्दल खुलासा (२८६५२); तगाईबाकीचा वसूल रवाना (२८६७३).

**नारो आप्पाजी – रामचंद्रपंत*** : रघुनाथराव यास कर्ममुक्त करण्याची विनंती (२८७२५).

**नारो शाम–मामा*** : कुणब्याचे बैल शेताच्या नांगरणीस आणल्याबद्दल (२८६९६).

**नीलकंठ दामोदर – जगन्नाथपंत गोखले** : हरल येथे झालेल्या रोख्यांना मनाचिठ्ठी पाठविण्याविषयी (२८७२८).

**बगाजी गोविंद – गोविंदपंत आपटे** : कल्याणराव कवडे याजकडून परगणे नलदुर्ग येथील रुजुवातीच्या व सरकारी बाबतीच्या ऐवजाचा करावयाचा फडशा व रुजुवातीस कारकून पाठविण्याबद्दल वंडगर यास करावयाची ताकीद (२८७४५).

**पत्रें चालू :**

**बाळाजी कृष्ण – श्री सरकार यवतेश्वर** : कर्जबाजारी झाल्याबद्दल व उदरनिर्वाहाची सोय नसल्याबद्दल निवेदन (२८६५८).

**बाळाजी गोपाळ आगाशे – आबाजीपंत*** : वेलापूरकर देशमुख याच्या हकाच्या वसुलीचा हिशेब रवाना (२८६७८).

**बाळाराम* – ताईसाहेब*** : रुपसिंग सवासिंग व बापू रजपूत यांनी लुटलेली मालमत्ता परत मिळण्याबद्दल विनंती (२८७०१).

**बेलसरकर मोकदम – सदाशिवपंत*** : करारप्रमाणे ऐवज घेऊन येत असल्याबद्दल सूचना (२८६९१).

**भुकणजी हरिपंत - विसाजीपंत*** : खंडेराव व धोंडोपंत यांना पत्रें रवाना, येईपर्यंत थांबण्याची विनंती (२८७४३).

**मतवालीबाई* – अंताजीपंत फडणीस** : राहिलेली पांघरुणे पाठविण्याची व रोजमुऱ्याची मुदत न वाढविण्याची विनंती (२८६८६).

**मुकुंद माधव – लिमाजीपंत*** : खर्चासाठी ऐवजाची मागणी (२८७१३).

**मोरो गणेश – विष्णुपंत*** : चिंतो गणेश भाटे यांनी दिलेला पेटा वाळवे येथील वसूल रवाना (२८७५३).

**मोरो नारायण – गणपतराव*** : बाभुळसर खुर्द या गांवावर केलेल्या रोख्यासंबंधी खुलासा (२८६९७).

**मोरो रामचंद्र – बाईसाहेब*** : गांवकऱ्यांस गृहस्थाकडून होणाऱ्या उपद्रवाबद्दल विनंती (२८७४९).

**रघुनाथराव चिमणाजी – त्रिंबकराव*** : रावजी देशमुख यांनी केलेल्या वरातेच्या ऐवजाची मागणी (२८७४६) (नक्कल).

**रघोजी महाडिक – जागूनाना*** : नेवरे येथील देशपांडेपणाच्या शेरीबद्दल घेतलेल्या ऐवजाची व धान्याची मागणी (२८७०२).

**राजेंद्रगिरी गोसावी – गोपाळराव*** : आनंदगिरी गोसावी व मणिराम भालदार याजकडून होणाऱ्या उपद्रवाबद्दल विनंती (२८६६५).

**लक्ष्मण मोरेश्वर – नारोपंत मजमदार** : भोपळ्यांची मागणी (२८६९५, २८७०८); –**बापूजीपंत*** : ऐवजाची व तांदळाची मागणी (२८७०६).

**लक्ष्मण विठ्ठल – राघोपंत *** : साहोत्र्याच्या पावत्यांच्या रवानगीबद्दल खुलासा व देशमुख याच्याकडील पावतीसंबंधी विचारणा (२८७२२).

**लिंबाजी सावंत – नानासाहेब*** : बाळाजी काटकर याजकडील धान्याच्या जप्तीबद्दल खुलासा (२८७०४).

**वासुदेव अनंत – श्रीशिखर येथील ब्राह्मण** : बडव्यांशी तंटा न करण्याबद्दल ताकीद (२८७३९) (नक्कल).

**विठ्ठलराव विश्वनाथ – गणेशपंत *** : माणको विनायक याजकडून आरळे येथील ज्योतिष कुलकर्णीचे काम घेण्याबद्दल आरळे येथील वाडीचा कमाविसदार महादजीपंत यास करावयाची ताकीद (२८७४४).

**वेजेगांवकर मोकदम – ताईसाहेब*** : खानापूर येथील स्वारीपासून वेजेगांवाचे रक्षण करण्याची विनंती (२८७०३).

रुमाल क्र. ५५, पुडके क्र. १ चालू :

पत्रें चालू :

**वेतगांवकर मोकदम – भवानजी पाटील :** विराप्पा उडचणे व द्वारकाई शिंपी यांचा देवघेवीचा तंटा निवारण्याबद्दल विनंती (२८६९२).

**शिवजी पाटील दुबे – रामाजीपंत* :** सदाशिवपंत याजकडील ऐवजाबद्दल विनंती (२८६८१).

**सखाराम बाबाजी – गणपतराव* :** श्रीक्षेत्र माहुली-संगम येथील ब्राह्मणांच्या नेमणुकांबद्दल विनंती व माडवे येथील देवस्थानच्या प्रतबंदीचे आवर्जे व श्रीकडील जारी इनाम जमिनीसंबंधीच्या कागदपत्रांची मागणी (२८७००).

**सदाशिव गोविंद – गणपतराव* :** शिलकेच्या व दसऱ्याच्या खर्चाच्या हिशेबाबद्दल खुलासा (२८६८८).

**सदाशिव वासुदेव फडके – गोपाळपंत माले :** आबाजी लक्ष्मण याच्याशी झालेल्या कर्जाच्या व्यवहारासंबंधी वासुदेव बल्लाळ भावे याची घोड्यासह मुक्तता करण्याची विनंती (२८६६३).

**सदाशिव हणमंतराव – पांडुरंगपंत दामले व गोविंदपंत* :** गांवच्या वसुलीबद्दल मनाईचिठ्ठी घेण्याची विनंती (२८६५६).

**सुभानराव नांदसेले – काबिरीकर मोकदम :** ओझर्डे येथील सोनार बहिणीकडे सणासाठी गेला असतां त्यास दुसऱ्या सोनाराकडून झालेल्या उपद्रवाबद्दल ताकीद (२८७०५).

**हरि महादेव – रामचंद्रभट वलणकर :** चिमणाजीपंत याजकडून ऐवज घेण्याची सुचना (२८६६९).

**हाजी हमीद – शास्त्रीबावा* :** शहा जानुलासाहेब पीर याच्या देनसीन येथील दर्ग्याच्या बंदोबस्ताबद्दल विनंती (२८६४८).

**हैबतराव भवानीशंकर – सखारामपंत* :** कादरखान कोतवाल याच्या कसबे वाई येथील वेतनाऐवजी असलेल्या जमिनीस जिल्ह्याच्या कमाविसदाराकडून होणाऱ्या उपद्रवाचा बंदोबस्त करण्याविषयी (२८६७४).

**[फक्त प्रेषकांचा नामोल्लेख असलेलीं]**

**आबाजी राम गोडबोले – (—) :** पत्रांच्या रवानगीबद्दल व तोफा हुबळीहून पाच्छापूर येथे पोहोचविण्याबद्दल (२८६५१).

**ओझर्डेकर मोकदम – (—) :** ओझर्डेकर पाटील कुळकर्णी यांच्या उडतरे येथील रवानगीबद्दल खुलासा (२८७१७).

**चिमणाप्पा * – (—) :** गणेशपंत लिमये यांनी सातारा येथे रघाप्पा, बयाबाई वगैरेंची मोर दीक्षित याजकडून झालेल्या इटे येथील जप्तीबद्दल केलेली चौकशी (२८७३२, २८७४७, २८७४८); इटे येथील जप्तीच्या कागदपत्रांसंबंधी व सिवनेकर माने यांच्या वतनासंबंधी विष्णुपंत बापट व अहिरराव यांनी वेगवेगळ्या लोकांकडे केलेल्या चौकशीचा तपशील (२८७३४–२८७३७).

**निंबाजी माने पाटील व राघो गोविंद कुळकर्णी – (—) :** गृहस्थाच्या रवानगीबद्दल (२८७३३).

**बळवंतराव काशी – (—) :** मोरोबादादा याच्या वाड्यांतील व शेणवी गोवेकर याजकडील लोकांची मागणी (२८६७७).

वाय-३५२—१५

पत्रें चालू :

**बापूजी मोरेश्वर कुळकर्णी – (—) :** पाटलोजी महाडिक याजकडील वसुलीबद्दल राणोजी महाडिक याने नेवरेकर गांवकऱ्यास केलेल्या ताकिदीबद्दल विनंती (२८६८९).

**बाबूराव मंगेश – (—) :** उडतरे येथील वसुलीबद्दल गांवकऱ्यांचा करावयाचा बंदोबस्त (२८७१८).

**बाळाजी राव रानडे – (—) :** सिलिब येथील वसुलीच्या हिशेब तपासणीबद्दल विचारणा (२८६६७).

**रामचंद्र चिमणाजी – (—) :** मोर दीक्षित याजकडील कारकून जप्तीस आल्यासंबंधी, पेस्त्यांच्या चौकशीसंबंधी वगैरेबद्दल गणेशपंत लिमये यांनी केलेली चौकशी (२८७५१–२८७५२).

**रामचंद्र पांडुरंग शेवडे – (—) :** रकमेची रवानगी (२८६७६).

**हरि गोपाळ केतकर – (—) :** दीक्षीत याच्या आखाच्या यादीवर देशमुख याजकडून मखलाशी करून घेण्याची विनंती (२८६७०).

**[फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेलीं]**

(—) – **कृष्णरावजी* :** कोंकणांत गेलेल्या आप्पाजी प्यायाविरुद्ध सुभेदार व रामचंद्रपंत यांनी शास्त्री यांना लिहिलेला मजकूर खोटा असल्याबद्दल निवेदन (२८७१५).

(—) – **परशरामपंत* :** पागेच्या हिशेबाची मागणी (२८६६४).

(—) – **रामचंद्रपंत* :** जांभरूण, वरवल, कोडिये व फुणगुस येथील वसुलीसंबंधी व आसामींच्या नेमणुकींबद्दल रत्नागिरीहून आलेल्या सुभेदारास करावयाची विनंती (२८७२१).

**[प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख नसलेलीं]**

भिवंडीकर इनामदार वैजनाथ सूळ याजकडून होत असलेल्या उपद्रवाबद्दल व त्याने केलेल्या बहिरजी विधाते व पुत्र यांच्या मुक्ततेबद्दल (२८६४९); घरी राहिलेल्या पत्रांची मागणी (२८६५०); सरकार शिबंदीपैकी हुजूर रवाना केलेल्या शिपायांच्याबदली दुसरे शिपाई रवाना केल्याबद्दल कृष्णाजी नारायण यास पाठविलेले पत्र (२८६५३) (नक्कल); सरकारी कहीबरोबर कही नेण्याबद्दल गोटांत ताकीद (२८६५४); भवानराव शामराव याचो करारयादी रवाना (२८६५५); सरकारांतून नेमणूक झालेल्या कारकुनाच्या वेतनाबद्दल विनंती (२८६५७); जामदारखान्याकडे गंगाधरपंत याजकडील आसामी करार करून घेण्याची विनंती (२८६५९); हिंम्मतबहाद्दर याच्या पागेने पाडळी व वडगांवपैकी नेलेल्या ऐवजाबद्दल (२८६६१); रामकृष्ण धर्माधिकारी कसबे एरंडोल व चुडामण याज्ञिक कसबे चोपडे यांच्या ब्राह्मण्याचा तंटा मिटल्याबद्दल ब्राह्मणांकडून वसूल करावयाच्या हरकीच्या ऐवजासंबंधी (२८६६८); सरोदे यांच्यासंबंधीचे नातेवाईकाचे सरकारांत घेतलेले कागदपत्र परत देण्याबद्दलचा खुलासा (२८६७१); खंडेराव दरेकर याजकडील कामासंबंधी विनंती (२८६७२); बाबा मुळे यांजकडील जखमी लोकांसाठी बिगारी लोक किल्यावर पाठविण्यासंबंधी खुलासा (२८६७५); गोकाक येथील देहझाडा, सरंजाम वगैरे कागदपत्रासंबंधी इंग्रज अधिकाऱ्याचे गोकाककर मामलेदारास आलेलें पत्र (२८६७९); जाखजे या हुजूर खाजगीकडील गांवाच्या वसुलीस वडजोजी काकडे यास उपद्रव न देण्याबद्दल मामलेदारास ताकीद करण्याबद्दल जानोजीराव

रुमाल क्र. ५५, पुडके क्र. १ चालू :

पत्रें चालू :

निंबाळकर यास पत्र (२८६८२); प्रांत कल्याण व भिवंडी येथील जकातीच्या हिशेबाच्या चौकशीस कारकून पाठविण्याची ताकीद (२८६८३); किल्यावरील चौकीपहारा वगैरे बंदोबस्ताबद्दल विनंती (२८६८७); किसनपूरकर पाटील याच्या गांवास बिगारी यांच्या-संबंधी उपद्रव न देण्याबद्दल करावयाच्या ताकिदीबद्दल (२८६९०); गांवांना करावयाची ताकीद व देवस्थानचा करावयाचा खर्च याबाबत खुलासा (२८६९४); कोटाच्या जागेची पाहणी करावयाची असल्यामुळे माहितगार मनुष्य पाठविण्याची विनंती (२८६९९); खंडू ढमाले याच्या तंट्याचे काम राघोपंत कर्वे वगैरेकडे सोपविल्या-बद्दल व मालजी याच्या कामाबद्दल खुलासा (२८७०९); मोरो हरि याजकडून दप्तर आल्यापासून मनसव्यासंबंधी सरकारांत जमा झालेल्या हरकी, गुन्हेगारी, मसाला वगैरे ऐवजाच्या हिशेबाची मागणी (२८७१०); हरि अनंत याच्या सरकारांतील फिर्यादीमुळे अंताजीपंत यास जाबसालास आणण्याबद्दल (२८७११); व्यंकोजी जयराम याच्या नेमणुकेबद्दल निवेदन (२८७१२); फौजेच्या खर्चा-साठी ऐवजाची मागणी (२८७१६); शिरवळ येथील शेरीबद्दल खतावणीस जमा असलेल्या वसुलाची यादी शिरवळकर कारकुनास पाठविण्याची विनंती (२८७१९); तालुक्यांतील धान्याच्या नेमणूके-बद्दल (२८७२०); देवस्थानचा खर्च प्रापकाच्यातर्फे करण्यासंबंधीचा खुलासा (२८७२४); जामदारखान्यापैकी खाशाकडे वगैरे दिलेल्या वस्त्रांचा तपशील (२८७२७); खातगुण येथील चौकशीचे कऱ्हाड पेठ्याच्या खतावणीचे व औंध येथील श्रीयमाई देवस्थानच्या चौकशीचे कागदपत्र सरकार स्वारींत नानासाहेब यांजकडे पाठविण्याबद्दल विनंती (२८७३०); गांवांची व वरातांची कामे आटपण्याची विनंती (२८७४१); लष्कराचे देशाकडे कूच (२८७४२); पेठ्यांतील कार-कुनांचे नांवे पाठविलेल्या लखोट्यासंबंधी विनंती (२८७५४); नरसीपूर येथील चौकशीच्या पुडक्यांतील पंडितराव यांनी केलेल्या जाबत्याच्या नकलेची मागणी, पेटा विज्यापुराहून आलेला ऐवज, श्रीज्योतिर्लिंग याजकडील नेमणुकी वगैरेसंबंधी विनंती (२८७५५); खानापूर पेठ्याच्या खतावणीची पुडकी रवाना व ऐवजाची पोंच देण्याची विनंती (२८७५६).

रसानगी याद्या :

निजामअलीखान याजकडे बातमीस गेलेल्या भिकाजी नाईक याजकडील जासुदांस द्यावयाच्या रोजमुऱ्याची (२८७२३); औरंगा-बाद येथें बातमीस असलेल्या जासूदजथ्यांना द्यावयाच्या रोजमुऱ्याची (२८७२६).

* संपूर्ण नांवाचा उल्लेख नाही.

---

| | |
|---|---|
| रुमाल क्र. ५५, पुडके क्र. २ | सु. स. ११९५–१२२४ |
| का. सं. १२६ (२८७५९–२८८८४) | इ. स. १७९५–१८२४ |

पत्रें :

**अंताजी महादेव महाजनी – सदाशिवपंत*** : बाबाजी सोळसकर याच्या हवाल्याच्या ऐवजाबाबत खुलासा (२८८३५).

पत्रें चालू :

**अंताजी सदाशिव भिडे – विनायकराव देशमुख** : बागलाण प्रांतातील जैतापूर वगैरे महालांतील करावयाच्या बंडाच्या बंदोबस्ता-बद्दल विनंती (२८७८३).

**आप सावंत भोसले – गणोजी परब** : सुभेदारांनी नाना याजवर केलेल्या वरातेच्या ऐवजाची मागणी (२८७७१).

**आनंदराव विमल-नारायणराव सुभेदार** : गांवांच्या व सुभ्याच्या वसुलाची मागणी (२८८११) (नक्कल); देगांवकर कुळकर्णी याच्या रवानगीबद्दल खुलासा (२८८१२).

**आप्पाजी पाटील बर्गे – पांडुरंगपंत सुभेदार** : हुजूर मामलयाकडे द्यावयाच्या कोरेगांव येथील पट्टीवसुलीच्या व घेतलेल्या कर्जाच्या फडशाबद्दल विनंती (२८८६८).

**आप्पाजी मल्हार – बाजीपंत*** : शंकरराव देशमुख यास किल्या-वरून खाली आणल्याबद्दल व त्याचे येजितपत्र झाले असल्याबद्दल, जप्तीसंबंधीच्या बंदोबस्ताबद्दल (२८८०६).

**आप्पाजी मोरेश्वर जोशी – विनायकराव देशमुख** : पुणे येथील लकडखान्याच्या बावराच्या वहिवाटीबद्दल रामचंद्रपंत यास पत्र पाठविण्याची विनंती (२८७९९).

**कनवडे येथील मोकदम – बाबासाहेब सुभेदार** : कनवडे येथील देशमुखाच्या कमताव्याच्या जमिनीजवळील कडबा रचावयाची जागा त्या जागेच्या मालकाच्या स्वाधीन केल्याबद्दल खुलासा, १५ ज. खर, सु. १२२४/१६ फेब्रुवारी १८२४ (२८७८१).

**काशी शिवराम व गोपाळ खंडेराव – सदाशिवपंत* व हरिपंत*** : किल्ले सातारा येथील वर्दीचा लखोटा रवाना (२८८४०).

**केशव राम गाडगीळ – परशरामपंत*** : बापू यास दिलेल्या वस्त्रांचा येणे असलेला ऐवज नाईकजी वाघ यास देण्याची विनंती (२८७९१).

**खंडबा शिंदे व पाटलोजी गोडसे – तात्यासाहेब*** : बदली कर-ण्याची विनंती (२८७८६).

**गोपाळ नारायण फणसळकर व दिनकर बच्याजी आगाशे – आबाजीपंत*** : रामचंद्रपंत याच्या पत्रांत सर्व मजकूर लिहिला असल्याबद्दल (२८८१८).

**गोपाळजी गाडेकर – गणोजी गाडेकर** : पागोट्याची मागणी (२८८५६).

**गोपाळभट गोखले – राघोपंत गोडबोले** : दौलताबादी कागदांची मागणी (२८८२९).

**गोविंद खाडके – मानाप्पा गाडेकर** : चांगल्या मोत्याची नथ करून देण्याची विनंती (२८८६०);-**गोपाळशेट गाडेकर** : कऱ्हाड व रत्नागिरी येथे जाणार असल्याबद्दल निवेदन (२८८६१); –**भागवतशेट गाडेकर** : मानाजी मांढरे याजबरोबर पाठविलेल्या कापडाबद्दल व रत्नागिरी येथें जात असल्याबद्दल (२८८६२).

**गोविंद नारायण – दाजीपंत*** : हिशेबाची आकारणी करून दप्तरदारांचे कऱ्हाड येथे गमन, जकाते याच्या प्रापकाकडील वराते-बद्दल खुलासा (२८८७७).

रुमाल क्र. ५५, पुडके क्र. २ चालू :

पत्रें चालू :

**जनार्दन नारायण ओक – बाळाजीबाबा*** : आसामीच्या वेतनाबद्दल खुलासा (२८८४४).

**जिवाजी रुद्र पिंपुटकर – मोरोपंत*** : मनसब्याचा फडशा करण्यासाठीं दुसरी सनद देण्याची विनंती (२८८२८).

**त्रिंबक आप्पाजी – मोरोपंत*** : चिंचोडीकर शिवाजीपंत कुळकर्णी याजकडील जमीच्या मोकळीकेबद्दल विनंती (२८८०५).

**त्रिंबक बल्लाळ सहस्त्रबुद्धे – सदाशिवपंत*** : बाळाजीपंत भोकरकर याजकडील परगणे काटी व मार्डी येथील बाबती व सरदेशमुखीच्या मक्त्याच्या सनदा प्रेषकाच्या नांवे करून देण्याबद्दल (२८८३७).

**त्रिंबकजी पाटील डेंगळे – सदाशिवपंत व हरि भगवंत** : जरुरी असलेल्या ऐवजाच्या व बाळ पाटील याच्या चौकीपहाऱ्यांच्या बंदोबस्ताबद्दल सूचना (२८८४९).

**दामोदर सदाशिव – विष्णुपंत देवधर** : भावाची कोर्टातील कामे निघाल्यामुळे येण्यास विलंब, अक्कलकोट तालुक्यातील बंड उद्भवल्यामुळे यजमान स्वामीस हुजूर चरणाजवळ आणवावे किंवा ठाण्यांत ठेवावे याबद्दल विचारणा (२८७७८).

**धाक शेट – बाळोबा देवरुखकर** : विनायकभट काशीकर याच्या देणे असलेल्या ऐवजाबद्दल (२८७६८).

**नायाजी कदम – रामरावजी दिवाण** : डाकेच्या बंदोबस्ताबद्दल विनंती (२८८८१).

**नाना* – आप्पा*** : कऱ्हाड येथे मानप्पा याच्या फौजेचा उपद्रव होत असल्याबद्दल, दिवसी येथें तळ दिल्यामुळे घरीं खर्चाची ओढाताण असल्याबद्दल निवेदन, खर्चाची व कपड्यांची सोय करण्याची विनंती (२८८७९).

**नारायणराव साबाजी – आनंदराव*** : नीळकंठराव बाबर याच्या देगांव येथील इनामाच्या रुजुवातीसाठी देगांवकर पाटील, कुलकर्णी पाठविण्यासंबंधी खुलासा (२८८१३); **– तात्यासाहेब*** : बेंदरी येथील अंमलाच्या वसुलीस चिंतामणराव पटवर्धन याजकडून होणाऱ्या उपद्रवाबद्दल निवेदन (२८८४८).

**नारो अच्युत – अंताजीपंत*** : किरकोळ घरगुती मजकूर (२८८४३).

**नारो गंगाधर रानडे – आनंदराव*** : सरकारांत डाकेवर रवाना करावयाच्या लखोट्यासंबंधी (२८८१४).

**निंबाजी विंचु – गोपाळकृष्ण** : हुंडीच्या ऐवजाबद्दल (२८८५७).

**गोपाळशेट गाडेकर** : दीक्षित याजकडील ऐवज मागून घेण्याबद्दल विनंती (२८८५८); करगोट्याचे घुंगरू व बर्फी रवाना, मैनाबाई गाडेकरनी घेऊन ठेवलेला मध पाठविण्याची विनंती (२८८६३).

**नीळकंठसिंग व लछीराम – त्रिंबकराव*** : आबाजी चिंतामण व शिवाजी रामचंद्र याजकडून गावांच्या लावणीच्या करावयाच्या बंदोबस्ताबद्दल खुलासा व रोजमुऱ्याबद्दल विनंती (२८८४२).

**परशराम खंडेराव – रामाजीपंत*** : जनार्दन नारायण गोगटे याच्या तैनातजाबत्याबद्दल व राघोपंत याजकडील कामकाजाच्या बंदोबस्ताबद्दल विनंती (२८८३६).

पत्रें चालू :

**बच्याजी हरि चिपळूणकर – आबा व दादा दामले** : शिरस्त्याप्रमाणे तीन सनदा व चौथी खुणेची सनद व शिबंदीबाकीची सावकारी निशा दिल्याशिवाय शिवरामपंत वैराटगड किल्याचा अंमल देत नसल्याबद्दल निवेदन व त्याबद्दलच्या बंदोबस्ताबद्दल (२८७६४).

**बहिरो कृष्ण गोरे – जगन्नाथपंत*** : गांवखेडी येथे चौकीस असलेल्या सुभ्याकडील शिपायांच्या खर्चाबद्दल विनंती, दारुगोळ्याची मागणी (२८७६१).

**बापूजी सखाराम गोडबोले - सखोपंत करंदीकर** : असीउंबरी येथील वसूलबाकीच्या रुजुवातीस चिमणाजीपंतआप्पा याजकडील कारकून रवाना (२८८३०) (नक्कल).

**बाबूराव महादेव चिपळूणकर – कृष्णाजीपंत पेंडसे** : किरकोळ घरगुती वस्तू वगैरे पाठविण्यासंबंधीचा मजकूर (२८८२४).

**बाळाजी नागेश – कुशाबा चोळकर** : यादीप्रमाणे अंबडापूर येथील रोजमुऱ्याचा हिशेब पुरा करण्याबद्दल विनंती (२८८२७).

**भिकाजी केशव – कृष्णाजीपंत*** : नरहर व पुरुषोत्तम नाईक यांच्या रवानगीबद्दल खुलासा (२८७९४).

**महंमद पायेदाखान – नरसिंगराव*** : महालांतील देशपांडेपणाच्या चौथ्या हिश्याच्या जप्तीबद्दल सरकारांतून परवानगी आल्यामुळे तेथील रुसुमाच्या वसुलीची परवानगी पाठविण्याबद्दल विनंती (२८८२६).

**महादजी अनंत – बाईसाहेब*** : परगणे सोनपेठ येथील रसद भरण्याबद्दल खुलासा (२८७९५).

**महादजी धोंडदेव दांडेकर – दिनकरपंत*** : राघोजी हवालदार याची किल्यावरील माणसे गांवी पोहोचविली तेथे बिऱ्हाडाच्या कामास आलेल्या शिपायाची नेमणूक करण्याची विनंती (२८८६४).

**मल्हार कृष्ण देशपांडे – विसाजीपंत सुभेदार** : कोले व तिपेहळी येथील खर्चपट्टीचा ऐवज मलकापूर येथे रवाना, मजमदार याच्या वरातेचा ऐवज दिल्याबद्दल (२८७९३).

**मोरो गोविंद – आबा*** : गुलाम मोहिद्दीनखान याजकडील भाजनल व जवळखे या गावांच्या जप्तीसंबंधी खुलासा (२८८२५).

**राघोजी नाईक – भैराळ नाईक** : प्रापकाकडे आंब्यांची रवानगी (२८७७२).

**रामचंद्र भास्कर आठवले – कृष्णाजीपंत*** : हुजूर पेश्व्याच्या चौकशीचे काम आटपून कागदपत्र सत्वर आणण्याबद्दल (२८८१९) (नक्कल); गंगाधर जगजीवन यांचा इंदवली व खरसी येथील बट्ट्याचा ऐवज, शिबंदीच्या शिपायांची सरकारात मागणी (२८८२०) (नक्कल); **– शेषगीर सुभेदार** : रामचंद्र सदाशिव भागवत यास परगणे शिरवळ येथील चौकशीसाठी जरूर ते कागदपत्र देण्याबद्दल विनंती (२८८३९) (नक्कल).

**रामचंद्र व्यंकटेश – जीवनराव*** : सरकारांतून बोलावण्यास आलेल्या स्वारांच्या ऐवजाची बागेवाडी वगैरेंच्या रसदेवर वरात (२८८२२).

**लक्ष्मण नारायण देसाई – जगन्नाथपंत*** : जगन्नाथपंत यांनी योजिलेल्या कामास लक्ष्मण देसाई याजमुळे झालेला विलंब (२८७५९).

रुमाल क्र. ५५, पुडके क्र. २ चालू :

पत्रें चालू :

**लक्ष्मण मोरेश्वर – बापूजीपंत*** : कबूल केलेल्या ऐवजाची मागणी (२८७६१).

**लक्ष्मणभट भावे – बाळाजी हरि भावे** : वाडे येथील खोलीबद्दल व इनामतीच्या ऐवजाचा फडशा करण्याची सूचना (२८८३१).

**व्यंकटराव शिवाजी – रामचंद्रपंत पटवर्धन** : आबाजी गोपाळ याची मुलगी भागिरथीबाई हिच्या दाजी विश्वनाथ नेवासकर याजकडे असलेल्या ऐवजाबद्दल विनंती (२८८२३) (नक्कल).

**वासुदेव* – आबाजीपंत पोंक्षे** : पाठविलेल्या ऐवजांतून जिनसांची रवानगी (२८८४५).

**विष्णु आबाजी देवधर – जगन्नाथपंत गोखले** : दरबारखर्चाच्या हिशेबाबद्दल खुलासा (२८७६२–२८७६३).

**विष्णु महादेव महाजनी – जयराम नाईक** : कऱ्हाड येथील देवस्थानसंबंधीचे कागदपत्र स्वारीत दाखविण्यासाठी रवाना व कागदपत्रांची घ्यावयाची खबरदारी (२८७६७).

**शिवरामभट* – राघोपंत*** : रामभट याच्या लग्नाच्या व्यवस्थेबद्दल (२८८३३).

**शेख अमीन शिपाई-बापूसाहेब*** : नुने व पाल येथील वसुलीसंबंधी खुलासा (२८८८४).

**श्री. मोरया** (गोसावी) – **बाबा*** : तीस बैलांचे जकातीचे दस्तक श्रीमंतांकडील असतांना बोरघाटकर जकातदारांनी तीस बैलांपेक्षा जास्त बैल असल्यास त्यावर जकात न मागण्याबद्दल त्यास ताकीद करण्याची आज्ञा (२८७९८).

**सखो केशव गोडबोले – दिनकरपंत गोडबोले** : सरकारी व खाजगी लिखाणासाठी वाई येथे पाठवावयाचा कारकून व दरकदार, सुभ्यांकडील गांवांच्या वसुलाबद्दल पांडुरंगपंत यास लिहावयाचे पत्र, ३० रमजान सु. १२१८/१४ ऑगस्ट १८१७ (२८८३२).

**साजूरकर मोकदम – आप्पाजीपंत बहुलेकर** : कर्जाबद्दल रोखा करून नेलेल्या ज्योती सुतारास यमुनाबाईकडील लाकडाचे गाडे पुसेसावळी येथे नेण्यासाठी पाठवून देण्याची विनंती (२८८७८).

**शिवणीकर मोकदम – वसीकर मोकदम** : संभू आया जंगम याचे इनामाचे शेत व इतर मालमत्ता त्याच्या स्वाधीन केल्याबद्दल खुलासा व त्याच्या देण्याघेण्याच्या व्यवहाराबद्दल विचारणा (२८८८०) (नक्कल).

**[फक्त प्रेषकांचा नामोल्लेख असलेलीं]**

**आनंदराव त्रिमल – (—)** : भुईंज व ओझर्डे येथील हिशेबाबद्दल खुलासा व रोजमुऱ्याचा व पगाराचा ऐवज पाठविण्याची विनंती (२८८०७); पगाराचा हिशेब रवाना व ऐवज पाठविण्याची विनंती (२८८०८); कवठे व वेळे येथील हिशेबाच्या चौकशीसंबंधी खुलासा (२८८०९–२८८१०); पांचवड, भुईंज व उडतरे गावांच्या वसुलीच्या चौकशीबद्दल खुलासा, कुडाळच्या रुजुवातीस कृष्णाजी नारायण याची कारकुनासह रवानगी (२८८२१).

पत्रें चालू :

**आप्पाजी मोरेश्वर जोशी – (—)** : पुणे येथील लकडखान्याच्या वावराच्या वहिवाटीबद्दल रामचंद्रपंत यास पत्र पाठविण्याची विनंती (२८८००).

**आबाजी राम गोडबोले – (—)** : किल्ले वासोटा येथे दुसऱ्या कारकुनाची नेमणूक करण्याचा विचार, बाबा यांनी पाठविलेल्या हुंड्यांची पोंच (२८७७४); मेण्याची करावयाची रवानगी, किल्ले वासोटा येथे रवाना करावयाचा ऐवज, कर्नाटकांतून झालेल्या हुंड्यांची पोंच (२८७७५-२८७७६); हुबळीहून रवाना करावयाच्या तोफा, पार्वतीबाई हिची करावयाची रवानगी (२८७७७); हुबळीहून पाच्छापूर येथे पाठवावयाच्या तोफांची व्यवस्था व जिनसांची रवानगी (२८७९७).

**कृष्णाजी नारायण कुलकर्णी – (—)** : थकलेल्या बाकीच्या पत्रकांत 'दार' या सदरात विठु गोडे याजकडून वाघू सापडे याचा ऐवज जमा केल्याबद्दल हुजूर चाकरीबद्दल खुलासा (२८८८३).

**कृष्णाजी बल्लाळ देसाई – (—)** : बंदरांतील पावगीच्या वसुलीबद्दल विनंती (२८७७९).

**खेरडेकर मोकदम – (—)** : मुकुंदजी रगते पाटील याजकडील मळ्यांतील पडजमिनीबद्दल यावयाच्या ऐवजाबद्दल विनंती (२८८४६).

**गोविंद नीळकंठ – (—)** : ढवळेश्वर व कानरवाडी येथील वसुलीबद्दल मामलेदाराकडून होणाऱ्या तगाद्याबद्दल निवेदन (२८७८४); खानापूर येथील वसुलीबद्दल हुकूम, धानवड येथील कात्रे याने जिवंत रेडा कापून कातडे ढोरे यास विकल्याबद्दलची चौकशी (२८७८५).

**जनार्दन नारायण गोगटे – (—)** : कुलुपांची मागणी, १९ र. वल, सु. १२००/१७ ऑगस्ट १७९९ (२८८४१).

**ज्योती त्रिंबक फौजदार – (—)** : जत व करंजगी येथील कलालीच्या मक्त्याच्या ठरावाबद्दल विनंती (२८८४७).

**त्रिंबक बच्याजी – (—)** : कर्नल पालमर याजकडील दिनचर्या (२८८५५).

**दाजी काळे – (—)** : कडब्याच्या बंदोबस्ताबद्दल विनंती, १५ ज. खर, सु. १२२४/१६ फेब्रुवारी १८२४ (२८८८२).

**दिनकर बच्याजी आगाशे – (—)** : साताऱ्याहून आणावयाच्या मुकस्याबद्दल विनंती (२८८३८).

**नारो यशवंत आगटे – (—)** : मसूर येथील हिशेबाच्या चौकशीसाठी गणेश दाजी कुळकर्णी यास मसूर येथे ठेऊन घेतल्याबद्दल विनंती (२८८१७).

**बाबूराव कृष्ण – (—)** : शिवनेर तालुक्यातील दरखदाराकडील कामकाज, पूर्वीच्या मामलेदाराकडून शिवनेर येथील मामलतीचे काम घेण्याबद्दल, शिवनेर किल्यावरील नेमणुका व बंदोबस्त यासंबंधी (२८७८०).

**बाबूराव महादेव भिडे – (—)** : तांदळाच्या बेगमीबद्दल विनंती (२८७६५).

**बाळाजी राम – ( )** : दाभाडे याजकडील कारकुनाकडील कर्जपट्टीवर शहा मीरखान रोहिले याच्या ऐवजाची केलेली वरात, सावकाराची बाकी, पाटील, कुलकर्णी, जमींदार याजकडील ऐवज वगैरेसंबंधी खुलासा (२८८१५).

रुमाल क्र. ५५, पुडके क्र. २ चालू :

पत्रें चालू :

**बाळाजी राम गोवंडे – (—) :** ठाणे इंगळी-सप्तसागर येथील यादीप्रमाणे दाजीबा बिवलकर यास पावता करावयाचा ऐवज, श्रीपतराव भगवंत याजकडील वसुली, पेंढाऱ्यांचा कोंकणांत उपद्रव (२८८५०); नगरहून आलेल्या हुंड्या, मामलेदारास ऐवजाचा तगादा, वासोटा येथील ऐवजाची आगाशे याजकडील वरात (२८८५४).

**भुईंजकर मोकदम – (—) :** बया मुसलमानीण हिच्याकडे दंड-वसुलीस आलेल्या शिपायांकडून सायगांव येथें झालेल्या उपद्रवाबद्दल विनंती (२८८६९).

**रामचंद्र केशव भिडे – (—) :** कऱ्हाड येथील रसदभरण्याबद्दल, मसालेचिठ्यांसंबंधी व हुजूर मामल्यासंबंधी खुलासा (२८८०१ – २८८०४).

**विष्णु अनंत – (—) :** मनसब्यासंबंधी जामीन कतबे, तकरिरा वगैरे दिल्या असतांना रवलोजी कदम याजमुळे विलंब लागतो म्हणून त्यास ताकीद करण्याची विनंती (२८७८९).

**विसाजी राम कारुलकर – (—) :** दुमाही रोजमुरा वांटणीपट रवाना, मीर दिलावरअली व मीर मनवर अली शिलेदारांची नेमणूक याबद्दल (२८८३४).

**सखाराम धोंडदेव करंदीकर – (—) :** दोंडी, सोनगांव, धानोरे येथील वसुली, अन्नछत्रासाठीं जिन्नसखरेदी, असी येथील वाड्याच्या रखवालीस असलेल्या सरकारी लोकांचा रोजमुरा, शेडगांव व बागेवाडी येथील लावणी वगैरेसंबंधी (२८८५१ – २८८५३).

[फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेलीं]

(—) – **चिंतो भिकाजी :** विठ्ठ वारसकर याने केलेल्या जकातीच्या मक्तयाबद्दलच्या तंट्यासंबंधीचा तपशील (२८८७५).

(—) – **तात्या* :** गलावसुलीबद्दल व महालच्या ऐवजझाड्याच्या रवानगीबद्दल खुलासा (२८७६०).

(—) – **बाळू तांबोळी :** बहिरजी मुळे याच्या पागेकडे विड्याची पाने देण्याबद्दल, १ सवाल, सु. ११९५/२१ एप्रिल १७९५ (२८७७०).

(—) – **रामाजीपंत मुनीम :** सुभ्याच्या सुडबंदाची मागणी (२८८१६).

[प्रेषक अथवा प्रापकांचा नामोल्लेख नसलेलीं]

विष्णुपंत खरसी व बारामुन्हे येथे गेले असल्यामुळें जावळी पेट्यास पत्रें पाठविण्याबद्दल विनंती, स्वतः वाईहून शिरवळ येथे जाणार असल्याबद्दल खुलासा (२८७६६); कसबे वाई येथील बाजाराच्या जकातीच्या मक्तयासंबंधी कृष्णाजी नाईक गोडसे याची निशा, कर्जाऊ ऐवजाची करावयाची रवानगी (२८७७३); ठाण्यांत अरब रेहात नसल्यामुळें येण्यास झालेला विलंब व जमा झालेल्या वसुलीबद्दल खुलासा (२८७८२); रेणावी येथील वसूल परत करण्याबद्दल झालेला हुकूम, रेणावी येथील श्री रेवणसिद्ध याच्या उत्सवात करावयाच्या देखरेखीस पाठवावयाचा कारकून, ललगुण येथील श्रीगंगाधर देवाच्या उत्सवास हुजूर खजिन्यांतून असलेली नेमणूक (२८७८७); दादा मिया खतीब याच्या भावाच्या लग्नांतील खर्चाच्या हिशोबासंबंधी खुलासा,

पत्रें चालू :

सर्व पेट्यांतील देवस्थानच्या अनुष्ठानाच्या कामासाठीं जास्त शिबंदीची जरुरी (२८७८८); रवाना केलेल्या लोकांच्या रोजमुऱ्याबद्दल व शिध्या-बद्दल विनंती (२८७९०); चौकी पहाऱ्याच्या बंदोबस्ताबद्दल खुलासा, (२८७९२); गांवोगांवच्या बिगाऱ्यांच्या भरतीबद्दल निवेदन (२८८५९); लोकांचा रोजमुऱ्याबद्दल व वाण्यांसाठीं तयार केलेला मंडप याबद्दल निवेदन (२८८६५); सोलापूर येथील किल्ला सरकारांत घेऊन त्यावर वामनराव आपटे यांची नेमणूक, स्वारीचे सोलापूरहून पंढरपूरमार्गे वरकुटे येथे आगमन (२८८६६); निंब येथील कुळांकडील पाठविलेल्या वसुलाच्या पावत्यांची मागणी (२८८६७); गोपाळ शिंपी याच्या सुभाना कर्णे याजकडील ऐवजाच्या चौकशीस गोपाळ शिंपी यास पाठविण्याची विनंती (२८८७०); कसबे निंब येथील पाटलाकडून करावयाच्या पट्टीवसुलीबद्दल खुलासा (२८८७१); बर्गे मंडळींस शेरीचा वसूल देण्याबद्दल शिपायांना ताकीद करण्याबद्दल सखोपंत अभ्यंकर यास पत्र पाठविण्याची विनंती (२८८७२); पाटलाच्या मुक्ततेबद्दल (२८८७३); टोळकर याच्या जमिनीचा ऐवज रवाना व सोनाराकडील हवाल्याचा ऐवज नंतर पाठविणार असल्याचा खुलासा (२८८७४); पुसेगांव येथें येण्याबद्दलचा खुलासा (२८८७६).

**रसानगी यादी :**

बुरुड लोकांना द्यावयाच्या अडसरीची (२८७९६).

---

*संपूर्ण नांवाचा उल्लेख नाही.

---

| | |
|---|---|
| रुमाल क्र. ५५, पुडके क्र. ३ | सु. स. ११५९–१२१७ |
| का. सं. १५० (२८८८५–२९०३४) | इ. स. १७५८–१८१६ |

**अर्जदास्त :**

**मोकदम केंजल – सुभेदार प्रांत वाई :** साळी याजवर केलेल्या रोख्याचा फडशा त्याचे हातून लवकर झाला नाही परंतु त्यात साळी याजकडे काहीहि दोष नसल्याने त्यास मसाल्याची माफी व्हावी म्हणून विनंती (२८९१०).

**मोकदम, पाडळी – दादासाहेब* :** कहीच्या लोकांनी पाडळी येथे केलेल्या लूटमारीचा तपशील (२८९०८).

**मोकदम वेळेगांव – पांडुरंगपंतदादा* व गोविंदपंत* :** देशमुख याजकडील वरात त्यांचा शिपाई घेऊन आल्यासंबंधी, गांवातील लावणीबाबत खुलासा (२८९०२).

**शेरीकर मोकदम व समस्त गांवकरी, वडगांव – आबासाहेब* व दादासाहेब* :** शिंद्यांकडील स्वार गांवांत येऊन वैरण, कडबा व सरम (बाजरी किंवा सजगुऱ्याची धाटे) मागतात तेव्हां त्यांचा बंदोबस्त करण्याविषयी (२८९११).

**सय्यद अब्दुल रहिमान – रामप्पा कुलकर्णी :** गवताच्या मागणी-बद्दल खुलासा (२८९०६).

[फक्त प्रेषकांचा नामोल्लेख असलेलें]

**मोरो बापूजी भावे – (—) :** पंतसाहेबांस तात्या जोशी याच्या घरी मेजवानी झाल्यासंबंधी (२८८८६).

रुमाल क्र. ५५, पुडके क्र. ३ चालू :

**अर्जदास्त चालू :**

**रघोजी निकम – (—) :** सखाजी व शिवजी निकम हे सखोजी मुंढे याच्या चाकरीतून निघून मल्हारराव रास्ते यांच्या चाकरीत गेल्याने सखोजी मुंढे यास तगादा न करण्याची ताकीद करावी म्हणून (२८९७५).

**[प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख नसलेले]**

पाठक यांनी प्रेषकाकडे दिलेली इनाम जमीन कायम ठेवावी म्हणून खुलासा (२८८८५); हैबतराव गायकवाड याने कापडाबद्दल दिलेला वरातेचा ऐवज भरतगडकर मामलेदाराने प्रेषकास न देता प्रेषकास पकडून जबरदस्तीने लिहून घेतलेल्या मजकुराचा तपशील (२८९०९).

**कतबे :**

**बाल पाटील व गंगाजी पाटील झाटे – साहेब* :** बळवंतराव नागनाथ याजकडे वसूल, महसूल वगैरे दिला असून त्याची रुजवात करून दिली असून यात कमीजास्त झाल्यास सरकारचे गुन्हेगार ठरू म्हणून, २० रमजान, सु. १२०९/१० नोव्हेंबर १८०८ (२८९२५).

**गदाधरभट खटावकर – (—) :** बेणीराम यास आणावयास गेलो असता त्याची व प्रेषकाची भेट झाली नसल्याचे, २३ जिल्काद, सु. ११७२/२८ फेब्रुवारी १७७२ (२८९१५).

**[प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख नसलेला]**

सुभानजी मालशिकारे व सगुणा आटोळे यांच्यात असलेल्या जातीच्या तंट्याचा खुलासा (२८९०३).

**करीना :**

**[प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख नसलेला]**

प्रेषकाने गोविंद आबाजी याच्या घरी दिलेल्या त्याच्या लेकीच्या आजारपणाचा तपशील (२८९१२).

**जबान्या :**

**गुमाजी* व देवजी* – नागाप्पा* :** सातारा येथे आलेल्या ऐवजाचा तपशील (२८८९४).

**जेठाजी मारवाडी – चिंतोपंत रावजी देशमुख :** स्वरूपचंद भगवानदास व कणीराम यांच्याशी असलेल्या जागेच्या व्यवहाराच्या येणे ऐवजाबाबत, आषाढ शु. १४, श. १७३७/२० जुलै १८१५ (२८८९०).

**दालिमा शेख – (—) :** सोलापूर येथे धरून नेल्याबद्दल (२८८८९).

**नारायण विराप्पा कोमटी – ( ) :** नरसी भट याने अंताप्पा याच्याकडे सणगे देऊन ऐवज घेतल्याबद्दल (२८८९१).

**निंबाजी केदारजी – (—) :** आण्णाप्पा नाईक याच्या भीमजी पाटील याजकडे असलेल्या ऐवजाच्या फडशाबाबत (२८८८८).

**विश्वंभर परदेशी – (—) :** उस्मानने गांवी येऊन किती वर्षे चाकरी केली त्याचा तपशील (२८८८७).

**जबान्या चालू :**

**संताजी शिंदे – (—) :** रघुनाथदास सावकार व नारो मल्हार याजकडील येणे असलेल्या ऐवजाबद्दल खुलासा (२८८९२–८९३).

**जबाब :**

देवाची पूजा, महारुद्र, श्री सूक्ताचे पठण वगैरेसंबंधी लागणाऱ्या भटजींच्या दक्षिणेचा तपशील (२८९२८).

**जामीन कतबे :**

**मोकदम मौजे भाव – सुभेदार* :** भिवजी रामोशी यास नांदणुकीविषयी जामीन असल्यासंबंधी (२८८९५).

**[प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख नसलेला]**

अंतू सोनार याने हरिपंत शेणवी याजकडून घेतलेल्या कर्जाचा फडशा त्याजकडून करवून देऊ, त्याने न केल्यास आपण करू म्हणून, ज्येष्ठ शु. ७, श. १७३८/२ जून १८१६ (२८९१६).

**तेरीज :**

खर्च केलेल्या दारूसंबंधी (२९०१५); निरनिराळ्या वस्त्रांचे (२९०१६).

**पत्रें :**

**आप्पाजी मल्हार – बाबा* :** शिखर शिंगणापूर येथील ब्राह्मण व बडवे यांच्यातील कजियाबाबत खुलासा (२८९४९).

**आप्पाजी रामचंद्र – सदाशिव बाबूराव :** नाईकजी पाटील गरुड याच्या मुलाने खंडोजी व विठोजी पाटील यांच्या मेंढरांवर कुत्रे सोडल्याने झालेल्या तंट्याचा निकाल लावण्याबद्दल (२८९५६).

**कृष्णाजी भगवंत हर्षे – गणेशपंत भाटे :** जावळी येथील देवस्थानच्या कामकाजाबद्दल विचारणा व वसुलीबाबत खुलासा (२८९३९).

**गोविंद केशव थत्ते – शास्त्रीबावा (रामशास्त्री प्रभुणे) :** मुळास देवाज्ञा, बहिरभट याच्याशी वतनासंबंधी तंटा (२८९६६).

**गोविंद दीक्षित – रामशास्त्री प्रभुणे :** मौजे धामणदिवी येथील जागेबाबत असलेल्या बर्वे व सहस्रबुद्धे यांच्या कज्ज्याविषयी (२८९५९).

**चिमणाप्पा* – वडील* :** आज्ञेप्रमाणे तट्टू व रुपये रवाना, प्रापकांचे येण्याचे वर्तमान ऐकून आनंद झाल्यासंबंधी (२८९३१).

**तुळसाजी सटवाजी हिंगणे – बाबासाहेब* :** रोजमुऱ्याची पोंच, वैशाख, श. १७३४, मे-जून १८१२ (२८९१३).

**त्रिंबक आप्पाजी शास्त्रीबावा (रामशास्त्री प्रभुणे) :** वतनाची मोकळीक करण्याची विनंती (२८९७१).

**दादा* – वडील* :** घरगुती किरकोळ मजकूर (२८९१९).

**दामाजी विश्वनाथ – मोरोपंतबाबा* :** सुभा प्रकरणाच्या न्यायनिवाड्याबाबत (२८९५१).

**धोंडभट पुजारी जोशी – गोविंदराव काशीनाथ सुभेदार :** श्रीच्या नैवेद्य नंदादीपाबद्दल व वर्षासनाबद्दलचा ऐवज भरून पावल्यासंबंधी (२८८९६).

रुमाल क्र. ५५, पुडके क्र. ३ चालू :

पत्रें चालू :

**नागेशभट आफळे – वडील*** : माहुली येथील पोताकडील ऐवज रवाना केल्यासंबंधी (२९०३०).

**नारो आप्पाजी – बापू*** : गंगाजी पाटील मालशिरसकर यास जामुदाबरोबर पाठवीत असल्याचे (२८९६७); आबाजी लक्ष्मण यास चोरीच्या जाबसालासाठीं पुरंदर येथे पाठविल्याबद्दल (२८९६८).

**नारो कृष्ण – कुसाजी शिंदे** : जोतशेट कोठीवाले याच्या वरातेची हसेबंदी वरातेत लिहिल्याप्रमाणे त्यास ऐवज देऊन कबज घेण्याविषयी (२९०१०).

**नारो गोविंद – गणेशपंत भाटे** : पंढरपूर येथील देवस्थानचे नेमणुकीस असलेले कारकून व शिपाई यांचा पगार देण्याविषयी (२८९३८).

**नारो महादेव – शास्त्रीबावा** (रामशास्त्री प्रभुणे) : आज्ञेनुसार बडवे यास हुजूर पाठविले असल्याचे, २४ ज. खर, कार्तिक, सबा सु. ११६७ / २७ नोव्हेंबर १७६६ (२८९५०).

**नीळकंठभट्ट राजपुरोहित – रामशास्त्री प्रभुणे** : बाबाजी घाटगे यांच्या वडिलांनी प्रेषकास पुरोहितपण दिले असता बाबाजी घाटगे याने बच्चंभट यास पुरोहितपण देण्याचा निश्चय केल्याने त्यास तसे करू नये म्हणून कळविण्याबाबत (२८९४५).

**बगाजी गोपाळ – मोरोपंतबाबा*** : बिसाजी बहिरव कुलकर्णी याच्या कुलकर्णाच्या हक्काबाबत विनंती (२८९६९).

**बापूजी नरसिंह कुलकर्णी – कोंडोपंतनाना*** : जत्रेच्या उत्सवासाठीं रुपया देण्याबद्दल (२८९३०).

**बाबाजी* – तात्या*** : कापूसखेड येथील देवस्थान चौकशीकडील रवाना केलेल्या ऐवजाचा तपशील (२८९३३).

**बाळाजी महादेव – मोरोपंत*** : गार्दी यांनी वरातेचा ऐवज सगळा दिला नसल्याचे, दत्ताजी पाटील व गोविंद त्रिंबक यांनी श्रीमंत रावसाहेबांकडे प्रेषकाच्या विरुद्ध फिर्याद केल्याने त्यांचा बंदोबस्त करण्याबद्दल (२९००२).

**भगवंत शिवराम दर्शनी – बगाजीपंत देशपांडे व मोरोपंतदाजी*** : मांडवेकर, अडुकले व कानभट यांच्या घरगुती खटल्यासंबंधीचे निवेदन (२८९४६-९४७).

**मोकदम व समस्त दाहीजण मौजे माळसिरस – मोकदम समस्त दाहीजण मौजे कोथळे** : गावचे चोरीस गेलेले बैल धरले असल्यामुळे ते बैल व चोर घेऊन जाण्याबाबत (२८८९९).

**यशवंतराव त्रिंबक – पांडुरंगपंत आबा*** : बापू गोडबोले याजकडील आलेला हुंडीचा ऐवज पाठविला असून हुंडीवर भरपाई करून घेण्याबाबत (२८९९९).

**राघो बल्लाळ जोशी – नारोपंत वाघ** : बोरगांव येथील देवस्थानच्या दागिन्याच्या व देवळाच्या दुरुस्तीसाठीं ऐवजाची मागणी (२८९३२); – **विष्णुपंततात्या*** : श्री भीमाशंकर देवाची समाराधना झाल्यासंबंधी, आनंदराव याजकडील ऐवज जमा, ज्योतीबा शिंदे यास सातारा पेठ्याच्या कारकुनाकडे रवाना करीत असल्याचे वगैरे कलमे (२८९४०); श्री भीमाशंकर येथील पूजा, नैवेद्य, अभिषेक यासंबंधी प्रापकाच्या आज्ञेनुसार वर्तणूक करू म्हणून आश्वासन (२८९४३).

पत्रें चालू :

**राणोजी खवले–देवरावजी*** : ऐवजाची पोंच (२९०३२).

**लक्ष्मण गंगाधर–जगन्नाथपंत देशपांडे** : आबा काळे याजकडील कारकुनाजवळ हिशेबाची याद पाहून येणे असलेल्या ऐवजाची व्याजासहित फेड करणे (२९०००).

**वामनराव गोविंद–लक्ष्मणराव शिंदे** : महाळुंगे येथे झालेल्या चोरीचा तपास लावण्याबद्दल (२८९५५).

**शेख महंमद–बाबासाहेब*** : सांडणीस्वारांच्या रोजमुऱ्याची पोंच (२९०२१).

**सखू सोनार पाठकजी** : प्रेषकाच्या धाकट्या भावाने गुजराथी सोनाराच्या मुलीशी लग्न केल्याने सोनारांनी प्रेषकास जातीबाहेर टाकले असून भावाशी प्रेषकाचा काहीहि संबंध नसल्यामुळे शुद्ध करून पुन्हा जातीत घेण्याविषयी विनंती (२८९२३).

**सखाराम बाबाजी–गणेशपंतदादा भाटे** : देवस्थानच्या चौकशीपैकी आलेला वसूल कुसाजी भोसले याजबरोबर रवाना केला त्याचा तपशील (२८९३५); – **गणेशपंततात्या*** : यवतेश्वर येथील श्रीच्या अभिषेकाबद्दल ब्राह्मणास ४० रुपयांपैकी निम्मा ऐवज दिला असून बाकी राहिलेला ऐवज देऊन पावती घेऊन प्रेषकाकडे पाठवून द्यावी म्हणून (२८९३६).

**समस्त ब्राह्मण, क्षेत्र माहुली–पांडुरंगपंतआबा*** : माहुली येथील हुजूर मामल्याची रसद रवाना (२९०३१).

**[फक्त प्रेषकांचा नामोल्लेख असलेलीं]**

**अंबरनाथ जोगीडवरे व गोविंदराव कदम – (—)** : बखतराऊल कानफाटे हा नेहमी दरोडे घालून उपद्रव देत असल्याने त्याचे पारिपत्य करण्याविषयी विनंती (२८९६१).

**कृष्णराव अनंत – (—)** : नान्या महार याच्या बायकोशी गंग्या महार याने बदअंमल केल्याचे पंचाईत मते सिद्ध झाल्यासंबंधी (२८९२४).

**कृष्णाजी जगन्नाथ फडणीस – (—)** : वेतनवाद देण्याची कृपा करावी म्हणून विनंती (२८९७७).

**केशव आबाजी भाटे – (—)** : देवस्थानच्या पूजेअर्चेसाठीं ब्राह्मणास पडजमीन देण्याबाबत (२८९४१).

**खंडो गणेश – (—)** : पुंडभट रामकृष्णभट क्षेमकल्याणी व महादेवभट आबा भट व दादंभट यांच्यात असलेल्या नाशिक येथील घराविषयी व यजमानकृत्याविषयीच्या कज्ज्यासंबंधी (२८९५४) (नकल).

**खानजादे हेमराज – (—)** : खर्चासंबंधी निवेदन (२८९०७).

**बाबाजी* – (—)** : पेरु पाठविले असल्याचे, तट्टूंची मागणी (२८९२७).

**बाळाजी राम गोवंडे – (—)** : विनायक गोविंद बर्वे, रामसिंग हजारी, घोरपडे तासगांवकर यांच्याकडील येणे असलेल्या ऐवजासंबंधी खुलासा (२९०२९).

रुमाल क्र. ५५, पुडके क्र. ३ चालू :

पत्रें चालू :

**नागेशभट आफळे – वडील*** : माहुली येथील पोताकडील ऐवज रवाना केल्यासंबंधी (२९०३०).

**नारो आप्पाजी – बापू*** : गंगाजी पाटील मालशिरसकर यास जासुदाबरोबर पाठवीत असल्याचे (२८९६७); आबाजी लक्ष्मण यास चोरीच्या जाबसालासाठीं पुरंदर येथे पाठविल्याबद्दल (२८९६८).

**नारो कृष्ण – कुसाजी शिंदे** : जोतशेट कोठीवाले याच्या वरातेची हसेबंदी वरातेत लिहिल्याप्रमाणे त्यास ऐवज देऊन कबज घेण्याविषयी (२९०१०).

**नारो गोविंद – गणेशपंत भाटे** : पंढरपूर येथील देवस्थानचे नेमणुकीस असलेले कारकून व शिपाई यांचा पगार देण्याविषयी (२८९३८).

**नारो महादेव – शास्त्रीबावा** (रामशास्त्री प्रभुणे) : आज्ञेनुसार बडवे यास हुजूर पाठविले असल्याचे, २४ ज. खर, कार्तिक, सबा सु. ११६७ / २७ नोव्हेंबर १७६६ (२८९५०).

**नीळकंठभट्ट राजपुरोहित – रामशास्त्री प्रभुणे** : बाबाजी घाटगे यांच्या वडिलांनी प्रेषकास पुरोहितपण दिले असता बाबाजी घाटगे याने बचंभट यास पुरोहितपण देण्याचा निश्चय केल्याने त्यास तसे करू नये म्हणून कळविण्याबाबत (२८९४५).

**बगाजी गोपाळ – मोरोपंतबाबा*** : विसाजी बहिरव कुलकर्णी याच्या कुलकर्णाच्या हक्काबाबत विनंती (२८९६९).

**बापूजी नरसिंह कुलकर्णी – कोंडोपंतनाना*** : जत्रेच्या उत्सवासाठीं रुपया देण्याबद्दल (२८९३०).

**बाबाजी* – तात्या*** : कापूसखेड येथील देवस्थान चौकशीकडील रवाना केलेल्या ऐवजाचा तपशील (२८९३३).

**बाळाजी महादेव – मोरोपंत*** : गार्दी यांनी वरातेचा ऐवज सगळा दिला नसल्याचे, दत्ताजी पाटील व गोविंद त्रिंबक यांनी श्रीमंत रावसाहेबांकडे प्रेषकाच्या विरुद्ध फिर्याद केल्याने त्यांचा बंदोबस्त करण्याबद्दल (२९००२).

**भगवंत शिवराम दर्शनी – बगाजीपंत देशपांडे व मोरोपंतदाजी*** : मांडवेकर, अडुकले व कानभट यांच्या घरगुती खटल्यासंबंधीचे निवेदन (२८९४६-९४७).

**मोकदम व समस्त दाहीजण मौजे माळसिरस – मोकदम समस्त दाहीजण मौजे कोथळे** : गावचे चोरीस गेलेले बैल धरले असल्यामुळे ते बैल व चोर घेऊन जाण्याबाबत (२८८९९).

**यशवंतराव त्रिंबक – पांडुरंगपंत आबा*** : बापू गोडबोले याजकडील आलेला हुंडीचा ऐवज पाठविला असून हुंडीवर भरपाई करून घेण्याबाबत (२८९९९).

**राघो बल्लाळ जोशी – नारोपंत वाघ** : बोरगांव येथील देवस्थानच्या दागिन्याच्या व देवळाच्या दुरुस्तीसाठीं ऐवजाची मागणी (२८९३२); – **विष्णुपंततात्या*** : श्रीभीमाशंकर देवाची समाराधना झाल्यासंबंधी, आनंदराव याजकडील ऐवज जमा, ज्योतीबा शिंदे यास सातारा पेठ्याच्या कारकुनाकडे रवाना करीत असल्याचे वगैरे कलमे (२८९४०); श्री भीमाशंकर येथील पूजा, नैवेद्य, अभिषेक यासंबंधी प्रापकाच्या आज्ञेनुसार वर्तणूक करू म्हणून आश्वासन (२८९४३).

पत्रें चालू :

**राणोजी खवले–देवरावजी*** : ऐवजाची पोंच (२९०३२).

**लक्ष्मण गंगाधर-जगन्नाथपंत देशपांडे** : आबा काळे याजकडील कारकुनाजवळ हिशेबाची याद पाहून येणे असलेल्या ऐवजाची व्याजासहित फेड करणे (२९०००).

**वामनराव गोविंद–लक्ष्मणराव शिंदे** : महाळुंगे येथे झालेल्या चोरीचा तपास लावण्याबद्दल (२८९५५).

**शेख महंमद–बाबासाहेब*** : सांडणीस्वारांच्या रोजमुऱ्याची पोंच (२९०२१).

**सखू सोनार पाठकजी** : प्रेषकाच्या धाकट्या भावाने गुजराथी सोनाराच्या मुलीशी लग्न केल्याने सोनारांनी प्रेषकास जातीबाहेर टाकले असून भावाशी प्रेषकाचा काहीहि संबंध नसल्यामुळे शुद्ध करून पुन्हा जातीत घेण्याविषयी विनंती (२८९२३).

**सखाराम बाबाजी–गणेशपंतदादा भाटे** : देवस्थानच्या चौकशीपैकी आलेला वसूल कुसाजी भोसले याजबरोबर रवाना केला त्याचा तपशील (२८९३५); – **गणेशपंततात्या*** : यवतेश्वर येथील श्रीच्या अभिषेकाबद्दल ब्राह्मणास ४० रुपयांपैकी निम्मा ऐवज दिला असून बाकी राहिलेला ऐवज देऊन पावती घेऊन प्रेषकाकडे पाठवून द्यावी म्हणून (२८९३६).

**समस्त ब्राह्मण, क्षेत्र माहुली–पांडुरंगपंतआबा*** : माहुली येथील हुजूर मामल्याची रसद रवाना (२९०३१).

[फक्त प्रेषकांचा नामोल्लेख असलेलीं]

**अंबरनाथ जोगोडवरे व गोविंदराव कदम – (—)** : बखतराऊल कानफाटे हा नेहमी दरोडे घालून उपद्रव देत असल्याने त्याचे पारिपत्य करण्याविषयी विनंती (२८९६१).

**कृष्णराव अनंत** – (—) : नान्या महार याच्या बायकोशी गंग्या महार याने बदअंमल केल्याचे पंचाईत मतें सिद्ध झाल्यासंबंधी (२८९२४).

**कृष्णाजी जगन्नाथ फडणीस** – (—) : वेतनवाद देण्याची कृपा करावी म्हणून विनंती (२८९७७).

**केशव आबाजी भाटे** – (—) : देवस्थानच्या पूजेअर्चेसाठीं ब्राह्मणास पडजमीन देण्याबाबत (२८९४१).

**खंडो गणेश** – (—) : पुंडभट रामकृष्णभट क्षेमकल्याणी व महादेवभट आबा भट व दादंभट यांच्यात असलेल्या नाशिक येथील घराविषयी व यजमानकृत्याविषयीच्या कज्ज्यासंबंधी (२८९५४) (नक्कल).

**खानजादे हेमराज** – (—) : खर्चासंबंधी निवेदन (२८९०७).

**बाबाजी*** – (—) : पेरु पाठविले असल्याचे, तट्टूंची मागणी (२८९२७).

**बाळाजी राम गोवंडे** – (—) : विनायक गोविंद बर्वे, रामसिंग हजारी, घोरपडे तासगांवकर यांच्याकडील येणे असलेल्या ऐवजासंबंधी खुलासा (२९०२९).

रुमाल क्र. ५५, पुडके क्र. ३ चालू :

पत्रें चालू :

**भुजाजी पाटील जगताप** – (—) : बापूजी देशमुख याचा पुत्र भवानजी यास दत्तक दिल्याचे, चिंधोलीच्या महजराच्या नांवातील जाबसालासाठीं बापूजी देशमुख येत असल्याचे (२८९७०).

**मोकदम रेटरे बुद्रुक** – (—) : श्रीच्या उत्सवास येण्याची विनंती (२८९२६).

**मोर जोशी** – (—) : प्रेषकाकडील तिसगांव येथील ज्योतिषपणाची वृत्ती अमानत असल्याने तेथे गुमास्ता ठेवण्याविषयी, २१ मोहरम, सु. ११६०/१४ सप्टेंबर १७५९ (२८९७४).

**मोरो हरि** – (—) : नानाजी गिरिधर व कुसाजी महाजन यांच्यात असलेल्या कुळांच्या तंट्याबाबत (२८९५३).

**रघुनाथराव थोरात** – (—) : तीर्थविधी व गंगाराधनेबद्दल खर्चास द्यावयाचा ऐवज (२९००९).

**राघोजीबाबा, माधवराव, हणमंतराव भोसले वगैरे** – (—) : प्रेषकांकडील गाई, म्हशी वगैरे गुरे मौजे आंबेडे येथे व्यंकाजी कोसकर याजकडे वनचराईसाठीं गेली ती तिथेच चरु द्यावी म्हणून सदाशिव पंडित सचिव यास पत्र देण्याबद्दल, १७ र. वल, सु. ११५९/१९ नोव्हें. १७५८ (२८९९०).

**लक्ष्मण महादेव जोशी** – (—) : सरकारच्या आज्ञेनुसार बाळाजी रामचंद्र, खंडो धोंडदेव व प्रेषक यांनी जामदारखान्यांतून ज्याचा त्यास ऐवज देण्याविषयी (२९०२८).

**व्यंकाजी जनार्दन मुळें खोत व कुलकर्णी** – (—) : घर बांधायला घेतले असता रामाजी भिकाजी निंबकर हा अडथळा करतो सबब त्यास ताकीद करण्याबद्दल (२८९९२).

**विठ्ठलराव मोरेश्वर गोळे** – (—) : पदमसिंग पिसाळ याच्या खंडाच्या हवाल्यासंबंधी खुलासा (२८९०४).

[फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेलीं]

(—) – **गणेशपंत भाटे** : देवस्थानच्या शिलकेच्या वसुलाचा व त्यापैकी खर्च काय झाला त्याचा तपशील पाठविण्याबद्दल, बनपुरी येथील नाईक याच्या चौकशीचे पुडके व म्हसवड येथील चौकशीचे कागद पाठविण्याबाबत वगैरे कलमे (२८९३७).

(—) – **जगन्नाथ कृष्ण** : हुजूर पागा निा बाजी मोरेश्वर याजकडील धान्य व रोजमुऱ्याच्या येणे असलेल्या बाकीवर जतकर डफळे याच्या ऐवजाची वरात देण्याविषयी (२९००३).

(—) – **दाजी आप्पाजी** : श्री व्यंकोबाच्या उत्सवासाठीं फुलांची मागणी (२८९३४).

(—) – **नारो शिवराम** : पागेकडील भास्कर जगन्नाथ याजकडे घोड्यांसाठी गवत देण्याबाबत, ३० सवाल, सु. ११९४/१० जून १७९३ (२९०११).

(—) – **बापू* व संत*** : दोन्ही प्रापकांच्या घरची मुले माणसे सुखरूप असल्याबद्दल, गावात झालेल्या चोऱ्यांचे नुकसान भरून द्यावे म्हणून रामोशांना तगादा केला असल्याचे (२८९२१).

पत्रें चालू :

(—) – **महादाजी बल्लाळ** : कृष्णभट माईणकर याने वरातेचा ऐवज मुदतीत न दिल्यास त्यास तगादा लावून ऐवज वसूल करून घेण्याबद्दल, ३ मोहरम, सु. १२१२/१८ जानेवारी १८१२ (२९००१).

(—) – **महिपत जयराम** : मानाजी निकम याजकडील पागेकडे कर्ज, रद्दकर्जाचे झाडे किती आहेत ते निवडून घेऊन येण्याबाबत (२९००७).

(—) – **रामचंद्र शिवाजी** : सोलापूर येथील येणे असलेल्या साल मजकुराच्या हप्त्याच्या ऐवजापैकी बाळकृष्ण केशव यास ऐवज देण्याविषयी (२९००४) (नक्कल).

(—) – **सदाशिवपंतदाजी*** : येसू दिवडे व महारावरोबर पाठविलेला ऐवज पोहोचला, बाकी राहिलेला ऐवज लवकर पाठविण्याबद्दल (२९०३३).

[प्रेषक व प्रापक यांचा नामोल्लेख नसलेलीं]

नारायण हरि यास शंकर गुजराथ कोठावळे याजकडून रोजमुरा मिळाल्याबद्दल, १७ रमजान, सु. ११८३ / २७ ऑगस्ट १७८२ (२८८९७); नारो गोपाळ चिचरे यांस रोजमुरा पावल्याबद्दल (२८८९८); घोडीसह गोविंदा यास प्रापकाकडे पाठवीत असल्याचे (२८९०५); पितांबर त्रिंबकजी याचे भाईजी कलभाई याजकडील येणे असलेल्या ऐवजाबद्दल (२८९१४) (मसुदा); त्रिंबक कृष्ण देसाई यास दिलेल्या कर्जाचा तपशील (२८९१७); पांडुरंगाच्या देवळात होणाऱ्या चोऱ्यांचा बंदोबस्त करण्याविषयी (२८९२०); बाळंभट कातरणे याचे घर जळाल्यामुळे त्यास आश्रय देण्याबाबत (२८९२२); रास्ते यांच्याकडील मुदत संपल्याने त्यांना सूचना करावी किंवा कसे याबाबत विचारणा (२८९२९); हरभट आण्णा वाळिंबे यास कृष्णाबाई संगम माहुली येथील उत्सवाबद्दल नक्त नेमणूक करून देण्याबद्दल (२८९४२); श्री जुगाई देवी येथील जमिनीच्या पाण्यास गांवकरी अडथळा करतात तेव्हां पाणी देण्याविषयी गावकऱ्यांना ताकीद करण्याबद्दल; पगाराचा ऐवज पाठविण्यासाठीं कातड्याच्या पिशव्यांची मागणी (२८९४४); मौजे टाकळी व का कानूर या दोन्हीं गावांमधील सीमेच्या कज्ज्यासंबंधी खुलासा (२८९४८); उरळी येथे झालेल्या चोरीबाबत खुलासा (२८९५२); सुभाना माळी जाधव व आप्पाजी अहिर या दोघांच्या कज्ज्यात आप्पाजी खोटा ठरल्याने त्यास मसाला केला असल्याचे (२८९५७); मौजे पाटकुले व पेणूर या दोन गावांच्या शिवेच्या कज्ज्याची चौकशी होऊन पेणूरकर खोटे ठरले असून दोन्हीं गावांनी निवाडा झाल्याप्रमाणे शिवेचे धोंडे रोवावे म्हणून ताकीद (२८९५८); घरगुती मजकूर (२८९६०); बाबूराव सुर्वे व अंतो बाबाजी साखळकर या दोघांच्यात असलेल्या खोतीच्या तंट्याचा निकाल लावण्याबाबत (२८९६२); बाळाजी शिवदेव भिडे व महादजी गोविंद उपकारे या दोघांच्यात देवघेवीबाबत कज्ज्या झाल्याने महादाजीने विष खाऊन जीव दिला त्याचा आरोप बाळाजीपंतावर येऊन तो बहिष्कृत झाला सबब शुद्ध करण्यासाठीं त्याने विनंती केल्याने प्रायश्चित्ताबद्दल विचार योजून पाठविण्याबाबत (२८९६३, २८९६५) (मसुदा); कृष्णाजी नारायण याच्या त्याच्या भावजईशी असलेल्या वांट्यांबाबतच्या कज्ज्याचा फडशा करण्याबद्दल (२८९६४); शेटीबा खराडे व सोमाजी

**रुमाल क्र. ५५, पुडके क्र. ३ चालू :**

**पत्रें चालू :**

भोईटे यांच्या कर्जाच्या वसुलीसंबंधी (**२८९७२**); निंबाळकर याजकडून छया गोसावी यास बोरगांवथडी येथील सरदेशमुखीचा ऐवज देण्याबाबत, २० मोहरम, सु. ११६८/१८ जून १७६७ (**२८९८१**); सोमाजी पाटील व देवजी काटकर यांच्यातील कजियासंबंधी (**२८९८४**); एकोजी राजे यांनी सईबाई हीस जयमंगल ता। शाहपूर हे इनाम दिलेले गाव सईबाईचा पुत्र तिमाजी गोपाळ याने कटेकृष्णाचार्य व उग्र नरसिंहाचार्य यांच्या नांवे धारादत इनाम करून दिल्याबद्दल, सु. ११७२/इ. स. १७७१-७२ (२८९९३); श्रीमंतांच्या आज्ञेनुसार भिकाजी चिटणीस यांनी एक हजार रुपयाची वरात केली असल्याचे (२९००५); खुशालसिंग वगैरे गारद्यांस द्यावयाच्या ऐवजाबद्दल (२९००८); गंगाराम पिसाळ यास रोजमुरा देण्याबद्दल (२९०१२); धोंडो गोविंद यास तीर्थविधीबद्दल खर्चास ऐवज देण्याविषयी (२९०१७); जासुदांना द्यावयाच्या रोजमुऱ्याबद्दल (२९०१८); बच्याजी विश्वनाथ यास तीर्थविधीबद्दल ऐवज देण्याबद्दल (२९०१९); आनंदराव जाधव यास रोजमुरा देण्याबद्दल (२९०२०); कासिदांना रोजमुरा देण्याबाबत (२९०२२, २९०२३); जोत्याजी फडतरे याजकडील शिलेदारांस रोजमुरा देण्याबद्दल (**२९०२४**); बाळाजी गणेश याजकडील पालखीस रोजमुरा देण्याबद्दल (२९०२५); भैरव, रामकिसन, रामसिंग वगैरेस रोजमुरा देण्याबाबत (२९०२६); किसनदास यांनी मणीराम याजकडून वेगवेगळ्या व्यक्तींना देण्यासाठीं घेतलेल्या कर्जाबाबत (२९०२७); कुसाजी पायगुडे यास ऐवज देण्यासंबंधी (२९०३४).

**याद्या :**

पिराजी देशमुख याजकडील देशमुखीच्या वतनाच्या चौकशीची कलमे (२८९१८); धनबा मंत्री याजकडील येणे असलेल्या बाकी ऐवजासंबंधी दिलेल्या पत्रांची (२८९७३); बळवंतराव गोपाळ यास ऐवजाचा तगादा करू नये म्हणून केशव गोविंद व उद्धव त्रिंबक यांस द्यावयाच्या पत्रांची (२८९८९).

**यादी जबानी :**

[**प्रेषक व प्रापक यांचा नामोल्लेख नसलेली**]

बहिणीच्या घरावर आलेल्या जप्तीसंबंधी (२८९०१).

**रद्दकर्ज :**

नारो आप्पाजी यास दिलेला ऐवज कोणत्या तारखेस रद्दकर्जी धरावा याबाबत विचारणा (२९००६).

**रसानगी याद्या :**

**काळोजी सावंत** – (—) : नेरले येथील कालकाई वाडीतील शेतमळ्याच्या वतनास भावाकडून उपद्रव होत असून तो गावकऱ्यांनी समजूत घालून देखील ऐकत नसल्याने दाजीपंत यास पत्र देण्यासंबंधी, १ सफर, सु. ११६० / २३ सप्टेंबर १७५९ (२८९७९).

(—) – **बाळाजी जनार्दन** : बहुली येथील रानातून लाकडे तोडून आणण्याची हरि रघुनाथ भिडे यांना परवानगी देण्यासंबंधी, ७ ज. खर, सु. ११६५ । १ डिसेंबर १७६४ (२८९८०); पांडुरंग कृष्ण गोडबोले याजकडे वडगांव येथील कमाविशीबद्दल रसदेचा भरणा केल्याने त्यास तगादा न करण्याबद्दल (२८९८७).

**रसानगी याद्या चालू :**

[ **प्रेषक व प्रापक यांचा नामोल्लेख नसलेल्या** ]

महादाजी राम भट यास वेतन देण्याबद्दल बाळाजी जनार्दन यास पत्र देण्याबद्दल (२८९७६); सखाराम भगवत याजकडील घोडी व उंट सामानासहित नागपूर येथून देशास येत असता हसिलाचा तगादा करु नये म्हणून त्यास द्यावयाच्या दस्तकाची, १० मोहरम, सु. ११६०/ ३ सप्टेंबर १७५९ (२८९७८); रावो केशव याच्या पागेतील घोडा तालिकोटावर पडल्याने आप्पाजी रामचंद्र यास घोड्याचा तगादा करू नये म्हणून द्यावयाच्या ताकीदपत्राची (२८९८२); चाकणच्या किल्यात दारुगोळ्याची बेगमी करण्याविषयी (२८९८३); संभाजी व जिवाजी आबरे यांच्यात गुळदे येथील खोतीच्या वतनाच्या कजियाच्या चौकशीअंती संभाजीस वतन असल्यासंबंधी (२८९८५); शेख्याजी नाईक याच्या ठेवीवर जिवाजी परदेशी याने सावकारी केल्याने कुळे वसूल देत नाहीत म्हणून त्यांना ताकीद करण्याबद्दल (२८९८६); गोसावी यास उंटासाठीं औरंगाबादेचे दस्तक देऊन केलेल्या कराराच्या मक्त्यासंबंधी (२८९८८); आप्पाजी रामचंद्र कुलकर्णी व ज्योती मोरेश्वर किकलीकर यांच्या देण्याघेण्याच्या कजियात विश्वासराव भावे यांनी पंचाईत करून ते सांगतील त्याप्रमाणे वर्तावे असे ठरले असता ज्योती मोरेश्वर घरी निघून जाऊन त्यांनी आप्पाजीच्या मुलमाणसांस उपद्रव दिला तरी ज्योती मोरेश्वर यांस पंचाईत मते वर्तणूक करावी म्हणून ताकीद देण्याबाबत (२८९९१); शेटीबा आइतोळे यास किल्यावरील तोफा उतरुन देणे व नारो कृष्ण देव यास वाण देण्यासाठीं पत्र देण्याबद्दल (२८९९४); भास्कर भट वैद्य यांच्यातर्फे तांदुळवाडी येथील केलेल्या जमीच्या मोकळिकेबद्दल, श्रीचे बेट जमिनीवर उपद्रव देऊ नये व वैद्य याजपाशी जी इनाम पत्रे असतील ती घेऊन त्यास पाठविण्याविषयी (२८९९५); फरासखान्याकडील डेऱ्यास व राहुट्यास तनावासाठीं सूत मागविण्याबद्दल जिवाजी गणेश यास पत्र देण्याविषयी (२८९९६); कोंडभट सप्रे पुराणिक याच्या ऐवजाची रामकृष्ण गोविंद याजवर द्यावयाच्या वरातेची (२८९९७); महादेव शास्त्री यांना निरोपसमयी द्यावयाच्या ऐवज व कापडासंबंधी (२८९९८).

**राजीनामा :**

मधोजी व संताजी चांभार यांच्या कज्ज्याबद्दल (२८९००).

**हिशेब :**

वली महंमद यास द्यावयाच्या शिध्याचा (२९०१३); फरासखाना व जामदारखान्यापैकी कपड्यांचा (२९०१४).

* संपूर्ण नांवाचा उल्लेख नाही.

---

| | |
|---|---|
| **रुमाल क्र. ५५, पुडके क्र. ४** | **सु. स. ११९७–१२२३** |
| **का. सं. ११९ (२९०३५-२९१५३)** | **इ. स. १७९६–१८२३** |

**पत्रें :**

[**फक्त प्रापकाचा नामोल्लेख असलेले** ]

(—) – **सखाराम*** : मौजे जिहे येथील कुलकर्ण वतन भगवंत रघुनाथ पालकर यांनी खरेदी घेतले तरी त्यास देवस्थानाकडील वहिवाट देण्याबाबत विनंती (२९०४२).

रुमाल क्र. ५५, पुडके क्र. ४ चालू :

पत्रें चालू :

[ प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख नसलेलीं ]

श्रीच्या अनुष्ठानाकरितां वाई येथे रवाना केलेले साहित्य पोहचल्याचे कळविण्याबद्दल (२९०३७); महाबळेश्वर येथे दारून रवाना (२९०३९); सरकारी वसुलीस जाणाऱ्या लोकांच्या रोजमुरा ऐवजासंबंधी (२९०७०); आबाजीपंत साठे यांच्या घराण्याशी फाटक, करमरकर, गाडगीळ, गोखले वगैरेंचा या घराण्याशी कसा संबंध होता त्यासंबंधीची माहिती (२९०७१); सुती दोराबाबतच्या ऐवजाच्या पोंच (२९०९०); कली आणि मणिराम यांच्या रोजमुरा ऐवजाची हिशेबाबाबत (२९०९२); लक्ष्मण राजे व गणपतराव राजे शिर्के यांचे हमदाबाद सुभे दाभोळ येथील सरदेशमुखी हक्काबाबत निवेदन (२९११४); लक्ष्मण राजे व गणपतराव राजे शिर्के आणि चव्हाण या उभयतातील हमदाबाद सुभे दाभोळ येथील सरदेशमुखी वतनाच्या मनसुफीचा फडशा करण्याबद्दल (२९११६); जनार्दन गणेश जोशी व बाबूभट कृष्णभट दातार यांच्या नांदिवडे ता सैतवडे वगैरे चार गावच्या ज्योतिषपणाच्या कज्ज्याबाबत मनसुफी हुजुर पडल्यामुळें तकरिरा घेतल्याबद्दल (२९११८); गोविंदराव दिवाण यांच्या कर्जाऊ ऐवजासंबंधी येळूरकर व गोपाळराव यांचे नावे ताकीदपत्रे द्यावीत (२९१२१); बाबाजी नाईक यास नेवाद ऐवज देण्याबद्दल (२९१३१); सुपे येथील सुतारास द्यावयाची अडसेरी (२९१३४); मौजे पणदेर पा सुपे येथील राणू कुंभारास अडसेरी देण्याविषयी (२९१५०).

फेरिस्त :

सातारा येथील देवस्थान दप्तराकडे पेठा वाई, जावळी वगैरे ठिकाणच्या कागदपत्रांची पुडकी रवाना केली त्यासंबंधीचे (२९०४४).

याद्या :

हुजूरपागेत चोर धरला त्याजकडे सापडलेल्या वस्तभावेची, (२९०३६); धान्य-खर्चासंबंधी, १३ सफर, सु. १२१८/ २२ डिसेंबर १८१७ (२९०३८); मोरवे येथील ज्या लोकांनी पट्टीचा ऐवज दाखल केला त्यांची (२९०४०); श्रीकृष्णाबाई क्षेत्र संगम माहुली येथे श्रीचो प्रतिष्ठापना करण्यासाठी आलेल्या ब्राह्मणांची (२९०४१); कडेपूर पो औंध येथील धर्मादाय जमिनीची गैरवहिवाट करणाऱ्या लोकांची (२९०४५) (नकल); किल्ले पांडवगड, आसगाव व गोरखनाथ येथील चौकीपहाऱ्यावर रात्रपाळीस नेलेल्या शिपायांची (२९०४६); गंगाधर हिरोजी कुलकर्णी याजकडील परगणे संगमनेरपैकी मनसुफीबाबत तपशील देणाऱ्या पत्रांची (२९०४९); बाकी पो जामखेड येथील बाबती, साहोत्रा जास्ती घेतल्यामुळे पंचायत पडली त्यावेळेस हजर असलेल्या लोकांची, सु. १२१६ / इ. स. १८१५–१६ (२९०५१).

(खाली नमूद केलेल्या याद्या कोणाकडे किती शिलेदार व प्यादे असून त्यांना किती रोजमुरा दिला जात होता त्यासंबंधीचा तपशील देणाऱ्या आहेत. प्रथम निसबतदाराचे नाव देऊन पुढे पत्रक्रमांक दिलेला आहे.)

बाबा वैद (२९०५२); खाशाकडील चौकीवर, सु. ११९७/ इ. स. १७९६-९७ (२९०५६); जनार्दन राम (२९०५८); आप्पाजीराव पाटणकर (२९०८८); सोमाजी काळे (२९०९३);

याद्या चालू :

बाबूराव पाटणकर (२९०९४); खंडेराव दरेकर (२९१०३); वामनराव गोंविद (२९१०४); भांड्यांचे वजन व किंमतीचा तपशील देणारी (२९०५३, २९०५४, २९०५९, २९१५२); सयाजी आठले यांच्या मुलाने नजर केलेल्या वस्त्रांची (२९०५५); विष्णुपंत बावळे याजकडील रोखे कोणावर किती आहेत याजबद्दलची (२९०५७); विविध स्त्रीआभूषणांची (२९०६०); पेठ विज्यापूर येथील देवस्थान वसुलाबाबतची (२९०६१); चोर लोकांची (२९०६२); सादिलवार खर्चाची (२९०६३); भांड्यांची (२९०६५); मौजे बिरी ता धामणे व अंबेट ता संगमेश्वर येथील माडांची खरेदी, फुणगुस येथील बेवारशी जमिनीची चौकशी वगैरेबाबतच्या कलमांची (२९०६६); किल्यावर रवाना केलेल्या मिठाची (२९०६७); तोफखान्याकडे दिलेल्या युद्धोपयोगी साहित्याची (२९०६८); गोविंदराव बल्लाळ याजकडील मोकाशापैकी गांवांची (२९०६९); पूर्णगडावरील शिपायांनी गोंधळ केल्याबाबत विशाळगडकरी यांनी मसाले लिहून घेतल्याबाबत (२९०७२); दाजी सुभेदार यांच्या विद्यमाने सरकारांत आलेल्या ऐवजासंबंधीच्या तपशिलार्थ (२९०७४); औषधांची (२९०७५); युद्धोपयोगी किरकोळ साहित्याची (२९०७६); दसऱ्यानिमित्य विविध लोकांना बकरे दिल्याबाबतची (२९०७७); ज्या लोकांना कणीक दिली त्यांची (२९०७८); विंग ता निरथडी येथील बलुतेदारांची (२९०७९); विंग ता निरथडी येथील वसुलाबाबतची (२९०८०, २९१४९); सोने विक्रीबाबतची (२९०८१); कापसाच्या लागवडीसंबंधी (२९०८२); व्रजलाल याजकडून येणे असलेल्या थकबाकीच्या ऐवजासंबंधीची तपशिलार्थ (२९०८३); औंध येथील इनाम जमिनीची बेकायदेशीर वहिवाट करणाऱ्या लोकांची (२९०८५) (नकल); मराठी व इंग्रजी महिन्यांची (२९०८६); बाबाजी कलावंत व कावजी फारशी यांच्यातील ऐवजव्यवहारासंबंधीचा तपशील देणारी (२९०८७); देवाजी पुरुषोत्तम यास भेट दिलेल्या वस्त्रांची (२९०९१); पागेकडील चंदीवैरणीबाबतची व धान्याच्या खरेदीची, मोहरम, सु. ११९७/जून-जुलै १७९६ (२९०९५); सुभ्याप्रमाणे वहिवाट करणे असलेल्या तर्फ सांडसपैकी गावांची (२९०९७); ता नगरपैकी उष्ट्रखाना व तोफखान्याकडे धान्य रवाना केल्याची नोंद (२९०९८); मोसरी व थेऊर येथील गावकरी व कारभारी लोकांची (२९१००); वेगणीकर याजकडे असलेल्या गिरासे लोकांच्या रोजमुऱ्यासंबंधीची (२९१०२); कृष्णाजी अनंत यास चंदी दिली त्याच्या तपशिलाची (२९१०५); बापू कमाविसदार यास रावराजा बुंदीकर याजकडून नजर मिळालेल्या घोड्यास दिलेल्या दागिन्यांची (२९१०६); पागेकडील कारकुनांचा (२९१०७); सुवर्णदुर्गपैकी महालांची (२९१०८); रामाजी पाथरवट याजकडून खरेदी केलेल्या तोफांच्या दगडी गोळ्यांची (२९१०९); तूपविक्रीबाबत (२९११०); केडंबेपैकी गोविंदराव याजकडील गावांची (२९१११); किरकोळ वस्तूंची (२९११२, २९१२९, २९१३२); छोटमल याजकडून जालना व कलमनुरी येथील स्वराज्य अंमल कसा कसा वसूल करावा यांसंबंधी तपशील देणारी, सु. १२२३ / इ. स. १८२२-१८२३ (२९११३); ऐवज दाखल केलेल्या लोकांची (२९११५); कोणास किती ऐवज दिला याच्या तपशिलाची (२९११७); जनकोजीकडील स्वारांची (२९१२०); नगरहवेलीपैकी ज्यांच्याकडे मोकासा ऐवज बाकी राहिला त्यांची (२९१२२); म्हसकोजी व चिमाजी यांच्याकडील कर्जाऊ ऐवजाबाबत (२९१२३); देवपुजेस लागणाऱ्या

रुमाल क्र. ६०, पुडके क्र. ५ चालू :

पत्रें चालू :

**गणेश अनंत देशमुख – चिटकोपंत जोशी :** मंगलाईचा अंगारा व लखोटा बरोबर घेऊन न गेल्याबद्दल राग व अंगाऱ्याची रवानगी (३२१७०).

**गणेश आप्पाजी – मल्हारपंत दाजी* :** हलाखीचे निवेदन (३२२७८).

**गोपाळ गणेश गोगटे – केशवपंत दादा* व मल्हारपंत भाऊ* :** पत्रद्वारे कृपा ठेवण्याची विनंती (३२२७९).

**गोपाळजी पाटील – बलवंतरावजी* :** आपल्याबद्दल लोक श्रीमंतास वाटेल ते लिहीत असल्याची तक्रार (३२१५७).

**गोपाळराव गोविंद गानू – आण्णा* :** प्रकृती ठीक असल्याबद्दल (३२२००).

**गोमाजी विठ्ठल – रखमाजी* :** जाल्हपूर व पडतूर येथील बाबती व अंबड येथील सरदेशमुखीची मामलत करण्याबाबत (३२१४५).

**गोविंद केशव – सुभेदार* :** वचनाप्रमाणे यशवंतराव बाप्पाजी यांचे संरक्षण करण्याची विनंती (३२१७१).

**गोविंद सखाराम दामले – गोविंदपंत जोशी :** ताईस सुरण रवाना (३२१३९).

**चिंतो गोपाळ अभ्यंकर – सखारामपंत बापू गोखले :** उसने घेतलेल्या ऐवजाच्या फेडीबद्दल निवेदन (३२२४९).

**जानकीबाई* – व्यंकटराव* :** वरचेवर पत्र पाठवून समाचार कळविण्याची विनंती (३२१९०).

**जिऊबा काळे – निंबाजी सुतार :** आप्पाजी नवले यास सत्वर पाठवून देण्याबद्दल (३२२४८).

**जिवाजी केशव – रावजी* :** आईस बरे वाटत नसल्याने येण्यास विलंब (३२२११).

**जिवाजीराम शेवडे – काशीपंत तात्या* :** हरि आप्पाजी याजकडे गहू रवाना (३२२३१).

**जीवनराव मोरेश्वर – मोरोपंत बाबा* :** चिटाच्या अंगरख्याची मागणी (३२१८८).

**त्रिंबकभट डोंगरे – बाळाजीपंत वैशंपायन :** ऐवजाची निकड न करण्याबाबत (३२१७६).

**त्रिंबकराव विष्णु – रामचंद्रपंत आबा* :** तात्या गयेस गेल्याबद्दल (३२१५९).

**दाजी नारायण सुपेकर – महिपतरावजी दादा चिटणीस :** पत्र पाठवून सांभाळ करण्याची विनंती (३२१६५).

**दादो कृष्ण – बापूजीपंत दादा गोडबोले :** केशवपंत आण्णा यांची सोय लावण्याची विनंती (३२१४२).

**दादो कृष्ण बेडेकर – भिकाजीपंत आप्पा* :** आपल्या बंधूचा मुलगा केशवपंत आण्णा याची सोय करण्याची विनंती (३२२३३).

पत्रें चालू :

**दामोदर रामचंद्र आपटे – नाना* :** सदैव लोभ ठेवण्याची विनंती (३२१८६).

**दिनकर नारायण करंदीकर – रामचंद्रपंत देवधर :** खाजगीचे झडतीचा अद्याप जाबसाल होत नसल्याबद्दल (३२१८९).

**धोंडो गोपाळ निंबाळकर – बलवंतरावजी* :** सौ. ठकाबाईची रवानगी (३२२२४).

**धोंडो गोविंद गोडबोले – भिकाजीपंत* :** गंगाधरपंत जोशी यांस दिलेला कोपरगांव येथील गोवर्धनधारी संस्थानच्या जवाहीर व रुप्याचे दागिने दिल्याबद्दल, भांड्याच्या खरेदीसाठीं सरकारांतून मंजूर झालेल्या ऐवजाबद्दल खुलासा (३२२३४).

**धोंडो दत्तात्रय – बाबूजी* :** काशी करून प्रयागावरून येत असल्याचे वर्तमान (३२१९५).

**धोंडो बल्लाळ चौघुले – केशवपंत* :** सनद पाठवून बाईच्या संस्थानाचे सरंक्षण करण्याची विनंती (३२१४९); **– महादजीपंत* :** मुलाच्या तापाबद्दल चौकशी (३२२६१).

**नरसो हणमंत – पांडुरंगभट तात्या* :** होन बदलून मिळण्याबाबत विचारणा (३२२१९).

**नंदराम जमादार – जिवा* व सावा* :** नवापूर व भामेर येथील मामलत प्रेषकाकडे येण्यासाठी अनंतराम यास घेऊन जाऊन तेथील गांवे लुटल्यास दोन हजार रु. देण्याची कबुली (३२१३८).

**नारायण कृष्ण – जनोबा परांजपे :** वरचेवर पत्र पाठविण्याची विनंती (३२१५८); **– मल्हारपंत* :** पत्र पाठवून वर्तमान कळविण्याची विनंती (३२२७४).

**नारायणगीर* – बलवंतराव मोरेश्वर :** रावजी कोतवालीचा ऐवज कृष्णगीरकडे देत नसल्याची तक्रार (३२२२७).

**नारो गोपाळ चाकणकर – दादा* :** भाजी व शेवग्याची फुले रवाना, धोंडोबा वाटेत लुटला गेल्याची बातमी (३२२२५).

**पांडुरंग आप्पाजी – नागोपंत मामा* :** नागोपंत यांस पीडा असल्याने त्यावर उपाय केल्याने सर्व ठीक होईल म्हणून (३२२४३).

**पांडुरंग खंडो – भगवंतराव* :** ज्या कामाच्या याद्या दिल्या आहेत ते काम सत्वर करण्याची विनंती (३२१६४).

**प्रल्हाद नारायण – दादासाहेब* :** कापलेले गवत नेण्यासाठीं ताबडतोब गाड्यांची मागणी (३२१६२).

**बापू ज्योतिषी – अंताजीपंत तात्या* :** मश्रुर मुलुख यास पकडून अटकेत ठेवल्याची बातमी व मोगलांच्या भेटीसंबंधी (३२२६८).

**बापूजी उद्धव – मल्हारपंत भडभडे :** त्रिंबकपंत ढवळे याच्या मुलाच्या लग्नाच्या तिथी निश्चयाबद्दल विचारणा (३२२२०); **– रामचंद्रपंत सरपोतदार :** त्रिंबक भास्कर ढवळे यांच्या मुलीच्या वराबाबत चौकशी (३२२५२).

**बापूजी बाबूराव – कृष्णाजीपंत नाना* :** जानकाऊ हिचा विठ्ठलपंत यांनी घेतलेला ऐवज परत देण्याची ताकीद करावी (३२१९१).

**बापूभट दंडवते – जगन्नाथपंत तात्या :** रंगवावयास पाठविलेली पागोटी चार दिवसांनी मिळणार असल्याबद्दल (३२१५०).

रुमाल क्र. ६०, पुडके क्र. ५ चालू :

पत्रें चालू :

**बाबू विठ्ठल – आक्का*** : मुलीस देवी आल्याबद्दल व गवताची रवानगी (३२२१२).

**बाबूराव कृष्ण फडके – धोंडोपंत*** : पत्र पाठवून सांभाळ करण्याची विनंती (३२१८१).

**बाबूराव जनार्दन गोडबोले – दिनकरपंत*** : पत्र पाठविण्याची विनंती (३२२०४).

**बाळंभट पुरंदरे – बलवंतरावजी*** : जकातीबाबतचा मजकूर कळविण्यासाठीं आपणाकडे आलो असता भेट न झाल्याचे निवेदन (३२१६१).

**बाळोजी पलांडे – मल्हारपंत भाऊ*** : हैबतराव व गोविंदपंत हे कामकाजासाठीं येतील तर त्यांना मदत करण्याबद्दल (३२२५४).

**बाळंभट खाडिलकर – बाळाजीपंत गोरे** : येतेवेळी पातळ घेऊन येण्याची विनंती (३२१९४).

**बाळाजी काशी – व्यंकटराव तिकोटकर** : देशमुखाचे ऐवज देण्याबद्दल सरदेशमुखांना पत्र देण्याबाबत (३२२८०).

**बाळाजी गोपाळ आगाशे – विठ्ठलपंत गोखले** : सकलादी कापड हवे असल्यास पाठवून देतो म्हणून (३२१७७); गोपाळपंत खंडकर व प्रेषक यांच्या कुणब्यास मारपीट करून कुणबी व भटजी यांच्याबद्दल दंडाचा ऐवज घेतला आहे तो परत देण्याची विनंती (३२२०७).

**बाळजी बाबाजी परांजपे – नारोपंत नाना चक्रदेव** : प्रेषकावर कृपा करण्याची विनंती (३२१९२).

**बाळाजी नारायण – वासुदेवपंत मामा*** : भीमाचार्य येथे नसल्याबद्दल (३२२१७).

**बाळाजी लक्ष्मण फडके – विसाजीपंत काळे** : पावसामुळे गाय मेल्याची बातमी (३२२०६).

**भवानी शंकर देसाई – जिवा* व साबा*** : जमादार सांगतील त्याप्रमाणे रायपूरचे काम करण्याची सूचना व आपल्या हिस्स्याच्या पैशाची मागणी (३२१४६).

**भास्कर बल्लाळ खांडेकर – वामनराव तात्या*** : वाड्याच्या चाललेल्या डागडुजीच्या कामांत गणपतीसाठीं करावयाच्या कोनाड्याबद्दल निवेदन, – भाबा बाम यांनी अन्नखर्चाकडे दिलेला ऐवज आणण्याबद्दल (३२२४५, ३२२४६).

**भिकाजी आनंद – महिपती रावजी*** : होनाऱ्या व्यवहारासंबंधी (३२२१८).

**भिकाजी बल्लाळ बारामतीकर – नरसिंगराव भाऊ*** : पत्र पाठवून सांभाळ करण्याची विनंती (३२२२१).

**भिकाजी शिवदेव – नागो रावजी*** : द्वारकू गड्याबरोबर खुर्दा रवाना (३२२४०); दागिन्याबाबतच्या ठरावाच्या कागदपत्रांच्या गहाळपणाबाबत (३२२६०); राजारामपंत आण्णा यांच्या प्रकृती अस्वास्थ्याबद्दल (३२२६२); – **नागोपंत दाजी*** : पैसे न पाठवल्यामुळे रागावू नये म्हणून विनंती (३२२५९).

पत्रें चालू :

**माधवराव जाधव – बाबासाहेब*** : बक्षिसाच्या ऐवजाची पोंच (३२१९९).

**माधवराव रघुनाथ धारुरकर – जगन्नाथपंत तात्या गोखले** : परळीस पुण्याची पत्रें आली असल्यास ती आणावयाकरितां जासूद पाठविला त्याबद्दल खुलासा (३२२३६).

**महादजी विष्णु – मल्हारपंत भाऊ*** : गोपाळजी भोसले याजकडील ताकीदपत्रांची मागणी व मोरो शामराज याजकडील ऐवजाची उगवणी (३२२५५).

**मुधोजी नाईक निंबाळकर – पंतप्रधान*** : प्रकृति ठीक नसल्याने वैद्य पाठविण्याबद्दल (३२१९६).

**मोरो गंगाधर – उमेद* व साबा*** : कराराप्रमाणे वागण्याची सूचना (३२१४८).

**मोरो बल्लाळ पळसुले – सितारामपंत*** : भाऊ नदवाडगी यांस लखोटा देण्याबाबत (३२२०३).

**मैराळ महादेव – आपूसाहेब*** : किरकोळ मजकूर (३२१७८).

**यशवंतराव पवार – नाना*** : आपल्या पत्रांच्या उत्तराची रवानगी (३२२३७).

**रघुनाथ महादेव – बलवंतराव मोरेश्वर** : हंगाम नसल्याने गवत पाठविता येत नाही (३२२१३).

**राघो महादेव लिमये – बलवंतराव थत्ते, विष्णुपंत साठचे वगैरे** : चिरंजिवाचा सांभाळ करण्याची विनंती (३२१९३).

**राघो मोरेश्वर – बाबा स्वामी*** : गोपाळ पाटील याने निफाड येथील पाटीलकीची गुमास्तगिरीची सनद शहाजी दाभाडे याचे नांवे आणल्याबद्दल व तेथे पाऊस नसल्याची बातमी (३२१४४).

**राघो बल्लाळ जोशी – राघोपंत*** : इंगळहलीकर यांच्याशी होत असलेल्या तंट्याबाबत (३२१७९).

**रामचंद्र कृष्णाजी – बलवंतरावजी जकाते** : वरचेवर वर्तमान कळविण्याची विनंती (३२१५२).

**रामचंद्र गणेश – बलवंतरावजी*** : नीळकंठराव प्रभू याजकडे असलेली लिंबोदरे येथील जकात प्रापकाकडे घेण्याबद्दल (३२१५३).

**रामचंद्र तमाजी – रामचंद्रपंत दादा सुभेदार** : गरुड व हनुमंताच्या मूर्तीची रवानगी (३२२०२).

**रामचंद्र नारायण आगाशे – विठ्ठलपंत दाजी गोखले** : कागदाची मागणी (३२२०८).

**रामचंद्र बल्लाळ गोगटे – कृष्णाजीपंत चोळकर** : हुमगांवी मीठ पाठविण्यासाठीं चिठ्ठीची मागणी (३२२१५).

**रामचंद्र व्यंकटेश – रुद्रगौडा पाटील** : पत्र पावताच गदगचे मुक्कामी निघून येण्याबद्दल (३२२२२).

**वेंकाजी बाळाजी – केशवरावजी*** : घोड्यांच्या लगामाची मागणी (३२२२३).

**व्यंकाजी बाळाजी – तमाजी*** : कर्जाऊ ऐवज व्याजासुद्धा बारगिराबरोबर पाठवून द्यावा म्हणून (३२२७१).

रुमाल क्र. ६०, पुडके क्र. ५ चालू :

पत्रें चालू :

**वासुदेवभट अभ्यंकर – गंगाधरभट गोखले** : जोगळेकर यांची संभावना (३२१९७).

**विठ्ठल नारायण – बाळाजीपंत भाऊ*** : दुभती गाय पाठविण्याबाबत (३२२६४).

**विठ्ठल रामचंद्र – भिकाजीपंत दादा*** : जाई वाणी हिचे काम करण्याची व मनांत रोष न ठेवण्याची विनंती (३२१८४).

**विनायक बल्लाळ दामले – आबाजीपंत दादा*** : केशवपंत भाटे यांच्याजवळ दिलेले पैसे रावजी देशमुख यांना देण्याबाबत (३२१४१).

**विष्णु महादेव – गंगाधर पंडित** : पाठविलेल्या गोविंदराव बल्लाळ यास एखाद्या ठिकाणी काम देण्याची विनंती (३२१८७).

**विसाजीराम बर्वे – बाबाजी*** : गणेश गोपाळ आले असल्याची बातमी (३२१५६).

**सदाशिव आप्पाजी - मनाजीपंत*** : नवरात्रासाठीं साहित्याची मागणी (३२२१४).

**सदाशिव गणेश – भिकाजीपंत दादा*** : तपकीर रवाना (३२१७४).

**सदाशिव चिमणाजी – बाबूराव रास** : शंभुभट यांस पाबत असलेल्या शिध्याबद्दल चौकशी व बोध्याकडील राऊतास ऐवज देण्याबाबत (३२१७२).

**सदाशिव जिवाजी – बापू वडजकर** : पैशाची अडचण असल्याचे निवेदन (३२२२८).

**हरजीराव मदने – बाबासाहेब*** : बक्षिसाच्या ऐवजाची पोंच (३२१९८).

**हरि माणकेश्वर – केशवपंत दादा *** : अंताजी माणकेश्वर यांची प्रापकावर असलेली बरात रवाना (३२१४३).

**हरि शिवराम चक्रदेव – नाना *** : दादा यांना पुत्र झाल्याची वार्ता, गहू, कागद पाठवून द्यावे म्हणून विनंती (३२१८०).

**होनाजी थोरात – मल्हारपंत भाऊ*** : रावजीस सांगून आपला बंदोबस्त करण्याची विनंती (३२२५७).

**[फक्त प्रेषकांचा नामोल्लेख असलेलीं]**

**आनंदराव* – (—)**: धोतरजोड्याची मागणी (३२२४७).

**आप्पाजी सिध्देश्वर – (—)** : जगन्नाथपंत डोंगरे याजकडील बैल व धामणे येथील गाडे आले असल्याबद्दल (३२२६५).

**केशव हरि गोखले – (—)** : सव्वा दहाशें रुपयाच्या तपशिलाच्या यादीची रवानगी, भास्करराव गणेश याजबद्दल ऐवजाची वरात तळेगांवावर घेतली असल्याबद्दल (३२२०९).

**गोपाळ* – (—)** : लग्न उरकून भेटीस येत असल्याबद्दल (३२२३९).

**धोंडो कृष्ण बेडेकर – (—)** : नानांनी आपली नेमणूक कारकून व शिलेदार यांचेकडे केली असल्याबद्दल (३२२५८).

पत्रें चालू :

**बलवंतराव मोरेश्वर – (—)** : भिकाजीपंत कानडे यांनी मल्हारजी शिंदे यास दिलेले पत्र देऊन तांदूळ विकून टाकण्याबाबत (३२२५६).

**बाळाजी कृष्ण बेहेरे – (—)** : सटवाजी घोलप यांचे सोमाजी जांभूळकर याजकडे येणे असलेल्या ऐवजाबाबत (३२१८२).

**बाळाजी रामकृष्ण – (—)** : शिधा वाटपाबद्दल निवेदन (३२२१०).

**भास्कर गोपाळ नेने, विठ्ठल गोपाळ – (—)** : कुसाजी पानसरे याच्या मुलाच्या लग्नासाठीं पैसे द्यावे किंवा नाही याची आज्ञा करण्याची विनंती (३२२४४).

**भास्कर* व विठ्ठल गोपाळ – (—)** : पंढरपूर येथील कार्तिकी यात्रेत पेंढाऱ्यांच्या गडबडीमुळे किती माल विकला गेला त्याबाबतचे निवेदन (३२२५०).

**भिकाजी शिवदेव – (—)**: बापूचा सर्व ऐवज जप्त करण्याबद्दल व पुरंदरे, शिंदे यांचेकडे येणे असलेल्या ऐवजाबद्दल खुलासा (३२२४१).

**महादाजी केशव दामले – (—)** : बेलमाची येथील मजकुराच्या लिहिलेल्या पत्रांची उत्तरे सत्वर पाठविण्याची विनंती (३२२३८); प्रेषकाची सोय करण्याची विनंती व गडकऱ्याकडून घ्यावयाच्या वसुलाबाबत विचारणा (३२१४०).

**महादजी निंबाजी – (—)** : स्वामींच्या भेटीची इच्छा (३२१७५).

**वासुदेव नारायण – (—)** : बाबासह भेटीस येत असल्याबाबत (३२२७७).

**विठोबा* – (—)** : तिमाजी जासूद यास नवाथे याजकडे तूर्त पाठवू नये म्हणून (३२२६३).

**विष्णु महादेव गोखले – (—)** : रावजीकडे खर्चाची व्यवस्था लवकर होणे अशक्य असल्याचे निवेदन (३२१६८).

**[फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेलीं]**

**(—) – बगाजीपंत भाऊ*** : प्रकृती ठीक नसल्याने प्रेषकास गंगारामपंत याना भेटता आले नाही तरी त्यांनाच पाठवून देण्याबद्दल (३२२७६); गोपाळ कृष्ण कानिटकर यांना वृद्धापकाळामुळे मुलीच्या कजियातून मुक्त करण्याची विनंती (३२२८१).

**(—) – बगाजीपंत* व मल्हारपंत भाऊ*** : यादीप्रमाणे राहिलेले पैसे येसू मोरे याजबरोबर पाठवून देण्याबद्दल (३२२६९).

**(—) – बलवंतराव मोरेश्वर जकाते** : यात्रेस जाण्यासाठीं घोडी शिबिका वगैरे सामान पाठविण्याची विनंती (३२२२९).

**(—) – भिकाजीपंत*** : हिवरेकराकडील बातमीची चौकशी (३२१७३).

**(—) – मल्हारपंत भाऊ*** : ज्या कामाकरितां आपण बोलाविले त्यासाठींच पुण्यास जात असल्याबद्दल (३२२४२); कलमदान व कागदांची मागणी (३२२७२).

रुमाल क्र. ६०, पुडके क्र. ५ चालू :

पत्रें चालू :

(—) – **रंगो विश्वनाथ :** चारण व मारण याजविषयीचा मजकूर विष्णु नारायण निवेदन करतील म्हणून (३२१६७).

(—) – **विसाजी कृष्ण साने, जनार्दन बल्लाळ :** किरकोळ मजकूर (३२२०५) (अपूर्ण व फाटके).

**[प्रेषक व प्रापकांचा उल्लेख नसलेलीं]**

शिवनेर येथील मामलत रामचंद्र नारायण याजकडून दूर करून अन्याबा जुन्नरकर याजकडे देण्याबाबत (३२१६०); खर्चाच्या अडचणीबद्दल निवेदन (३२१६३); चैनसुख व गिरिधारीलाल या शिंद्यांच्या वरातदाराच्या ऐवजाच्या निकालाची आज्ञा (३२१६९); आजारी घोडीच्या औषधासाठीं दारूची मागणी (३२२५३); पाऊस थांबल्यानंतर ताळेबंद घेऊन येत असल्याबद्दल (३२२७३).

पत्रें चालू :

* संपूर्ण नांवाचा उल्लेख नाही.

---

## रुमाल क्र. ६१ पुडके क्र. १ ते ३

रुमाल क्र. ६१, पुडके क्र. १ सु. स. ११२० – १२३६

का. सं. ९८ (३२२८२ – ३२३७९) इ. स. १७२० – १८३६

अभयपत्रें :

**बाजी राजे शिर्के – महादजी व बाळोजी पाटील भुकूमकर :** प्रापकाने प्रेषकास करून दिलेले भुकूम येथील पाटीलकीचे खरेदीपत्र बहिरजी नाईक करंजवणे याने (प्रेषकाडील वतन) मोकळे केल्यामुळे रद्द झाल्याबद्दल, सु. स. ११४६ / इ. स. १७४५-४६ (३२३०५). (तालीक)

**बाळाजी पंडित प्रधान – जयसिंग कासीद :** धर्मू माळीण हिने पितांबर ब्राह्मणाकडून घेतलेल्या कर्जासंबंधी उभयतांच्या तंट्यांत जयसिंग याचा संबंध नसल्याबद्दल, सु. स. ११४८ / इ. स. १७४७-४८ (३२३०४).

आज्ञापत्रें :

**चिमणाजी पंडित सचिव – रामजी बाळ महाला :** मायाजी घावडे पाटील कोंढेकर याच्या विनंतीवरून कोंढे येथील न्हावीपणाचे वतन बहाल केल्याबद्दल, सु. स. ११४० / इ. स. १७३९ - ४० (३२२८२) (नक्कल); – **बाजी रामोशी शिर्के पाटील भुकूमकर :** भुकूम येथील राणोजी मोझरे पाटील याच्या १६ व्या तक्षिमेच्या खरेदी-बद्दल जिल्ह्याकडे शेरणीबद्दल करार केलेला ऐवज सरकार जमा झाल्याबद्दल, २ रमजान, सु. ११४५/२८ सप्टेंबर १७४४ (३२३०६).

**पंतप्रधान** (बाळाजी बाजीराव प्रधान) – **आम्हणवाडीकर मोकदम :** पेडगांव येथील बेटांत तोफखान्यासाठी तोडलेली बाभळीची लाकडे आणण्यास आह्मणवाडी येथील गाडे पाठविण्याबद्दल, १७ साबान, सु. ११५७ / ६ मे १७५७ (३२३०७). (माधवराव बल्लाळ प्रधान) – **पुलजकर मोकदम :** बहिरजी पांढरे याजकडून दूर केलेल्या पुलज गांवावर नरसिंगराव उद्धव हुजूर पागा याची नेमणूक, सु. स. ११६२ / इ. स. १७६१-६२ (३२३०८).

**[फक्त प्रापकाचा नामोल्लेख असलेलें]**

(—) – **बळवंतराव गणपत :** तिळगूळ रवाना, २५ ज. खर, सु. ११६० / १३ फेब्रुवारी १७६० (३२३३१).

कतबे :

**पाडळेकर व कोलेकर पाटील मंडळी – रोटगे चौगुले महाळुंगेकर मंडळी :** शेट्ये चौगुले यांच्या नेमणूक असलेल्या शेतापैकी कामथे व कोलेकर वहिवाट करीत असलेले शेताचे भाग परत देण्याबद्दल कर्यात मावळमधील जमीनदार, मुजुमदार यांनी केलेल्या हुकुमाप्रमाणे वहिवाटीस घाटगे व चौगुले यांजकडे परत दिल्याबद्दल, चैत्र शु. ५, श. १६६७ / २७ मार्च १७४५ (३२३१२, ३२३६७).

कतबे चालू :

**मोझरे पाटील मंडळी भुकूमकर – बहिरजी व जानोजी नाईक करंजवणे देशमुख कर्यात मावळ :** शिर्के यास विकलेले भुकूम येथील पाटीलकीचे वतन स्वतःच्या इनामापैकी मोबदला शेत देऊन शिर्के याजकडून मोकळे केल्याच्या खुशीबद्दल स्वतःच्या वतनापैकी दोन शेते खुशीने बहाल केल्याबद्दल, पौष व. ३, श. १६८२ / २३ जानेवारी १७६१ (३२३११) (तालीक).

**विठोजी जाधव पाटील किरकटवाडीकर – राणूबाई व संभाजी जाधव मोकदम किरकटवाडीकर :** निरपराध असलेल्या कृष्णाजी जाधव याचा स्वतःच्या हातून खून झाल्याबद्दल भरपाई म्हणून राणूबाई व संभाजी जाधव यांचा किरकटवाडी येथील स्वतःच्या पाटिलकी हिश्यापैकी निम्मा हिस्सा बहाल केल्याबद्दल, आषाढ शु. ५, श. १६६२ / १८ जून १७४० (३२३१३) (तालीक).

**[फक्त प्रेषकांचा नामोल्लेख असलेलीं]**

**कान्होजी व महादजी पायगुडे देशमुख** – (—) : दीपाजी, बाजीराव वगैरे पायगुडे व दरेकर यांच्याशी आगलंबे येथील देशमुखी व पाटिलकी तंटा निवाड्याबद्दल गोताने ठरविलेल्या शेरणीस मान्यता, सु. स. ११३४ / इ. स. १७३३ - ३४ (३२२८३); मंत्राजी सोनजी पायगुडे याच्याशी मांडवी येथील देशमुखी व पाटिलकी हिश्याच्या तंट्याचा निवाडा करून मंत्राजी यास ६ वी तक्षीम देऊन वतनासंबंधी शेरणीचा ठरलेला मक्ता देण्याची कबुली, सु. स. ११४१ / इ. स. १७४०-४१ (३२३१०).

**दीपाजीराव पायगुडे** – (—) : शितोळे देशमुख पुणे यांच्याशी आगलंबे येथील देशमुखीच्या हक्काच्या तंटा निवाड्यास मान्यता, सु. स. ११३३ / इ. स. १७३२-३३ (३२२८५).

**सय्यद जलाल मुलाणा का पुणे** – (—) : कसबे पुणे येथील मुलाणकीच्या २ तक्षिमा इब्राहिम यास व मुलाणकीची तिसरी तक्षिम व पिराची मुजावरकी स्वतःकडे निवाड्याप्रमाणे आल्याचे सिद्ध करून देण्याबद्दल, २१ ज. खर, सु. ११४०/१४ सप्टेंबर १७३९ (३२२८७) (नक्कल).

रुमाल क्र. ६१, पुडके क्र. १ चालू :

कबुलात कतबे :

**लिंगाप्पा कानडे – सेनापती* :** स्वतःजवळ असलेल्या राजेखान शिपायाच्या तीन पत्रांबद्दल तिन्हाईतांच्या मते ठरलेल्या ऐवज देण्याची व पत्रे राजेखान यास देण्याची कबुली (३२३३०).

[फक्त प्रेषकाचा नामोल्लेख असलेला]

**दीपाजी रविराज पायगुडे देशमुख – (—) :** आगलंबे येथील स्वतःच्या जकातीच्या अंमलास व भरे येथील करंजवणे देशमुख याच्या जकातीस मालोजी जयसिंगराव व अडवोजी सितोळे यांनी उत्पन्न केलेल्या तंट्याच्या निवाड्यास सिरसोफळ येथे नेमून दिलेल्या पंचाच्या निवाड्यास मान्यता, सु. ११३३/इ. स. १७३२-३३ (३२२८४).

खरेदीपत्र :

**महादजी मोझरे पाटील भुकूमकर – बाजी राजे शिर्के :** सखोजी मोझरे पाटील याचा भुकूम येथील पाटिलकीचा हिस्सा दोघांत निम्मा निम्मा वाटून घेण्याबद्दल सरकारांतून झालेल्या हुकुमाप्रमाणे सखोजी याच्या हिश्याच्या निम्मा पाटिलकी वतनाचे, आश्विन व. ७, श. १६६५/२९ सप्टेंबर १७४३ (३२३१४) (तालीक).

गोतपत्रें :

**कर्यात मावळ येथील पंच – कान्होजी व महादजी पायगुडे देशमुख :** मंबाजी पायगुडे याच्याशी मांडवी येथील वतन तंट्यांत मंबाजी यास मांडवी येथील वतनाचा सहावा हिस्सा देण्याबद्दलचा निवाडा, पौष व. ४, श. १६६२/२६ डिसेंबर १७४० (३२३६४); **– मंबाजी पायगुडे :** कान्होजी व महादजी पायगुडे देशमुख याच्याशी असलेल्या मांडवी येथील देशमुखी व पाटिलकी वतन तंट्यांत मंबाजी यास मांडवी येथील वतनाचा सहावा हिस्सा देऊन निवाडा केल्याबद्दल, पौष व. ४, श. १६६२/२६ डिसेंबर १७४० (३२३६५).

जामीन कतबे :

**वाघोजी तावजी पाटील – धर्मपुरी येथील सुभेदार :** निंबाजी राणोजी रामोशी पांढरीची व सरकारची चाकरी करील म्हणून, ८ जिल्काद, फ. १२२८/१० सप्टेंबर १८१८ (३२३०१).

**सासवडकर मोकदम – आण्णासाहेब सुभेदार** (फलटण) : बापू सुमाना व कुसा मांग फंद-फितूर, चोरी-दरोडा वगैरे गुन्हा करणार नाही म्हणून, १० ज. खर, फ. १२२८/१७ एप्रिल १८१८ (३२३१७).

तकरीर :

**भिकाजी व मानाजी पायगुडे देशमुख कर्यात मावळ – (—) :** मांडवीकर, कुडिजेकर व आगलंबेकर यांच्यातील आगलंबे येथील देशमुखी व पाटिलकी वतनाच्या वाटणीसंबंधी व प्रेषक त्यांच्या वंशातीलच असल्याबद्दल, २७ सफर, सु. ११५७/२१ नोव्हेंबर १७५६ (३२३१८).

दस्तके :

**पंतप्रधान** (बाळाजी बाजीराव प्रधान) **– पुण्यापर्यंतचे चौकीदार जकातीचे कमाविसदार वगैरे :** कोकणांतून पुण्यास तांदूळ खरेदी करून आणण्यासाठी पिलखान्याकडील मल्हार प्रल्हाद कारकून यास जकातीचे, १० साबान, सु. ११५९/८ एप्रिल १७५९ (३२३१९).

दस्तके चालू :

**सुभा महाल रायगड – महाड ते पुण्यापर्यंतचे ठाणेदार, चौकीदार वगैरे :** सरकारी खजिना, दारू, कापड वगैरे सुवर्णदुर्ग येथे देऊन परतणाऱ्या रिकाम्या बैलांसाठी रहदारीचे, ७ ज. वल, सु. ११५६/ ८ फेब्रुवारी १७५६ (३२३२०).

निवाडपत्रे :

**बाजी, मानाजी व केशव कुडिजेकर पायगुडे देशमुख – गोधूबाई व द्वारकोजी पायगुडे :** वतनी गांवापैकी खानापूर जवळकराचे हे गांव व इनाम, हक्क, मानपान वगैरेचा हिस्सा बहाल केल्याबद्दल, कार्तिक व. ४, श. १६७२/६ नोव्हेंबर १७५० (३२३२१-३२३२३).

[प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख नसलेलीं]

जिवाजी व संताजी पाटील खुटवड याचा उदाजी पाटील खुटवड याच्याशी असलेल्या निगडे येथील पाटिलकी तंट्याचा तर्फ गुंजन-मावळमधील जमीनदार व सदाशिव त्र्यंबक मुजुमदार यांच्या विद्यमाने झालेल्या निवाड्यांत साक्षीपुराव्याअभावी उदाजी पाटील खुटवड खोटा ठरल्याबद्दलचे, अधिक आषाढ शु. १३, श. १६६६/११ जून १७४४ (३२३२४); मांडवी, कुडिजे व आगलंबे येथील देशमुखी व पाटिलकीच्या तक्षिमांचे, सु. ११३४/इ. स. १७३३-३४ (३२२८८).

पत्रें :

**कान्होजी व महादजी नाईक पायगुडे – रामचंद्रपंत देशपांडे कर्यात मावळ :** आगलंबे येथील देशमुखी व पाटिलकीच्या हिश्याच्या तंटा निवाड्यांत नेमलेल्या शेरणीच्या ऐवजासाठी प्रापकास जामीन ठेवल्या-बद्दल, सु. ११३४/इ. स. १७३३-३४ (३२२९१); **– धोंडोपंत* व रामचंद्रपंत देशपांडे :** आगलंबे येथील देशमुखी व पाटिलकीच्या हिश्याच्या निवाड्याबद्दल सरकारांत भरावयाच्या ठरलेल्या शेरणीच्या ऐवजाबद्दल प्रापकास जामीन ठेवल्याबद्दल, २ जिल्हेज, सु. ११३४/ २५ एप्रिल १७३४ (३२२९५).

**कृष्णाजी शिंदे शिलेदार – बाबासाहेब* :** रोजमुऱ्याची पोंच, फाल्गुन व. १२, श. १७३३/१० मार्च १८१२ (३२२८६).

**गोविंद सामराज सुभा प्रांत मावळ – गंगाधर आप्पाजी हवालदार व कारकून कर्यात मावळ :** राणोजी मोझरे पाटील यांनी भुकूम येथील पाटिलकी वतन, हक्क वगैरेंचा १६ वा हिस्सा बाजी रामोजी शिर्के यास विकल्यामुळे तेथील १६ व्या तक्षिमेचा सर्व अंमल बाजी शिर्के याज-कडे देण्याबद्दल पंत सचिव यांची सनद, १ रमजान, सु. ११४६ / १६ सप्टेंबर १७४५ (३२३६८) (तालीक).

**चिमणाजी नारायण सचिव – कर्यात मावळमधील जमीनदार :** मायाजी धावडे पाटील कोंढेकर याच्या विनंतीवरून कोंढे येथील न्हावीपणाच्या वतनावर रामजी बाळ महाला याची नेमणूक केल्या-बद्दल, १७ सवाल, सु. ११४०/६ जानेवारी १७४० (३२२८९) (नक्कल).

**चिमणाजी बल्लाळ – थाळनेरकर जमीनदार :** थाळनेरपैकी घास-दाण्याचा ऐवज पाठविण्याची आज्ञा, १३ रमजान, सु. ११३९/ १४ डिसेंबर १७३८ (३२२९४); **– नाना* :** गोमाजी उंदरे यास ऐवज देण्याची सूचना, १५ सफर, सु. ११३९ / १३ मे १७३९ (३२३००); बुधसिंग यास ऐवज देण्याची सूचना, ११ सफर, सु. ११३८ / २० मे १७३८ (३२३५५); **– बाबराव राम फडणीस :**

रुमाल क्र. ६१, पुडके क्र. १ चालू :

पत्रें चालू :

**जगन्नाथ चोपदार याजकडून घेतलेल्या ऐवजाची वरात बाबूराव याजवर केल्यामुळे तो ऐवज बाळाजी दादाजी याच्या स्वाधीन करण्याची सूचना,** २३ जिल्काद, सु. ११३८/४ मार्च १७३८ (३२३३४).

**नारायण व्यंकटराव – नरसो शेलार :** बालेशहा जमातदार याच्या लोकांपैकी तिघेजण प्रापकाकडे रवाना व त्यांच्या वेतनाबद्दल सूचना, ३ ज. वल, सु. ११५५/१५ फेब्रुवारी १७५५ (३२३२६).

**नारो शंकर सचिव – कर्यात मावळ येथील देशमुख :** सितोळे देशमुख यांच्याशी कर्यात मावळ येथील जकातीच्या विभागाच्या तंटा निवाड्यासाठी शिरसोफा येथे जाण्याबद्दल आज्ञा, ११ र. खर, सु. ११३३/२० सप्टेंबर १७३२ (३२२९३).

**बळवंतराव* – विश्वनाथभट अष्टेकर :** पूर्वी श्रीच्या पूजेअर्चेस व अन्नछत्रास नेमलेला ऐवज पुरत नसल्यामुळे चालू वर्षी जास्त नेमणूक केल्याबद्दल, १४ ज. खर, सु. ११४६/४ जुलै १७४५ (३२३३३) (नक्कल).

**बाजी राजे शिर्के पाटील भुकूमकर – महादजी व बाळोजी मोझरे मोकदम भुकूमकर :** खखुशीने विकलेले भुकूम येथील पाटिलकीचे वतन बहिरजी नाईक करंजवणे देशमुख यांनी मोकळे करून घेतल्यामुळे वतनावर स्वतःचा हक्क नसल्याचा खुलासा, सु. ११४६ / इ. स. १७४५-४६ (३२३६६) (तालीक).

**बाजीराव बल्लाळ प्रधान – शिवशेट मधवे :** मुलोजी ढमढेरे यास १०० रु. चे कापड देण्याबद्दल सूचना, १७ र. वल, सु. ११३१ / १९ सप्टेंबर १७३० (३२२९७).

**बाबुराव कृष्ण – नाना* :** तिळगूळ रवाना, २६ सवाल, सु. ११७३/२० जानेवारी १७७३ (३२३३६).

**बाळाजी बाजीराव प्रधान – गोविंद सखदेव :** जाबसालास मुदत दिल्यामुळे महिनाभर सावनूरकरांच्या सरहद्दीत उपद्रव न देण्याबद्दल आज्ञा, २८ मोहरम, सु. ११५९/२ ऑक्टोबर १७५८ (३२३२७); **–हणमंतराव देसाई, कौतुलगोकर :** सरकारांत भरती करण्यासाठी लोकांची मागणी (३२३२८); **– धनशेट करंजे कमाविसदार जकात प्रांत पुणे जुन्नर :** नवीन सरकारी कोठीकडे कोकणांतून मिठाच्या ४ खेपा २०० बैल देशावर आणतील त्यांच्या जकातीचा ऐवज चालू सालच्या जकातीच्या इजाऱ्यांत मजुरा पडेल म्हणून सूचना, सु. स. ११४५/ इ. स. १७४४-४५ (३२३४१); **– कृष्णाजी त्रिंबक :** कऱ्हाड येथील रसदेपैकी विनायकभट ढेकणे याचेतर्फे ऐवज सरकारजमा, २१ र. खर, सु. ११५८/२ जानेवारी १७५८ (३२३५८); येसाजी विश्वनाथ माजी कमाविसदार प्रांत कऱ्हाड याच्या वेतनाचा ऐवज दादो महादेव याच्या हिशेबी खर्च पडत असून ते वेतन निम्मे केल्याबद्दल, ११ ज. खर, सु. ११५८/२० फेब्रुवारी १७५८ (३२३५९); गोविंद मोरेश्वर याजकडील बेगमीस प्रांत कऱ्हाडपैकी ऐवज देण्याची आज्ञा, २६ रमजान, सु. ११५८/ १४ जून १७५७ (३२३६१); **–हरि राम :** कृष्णाजी त्रिंबक अमीन प्रांत कऱ्हाड याजकडे कामकाजास जरूर असलेले स्वार नेमून देण्याची आज्ञा, ७ ज. वल, सु. ११५८/१८ जानेवारी १७५८ (३२३६०).

पत्रें चालू :

**माणिकभाई बारगीर – बाबासाहेब* :** रोजमुऱ्याची पोंच, फाल्गुन व. १०, श. १७३३ / ८ मार्च १८१२ (३२३९९).

**रघुनाथ बाजीराव – अंताजी माणकेश्वर :** संस्थान बंगाल येथील मामलतीच्या ऐवजाच्या हवाल्यापैकी गोपाळराव गणेश याजकडील पागेकडे नालबंदीसाठी ऐवज देण्याची आज्ञा, २६ जिल्काद, सु. ११५९/ १ ऑगस्ट १७५८ (३२३३८, ३२३३९).

**राजाराम निलोजी हांडे देशमुख सरकार जुन्नर – तात्या भुते कुळकर्णी** (आंबेगव्हाण) **:** आंबेगव्हाण येथील घेतलेल्या हवाल्याचा ऐवज पाठविण्याची विनंती व मूनपाले येथील बाकीचा ऐवज घेऊन येण्याबद्दल विनंती, पौष शु. ९, श. १७५६/८ जानेवारी १८३५ (३२२९२).

**रामराव कृपाराम – बाबासाहेब* :** चाकरीच्या रोजमुऱ्याची पोंच, फाल्गुन व. ११, श. १७३३ / ९ मार्च १८१२ (३२३०९).

**लक्ष्मण सदाशिव देशमुख** (कर्यात इटे) **– आबाजी बाबाजी पाटील नेवरीकर :** नेवरी येथे स्वतःच्या हक्काच्या जमिनीपैकी कौलाने लावून दिलेल्या जमिनीचा अंमल सुरळित करण्याबद्दल, २ सवाल, सु. १२३६/ २१ जानेवारी १८३६ (३२२९०).

**विसावा नाईक गोडसे – रामचंद्रपंत* :** सचिव यांनी बगोबा नाईक यास दिलेल्या ऐवजापैकी बाकी राहिलेल्या ऐवजाची पोंच, २७ मोहरम, सु. ११३५ / १८ जून १७३४ (३२२९६).

**सदोबा** (सदाशिव चिमणाजी) **– नाना** (बाळाजी बाजीराव) **:** (खालील शिलेदारांना नालबंदी ऐवज देण्याची सूचना) **– मणिराम करोल नगरकर,** इ. स. १७४०–६१ (३२३४२); मसणोजी देवकांते, ३ मोहरम, सु. ११५१/२२ नोव्हेंबर १७५० (३२३४३); बाजोजी घाटगे, २३ जिल्हेज, सु. ११५१ / १२ नोव्हेंबर १७५० (३२३४४); चंद्रभान महाडिक, २१ जिल्हेज, सु. ११५१ / १० नोव्हेंबर १७५० (३२३४५).

[फक्त प्रेषकांचा नामोल्लेख असलेलीं]

**त्रिंबक जगन्नाथ – (—) :** हणमंतराव निंबाळकर व लक्ष्मण खंडागळे यांचा धारूर किल्याजवळ मुक्काम असून सदाशिव सुपेकर यास त्याच्या बंधूप्रमाणे तुकोजी चव्हाण याच्या विद्यमाने पालखी व वस्त्रे देऊन समजूत केल्याबद्दल खुलासा, २८ ज. खर, सु. ११६०/ १६ फेब्रुवारी १७६० (३२३२९).

**शंकराजी तगटकर · (—) :** श्रीगणपतीच्या मखरासाठी तयार केलेला वर्ख जिन्नसामध्ये गेल्यामुळे वर्ख तयार करण्यासाठी ऐवज पाठविण्याबद्दल (३२३७०).

[फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेलीं]

**(—) – आप्पा** (चिमणाजी बल्लाळ) **:** महादजीपंत, शिऊबाई यांना गाड्या पाठविण्याबद्दल, इ. स. १७२०–४० (३२२९८).

**(—) – कृष्णाजी मोरेश्वर व बाळाजी कृष्ण :** मल्हारजी होळकर याच्या कोठावळ्याकडे सरकारी दस्तक असताना कल्याण येथील जकातदारांनी घेतलेला जकातीचा ऐवज त्यास परत देण्याची ताकीद, सु. स. ११५७ / इ. स. १७५६-५७ (३२३७३).

रुमाल क्र. ६१, पुडके क्र. १ चालू :

पत्रें चालू :

(—) – **केशवभट कर्वे :** (करार केलेल्या कर्जाऊ ऐवजापैकी खालील लोकांना ऐवज देण्याची आज्ञा) सिदोजी भापकर, ३ र. खर, सु. ११५७/२५ डिसेंबर १७५६ (३२३३७); इशम, १६ र. खर, सु. ११५७/७ जानेवारी १७५७ (३२३४०); लक्ष्मणजी आटोळे, ३ र. खर, सु. ११५७/२५ डिसेंबर १७५६ (३२३४६); अवधूतराव कविश्वर यास स्वारीखर्चास, १४ र. वल, सु. ११५७/७ डिसेंबर १७५६ (३२३४७); शहाजी व रघुनाथ भोसले, ७ र. वल, सु. ११५७/३० नोव्हेंबर १७५६ (३२३४८); बहिरजी पवार हवालदार यास नालबंदीचा, १५ र. वल, सु. ११५७/८ डिसेंबर १७५६ (३२३४९); रेखा कलावंतीण हिला रोजमुऱ्याचा, १३ र. वल, सु. ११५७/६ डिसेंबर १७५६ (३२३५०); जावजी गौळी, ६ र. वल, सु. ११५७/२९ नोव्हेंबर १७५६ (३२३५१); गोविंदराम दुलभराम मेहता, चंदामल वकील सिंदकर, ६ र. वल, सु. ११५७/२९ नोव्हेंबर १७५६ (३२३५७).

(—) – **मेघःशाम व गोपाळराव बापूजी :** बुंदेलखंड वगैरे महालांवरील करार केलेल्या कर्जपट्टीच्या ऐवजापैकी केशवभट कर्वे यास रद्द कर्जासाठी ऐवज देण्याबद्दल, १५ जिल्काद, सु. ११५७/१२ ऑगस्ट १७५६ (३२३७१).

(—) – **येसाजी नाईक बोर्डे :** सोळ्याच्या कामावर गेलेल्या आरमारी लाकापैकी सुम्याकडे आलेल्या लोकांना अडसेरी देऊन कारखान्यावर पाठविल्याबद्दल व हजेरीप्रमाणे अडसेरी देण्याबद्दल, ३ मोहरम, सु. ११६०/२७ ऑगस्ट १७५९ (३२३५२).

(—) – **रत्नाकर राजाराम :** बालाघाट प्रांती चारणीस गेलेल्या पागांच्या कारकुनीवर बाळाजी चिंतामण याची नेमणूक, १४ साबान, सु. ११७३/१० नोव्हेंबर १७७२ (३२३३५) (नक्कल).

(—) – **विनायकराव* :** सातारा जिल्ह्यांतील देवस्थान व वर्षासनाच्या १० रु. च्या आतील व बाहेरील नेमणुकांच्या कागदपत्रांची मागणी (३२३५६).

(—) – **विसाजी बाबाजी कमाविसदार, जकात प्रांत पुणे व जुन्नर :** मल्हारजी होळकरकडील कोठावळ्याजवळ सरकारी दस्तक असून घेतलेला जकातीचा ऐवज त्यास परत देण्याची ताकीद, सु. ११५७/इ. स. १७५६-५७ (३२३७२).

(—) – **हरि राम :** तह झालेल्या ठिकाणी उपसर्ग न करण्याबद्दल सिरहद्दीकरांनी केलेली बोलाचाली, २२ र. खर, सु. ११४७/२२ एप्रिल १७४७ (३२३२५).

**[प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख नसलेलीं]**

सोनगिरपैकी तीनशे तेरा रुपयांचे बैल तोफखान्याकडे पोहोचल्याबद्दल, ६ र. वल, सु. ११५८/१९ नोव्हेंबर १७५७ (३२३१५); नारायणराव कृष्ण पारसनीस याजकडे दप्तरासाठी बेतून द्यावयाच्या रुमालांच्या कापडाची पोंच, सु. ११६८/इ. स. १७६७-६८ (३२३१६); शिवाजी घाटगे शिलेदार याजकडील कारकुनास नालबंदीचा ऐवज देण्याची विनंती, ११ मोहरम, सु. ११५१/३० नोव्हेंबर १७५० (३२३३२); नारो बाबाजी याजकडे पारनेरपैकी करार केलेले गाडे मना करून गाड्याबद्दल त्याजकडे ऐवज करार केल्याबद्दल व ऐवज घेऊन गाड्याचा तगादा न करण्याबद्दल रघुनाथपंत याचे नांवे पत्र याप्रमाणे पुण्यास लिहून दिलेली पत्रें, सफर, सु. ११४४/मार्च-एप्रिल १७४४ (३२३५४); तुळाजी घाटगे याजकडील कारकुनास नालबंदीचा ऐवज देण्याची विनंती, २४ जिल्हेज, सु. ११५१/१३ नोव्हेंबर १७५० (३२३६२); जगन्नाथभट दामले याच्या कोकणांतून खरेदी करून आणलेल्या तांदळास जकातीचा उपद्रव न देण्याच्या दस्तकाची पोंच, २४ र. वल, सु. ११५८/७ डिसेंबर १७५७ (३२३७४); लवजी बोधे याजकडील शिलेदारांच्या कारकुनांना नालबंदीचा ऐवज देण्याची आज्ञा, ४ मोहरम, सु. ११५१/२३ नोव्हेंबर १७५० (३२३७६).

यादी :

मल्हारजी होळकर याच्या कसबे मांडवगण–कात्राबाद येथील पाटिलकीस उपद्रव दिल्याबद्दल हुजूर तलब केलेल्या लोकांची, १४ रमजान, सु. ११५८/२२ मे १७५८ (३२३६९).

रसानगी यादी :

सनदेप्रमाणे सिरोंज येथील नेमणुकीचा ऐवज महंत कलदासजी मुक्काम सिरोंज यास देण्याबद्दल, २३ ज. खर, सु. ११५८/४ मार्च १७५८ (३२३७५).

राजपत्र :

**जिजाबाईसाहेब (भोसले) – बळवंतराव गणपत :** तिळगूळ रवाना, २६ ज. वल, सु. ११६०/१६ जानेवारी १७६० (३२३५३).

राजीनामा :

**हंसाजी व संताजी कापरे व आगलंबेकर रयत – (—) :** आगळंबे येथील मिरासीचे घर व जागेच्या तंट्याच्या निवाड्यास मान्यता, ४ रजब, सु. ११२३/३० मार्च १७२३ (३२३०२).

वतनपत्रें :

**कर्यात मावळ येथील जमीनदार – राम महाला तावरे :** ३ रजब, सु. ११५५/१६ एप्रिल १७५५ (३२३७७).

**कोंढे येथील रयत – राम महाला न्हावी :** मायाजी पाटील धावडे याच्या विनंतीनुसार कोंढे येथील न्हावीपणाचे, आश्विन व. ३, श. १६५५/१४ ऑक्टोबर १७३३ (३२३०३) (नक्कल).

वाटणीपत्र :

किरकटवाडी येथील मोकदमी वतनाचे, इनामाचे वगैरेचे, मार्गशीर्ष शु. १०, श. १६८०/९ डिसेंबर १७५८ (३२३६३).

समापत्र :

**चाहूजी व सटवाजी मोझरे पाटील भुकूमकर – खंडोजी मोझरे पाटील भुकूमकर :** बाळोजी मोझरे पाटील याच्याशी प्रापकाच्या असलेल्या भुकूम येथील पाटिलकी हिश्याच्या तंट्यांत प्रापकास पाठिंबा, पौष व. ३, श. १६८२/२३ जानेवारी १७६१ (३२३७९) (तालीक).

**रुमाल क्र. ६१, पुडके क्र. १ चालू :**

**सवाद रोखा :**

**विठोजी बोडके पाटील गहुजेकर – खंडोजी पायगुडे पाटील कुडिजेकर :** कृष्णाजी बोडके पाटील व दांगट गहुजेकर थळकरी यांचा शेताचा तंटा असून त्यासंबंधी स्वतःच्या वतीने प्रापकास जामीन ठेवल्याबद्दल, माघ व. ३, श. १६६२/२३ जानेवारी १७४१ (३२३७८).

* संपूर्ण नांवाचा उल्लेख नाही.

---

**रुमाल क्र. ६१ पुडके क्र. २** **सु. स. ११५८ – १२०८**
**का. सं. १२५ (३२३८० – ३२५०४)** **इ. स. १७५९ – १८०७**

**आज्ञापत्रें :**

**पंतप्रधान** (माधवराव बल्लाळ) – **नागोजी शिंदे :** प्रापकाकडील मौजे पेठ येथील पाटीलकीचे हक्कापैकीं गोविंदराव आईतोळे यास चंदी देण्याबद्दल, २१ जिल्काद, सु. ११६७/२१ एप्रिल १७६७ (३२३८१) (नक्कल).

**पंतप्रधान** (बाजीराव रघुनाथ) – **माणिकजी* :** प्रापकाकडील बालेखान याने गैरवर्तणूक करून रयतेस उपद्रव दिल्याने मौजे वडगावपीर येथील दरोबस्त अंमल प्रापकाकडून दूर करून पांडुरंग लक्ष्मण याजकडे सांगितला असल्याचे, सु. १२०८/इ. स. १८०७-०८ (३२३८२).

**इनामपत्र :**

**बाईसाहेब* – नारायण दीक्षित :** मौजे येरोले व भोसे येथील जमीन प्रापकास इनाम दिल्याचे, १५ र. वल, सु. ११७५/१६ मे १७७५ (३२४६१) (तालीक).

**कतबा :**

होळकरांनी निरोप दिल्याखेरीज किंवा प्रापकाची चिठ्ठी आल्याखेरीज उठून येणार नाही म्हणून मुजफरखान याचे मुलापासून लिहून घेतलेला, २० सवाल, सु. ११६८/१० मार्च १७६८ (३२४००); पूर्वीच्या मुलाण्याने आपल्या मुलीस आपले मुलाण्याचे वतन वंशपरंपरा दिले असल्याबद्दल, २७ साबान, सु. ११७३/२३ नोव्हेंबर १७७२ (३२४९३) (नक्कल); मानसिंग व केशवराव याचे कर्ज मानाजी, नारोजी व कान्होजी पायगुडे या तिघां भावांनी वाटून देण्याबद्दल, सु. ११६७/इ. स. १७६६-६७ (३२४९५).

**जामीन कतबे :**

**खंडेराव भिसे पाटील – पंतप्रधान** (माधवराव नारायण) : बहिरजी व पिराजी आणि मानाजी काळे यांनी मोरो बाबूराव याजकडे चाकरीस राहू नये व सरकारच्या आज्ञेप्रमाणे वागावे म्हणून त्यांच्यातर्फे जामीन, आषाढ व. ४, श. १७००/१३ जुलै १७७८ (३२३९०).

**व्यंकू कडारे व वेंकु पुल्या** – (—) : नीलम घड्याळची यास जामीन असल्याचा, ७ साबान, सु. ११६९/१७ डिसेंबर १७६८ (३२४५८).



**पत्रें :**

**कचो रघुनाथ – पंतप्रधान** (माधवराव बल्लाळ) : बाकी माफ केल्याने दरबार खर्चाचा रोखा चिंतामण लक्ष्मण याने घेतला आहे हे शामराव चिंतामण यास ठाऊक आहे हे खरे करून देऊ खरे न केल्यास सरकारचे गुन्हेगार ठरू यासंबंधी निवेदन, भाद्र. शु. ६, श. १६८९/३० ऑगस्ट १७६७ (३२४१२).

**काशी बल्लाळ - नाना* :** कोंडभट फडके याचे मुलास किल्ले त्रिंबक येथे अटकेत ठेवल्याबद्दल, २५ मोहरम, सु. ११७०/२२ मे १७७० (३२४६३).

**कुवरजी रुद्र व हरि कृष्ण – पंतप्रधान** (माधवराव बल्लाळ) : महालचा रसदभरणा करण्यासाठीं कृष्णाजी रुद्र व जगन्नाथ गंगाधर यांना पाठविले असल्याचे, ८ ज. वल, सु. ११७०/९ सप्टेंबर १७६९ (३२४०६).

**कृष्णराव बल्लाळ – पांडुरंगपंत आण्णा* :** तिळगूळ रवाना, ३ ज. खर, सु. ११९३/१६ जानेवारी १७९३ (३२४३९).

**कृष्णाजी माधवराव दिा पंतप्रधान** (माधवराव बल्लाळ) – **मोकदम मौजे आंबेगव्हाण :** आंबेगव्हाणपैकी येणे असलेल्या सालमजकुरच्या ऐवजा ऐवजी तूर्त ५०० रुपये पुण्यास पाठवणे व गेल्या वर्षीचा हिशेब घेऊन हुजूर येण्याची आज्ञा, ३ सफर, सु. ११७०/२९ मे १७७० (३२४९६).

**गोविंद व मनोहर गोसावी – पंतप्रधान** (माधवराव बल्लाळ) : वरुड येथील बाबती अंमलाच्या हिस्से वाटपासंबंधीचे निवेदन, ५ रमजान, सु. ११७१/२३ डिसेंबर १७७० (३२४२२).

**गोविंदपंत देवधर – रामचंद्र हरि देवधर :** तोफखान्याकडील महालचे ताळेबंद मखलाशीस तयार झाले असल्यास सत्वर पाठविण्याविषयी, विजयदुर्ग येथील सन १७६८ चा बेहडा रवाना करावा व कोकणचे कमी जास्तीचे तेरीज रवाना करण्याबाबत, ३ रमजान, सु. ११७२/१० डिसेंबर १७७१ (३२४३१).

**तुलासेठ जेधे – पंतप्रधान** (माधवराव बल्लाळ) : नारोजी रुकारी व त्याची स्त्री सदाशिवशेठ वीरकर याचे घरी लग्नास आली असता तिला सिदाप्पा शेठ वीरकर याचे घरी अटक केल्यावरून हजर जामीन मागितला त्यावरून प्रेषक हजर जामीन झाला असल्याबद्दल, ज्येष्ठ व. २, श. १६९०/२ जून १७६८ (३२४९४).

**दुलबशेठ गोविंदजी – घनःशामबाबा मंत्री :** पंतप्रधान यांचे सरकारची वरात आम्हांस रदकर्जाचे ऐवजी दिली तो ऐवज भरून पावलो, पौष शु. ७, श. १६८५/१० जानेवारी १७६४ (३२४८९).

**धोंडो महादेव – पंतप्रधान** (माधवराव बल्लाळ) : रुकनुद्दौला याजकडे सरकारचा ऐवज येणे त्यापैकीं कांही आलेला ऐवज पुण्यास पावता करण्याबद्दल आज्ञा असता त्यास अंतूर येथील मक्ता करार करून घेतला असल्याने हुतेबंदीप्रमाणें ऐवज पावता करतील म्हणून, २५ र. खर, सु. ११७०/२८ ऑगस्ट १७६९ (३२४९७).

**नारो कृष्ण – गणेशपंत* :** पोा उत्राण येथील बाबती महालचा ऐवज जमा केल्यासंबंधी, १९ जिल्हेज, सु. ११६५/२० जून १७६४ (३२४१४).

**नारो कृष्ण जोशी – नाना* :** प्रकृती ठीक नसल्याबाबत, २७ सवाल, सु. ११७०/२४ फेब्रुवारी १७७० (३२४१७).

पत्रें चालू :

**रामाजी रायाजी – माधवराव*** : दाजीपंत यांनी प्रेषकाच्या ऐवजाची वरात प्रापकावर केली तो ऐवज प्रापकाकडून प्रेषकास मिळाल्याविषयी, ५ ज. थल, सु ११५०/२६ डिसेंबर १७५९ (३२४४०).

**सदाशिव चिमणाजी – भिकाजी बाबूराव** : गिरिधर लालचंद व हिंमतसिंग चौधरी यांजकडे असलेला देऊळखेडे येथील नेमणुकीचा वसूल गिरासी याचे उपद्रवामुळें येत नसल्याने प.वगी हा गांव त्यांना नेमून दिल्याबद्दल, सु. ११६१/इ. स. १७६०-६१ (३२४३०).

**साबाजी बाजी घाटगे – सखारामपंत*** : कृपालोभाची विनंती. १९ सफर, सु. ११६२/१९ सप्टेंबर १७६१ (३२४३८).

**हरि गोविंद देशमुख – राघोपंत भांदे** : कडयई येथील हिशेबासंबंधी (३२५०२).

[फक्त प्रेषकांचा नामोल्लेख असलेलीं]

**रामचंद्र नारायण – (—)** : मोरो विनायक याजकडून दिलेला ऐवज खर्च झाला असल्याचे, नारायण रावसाहेब याचे स्वारीचा कारखान्याचा खर्च मागाहून पाठवीत असल्याचे, १५ रमजान, सु. ११६९/२४ जानेवारी १७६९ (३२४५६).

**रामचंद्र नारायण गोरे – ( –)** : पत्र व वेहड्यांची पोंच. सगुणाबाई पुण्यास येत असल्यासंबंधी १३ सवाल, सु. ११६९/२१ फेब्रुवारी १७६९ (३२४७४).

[फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेलीं]

**(—) – धोंडोपंत *** : विजयदुर्ग येथील वहिवाटीसंबंधीचा ताळेबंद दप्तरी घेऊन येण्यासंबंधी (३२४४६).

**(—) – बाबूराव माणकेश्वर** : थटीकडे गाईस हरभरे, बाजरी, पीठ व गवत देण्यासंबंधी, ११ ज. खर, सु. ११७२ / २१ सप्टेंबर १७७१ (३२४६९); रोषणाई खर्चासाठीं तेल देण्यासंबंधी, १० ज. खर, सु. ११७२/२० सप्टेंबर १७७१ (३२४८२); ११ ज. खर, सु. ११७२ / २१ सप्टेंबर १७७१ (३२४८३); घोड्यांस चंदी देण्याबद्दल, १० ज. खर, सु. ११७२/२० सप्टेंबर १७७१ (३२४८४).

**(—) – बाळाजी जनार्दन** : जोत्याजी वाघ यास नालबंदीचा ऐवज देण्याबाबत, २५ जिल्हेज, सु. ११६९/३ मे १७६९ (३२३८५); किल्ले वंदनगड येथील नक्त ऐवजाच्या मखलाशीची याद पाठविली असून त्याप्रमाणें जमाखर्च करून तो ऐवज चार महिन्याच्या मुदतीनें पा'त करण्याबाबत, १० रजब, सु. ११६७ / १३ डिसेंबर १७६६ (३२३८८); संकोजी मुळे यास नालबंदीचा ऐवज देण्याबद्दल, ६ मोहरम, सु. ११७० / ३ मे १७७० (३२३८९); बनेश्वरच्या बागेत बी पेरण्यासाठीं हरि बाजाजी यास ऐवज देण्याविषयीं, ८ ज. खर, सु. ११६७ / ११ नोव्हेंबर १७६६ (३२३९१); निंबाळकर यास † तकूब व खानगीपैकीं ऐवज देण्याबाबत, २७ जिल्हेज, सु. ११६९ / ५ मे १७६९ (३२३९३); रामाजी सखाजी सरनाईक यास सालाबादप्रमाणें प्रां पुणेपैकीं शेतसनदेच्या ऐवज व गवत देण्याविषयी, २० साबान, सु. ११६९ / ३० डिसेंबर १७६८ (३२३९४); धाराशिवकर मंडळी यांस नालबंदीचा ऐवज देण्याविषयीं, २५ जिल्हेज, सु. ११६९/३ मे १७६९ (३२३९५); लख्या जेठी यास ऐवज देण्याबद्दल, ५ ज. खर, सु. ११६७ / ८ नोव्हेंबर १७६६ (३२४०७); यादवराव रघुनाथ यांनी सालीना ५,००० रुपयाचा मक्त्याचा करार केला त्यावर राघो हरि टकले जादा ऐवज देणार असल्याचे, ८ साबान, सु ११७० / ७ डिसेंबर १७६९ (३२४०८); नारायणराव कृष्ण पारसनीस याचे रुमालास आंख देण्याबद्दल, ११ जिल्हेज, सु. ११६९ / १९ एप्रिल १७६९ (३२४०९); द्वारकोजी निंबाळकर यास पागेस व निसबतीचे लोकांस नालबंदीपैकीं ऐवज देण्याविषयी, १४ मोहरम, सु. ११७० / ११ मे १७७० (३२४१०); सुलतानजी कदम सुपेकर स्वार यास नालबंदीपैकीं ऐवज देण्यासंबंधी, २८ जिल्हेज, सु. ११६९ / ६ मे १७६९ (३२४११); त्रिंबक सदाशिव याचे तसलमातीस पुण्याचे जामदारखान्यापैकीं कापड असून त्याखेरीज त्याचे तैनातपैकीं ऐवज लक्ष्मण कोन्हेरे वगैरे आणखी कोणाकडे आहे तो त्यांना ताकीद करून वसूल करून देण्याबद्दल, ९ जिल्काद, सु. ११६५ / ३० एप्रिल १७६५ (३२४१३); जयराम जोशी यास मोईनीचे कापड दप्तरी रुजू पाहून पावते करण्याबद्दल, २८ साबान, सु. ११६९ / ७ जानेवारी १७६९ (३२४१६); बावा महात याजकडील घोडीचे बेगमीस चंदी व लोकांस रोजमुरा देण्याबाबत, ३ साबान, सु. ११६९ / १३ डिसेंबर १७६८ (३२४३२); महिपतराव प्रल्हाद याजकडे सरकार परांडे महाल व बाबती सरकार नांदेड यांचा मामलतीचे रसदेचा पैका येणे त्याच्या ऐवजाच्या मुदती भरून गेल्याने त्यास आपण सांगितल्यावरून पाठवीत असल्याचे, २५ साबान, सु. ११६९ / ४ जानेवारी १७६९ (३२४३३); गणेश हरि कारकून यास रोजमुरा देण्याबाबत, ८ साबान, सु. ११६९ / १८ डिसेंबर १७६८ (३२४३४); गणेश गंगाधर यास रोजमुरा देण्याबद्दल, २९ रजब, सु. ११६९ / १० डिसेंबर १७६८ (३२४३५); गंगाधर यशवंत याची बारगिरायोग्य असलेली घोडी गंगाधर शंकर याजकडे पाठवतील ती तेथे ठेवण्याबद्दल, २२ साबान, सु. ११६९ / १ जानेवारी १७६९ (३२४३६); सरकारांत हवी असलेली सगगे व मखमल यादीप्रमाणे पाठवावी म्हणून, २० साबान, सु. ११६९/३० डिसेंबर १७६८ (३२४३७); राम पारसनीस यास कराराप्रमाणे सातान्याचे वेहड्यास नेमणूक करून देण्याबाबत, २८ साबान, सु, ११६९/७ जानेवारी १७६९ (३२४६२); रामाजी सखाजी यास असामिरीचे सामान देण्याबद्दल, २३ जिल्काद, सु. ११६९ / १ एप्रिल १७६९ (३२४६४); पागा हुजूरकडील शिलेदारांस

† तकूब – बारगिर किंवा शिलेदार यांच्या वार्षिक वेतनाचा तिसरा किंवा दुसरा हिस्सा रक्कम त्यास अगाऊ नालबंदी म्हणून देण्यात येई. बाकीची रक्कम पावसाळा सुरू होण्याच्या सुमारास लष्करे आपल्या मुलखात परत आली म्हणजे मिळे तिलाच तकूब किंवा तकुबाचा ऐवज म्हणत.

**रुमाल क्र. ६१, पुडके क्र. २ चालू :**

**पत्रें चालू :**

नालबंदीपैकीं ऐवज खर्चास देणे, ३० साबान, सु. ११७० / २९ डिसेंबर १७६९ (३२४६५); भिकाजी बल्लाळ व सदाशिव लक्ष्मण यांस रोजमुरा देण्याबद्दल, ३ साबान, सु. ११७० / २ डिसेंबर १७६९ (३२४६६); पांडुरंग कृष्ण गोडबोले यास खर्चास ऐवज देण्याबद्दल, २९ सवाल, सु. ११७० / २६ फेब्रुवारी १७७० (३२४६७); हरि केशव पुसालकर यास बाल्पर्वशीचा ऐवज देण्याबद्दल, १४ साबान, सु. ११६९ / २४ डिसेंबर १७६८ (३२४६८); धोंडो रामचंद्र व धोंडो बाबाजी यांना कोकणात कामगारीस पाठविले असल्याने त्यांचे गुजारतीचे खर्चाचे हिशेबाची मखलाशी पाठविली आहे तो हिशेब दसरी पोता घेण्याबद्दल, ९ सवाल, सु. ११६९ / १७ फेब्रुवारी १७६९ (३२४७९); सटवोजी सिदा याची पुण्यात चाकरी घेऊन त्यास रोजमुरा व शिधा देत जाणे, ८ साबान, सु. ११६९ / १८ डिसेंबर १७६८ (३२४८६); गंगाधर सुबराव पंडित यास त्याचा वेतनाचा नेमणुकेप्रमाणें ऐवज पावता करण्याबद्दल व गवत देण्याबद्दल, १३ जिल्काद, सु. ११६५ / ४ मे १७६५ (३२५०१); उमाजी राजे भोसले याजकडील स्वारांस ऐवज देण्याबाबत, १ सफर, सु. ११७० / २७ मे १७७० (३२५०३); सेव्याजी आईतोळे याचे घोडीस खर्चास ऐवज देऊन वंदी, हरभरे व बाजरी कराराप्रमाणें दिली असल्याचे, घोड्याबरोबर असलेल्या माणसांना रोजमुरा देण्याबाबत, १० जिल्काद, सु. ११६५ / १ मे १७६५ (३२५०४).

(—) – **मल्हारजी कापसे :** चीक व आंबे रवाना, २८ र. वल, सु. ११७२/१२ जुलै १७७१ (३२४२१).

(—) **मल्हारराव भिकाजी :** सावलदबारे येथील ऐवज प्रापकाकडे येणे त्यातील तैनातेपैकीं ऐवज बळवंतराव राम कारकून यास देण्यासंबंधी, ७ सवाल, सु. ११९५/२७ एप्रिल १७९५ (३२४४१).

(—) – **व्यंकटराव नारायण :** प्रापकाकडे धारवाड येथील रसदेचा ऐवज येणे त्यापैकीं गोविंदराव सदाशिव यास देण्याबाबत, सु. ११६७/इ. स. १७६६-६७ (३२४४४).

(—) – **वासुदेवपंत* :** पा कर्डे रांजणगांवच्या हिशेबास लढे लागले आहे ते मिटविण्याची विनंती (३२४७२).

(—) – **हरिपंत* :** रामचंद्र गणेश यांच्या जमाखर्चाच्या रुजुवातीस येण्याची विनंती, भाद्रपद व. ९, श. १६९१/२४ सप्टेंबर १७६९ (३२४५१).

(—) – **हिम्मतराय गरीबदास :** नाईकजी तुपे यास ऐवज देण्याबाबत, ६ र. खल, सु. ११७२/२० जून १७७१ (३२४९०).

**[प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख नसलेलीं]**

सुरजकः सावकारास ५ हजार रुपये पाठवण्याबाबत, ४ रज्जब, सु. ११६८/२६ नोव्हें १७६७ (३२३९९); निजामुद्दौला यांनी महाराजांच्या नावाच्या सनदा बादशाही दिवाणासमक्ष लिहाव्या म्हणून आज्ञा, २१ ज खर, सु ११६०/९ फेब्रुवारी १७६० (३२४०१); मोंगलाचे लष्करातून आलेले बातमीचे पत्र रवाना केले असल्याचे,

**पत्रें चालू :**

२६ ज. वल, सु. ११६०/१६ जानेवारी १७६० (३२४०३); शेषोपंत यांचा इनाम गावचे पत्राचा मजकूर समजल्याबद्दल, ते लष्करांत आल्यावर श्रीमंतांस विनंती करू म्हणून, १३ साबान, सु. ११६७/१४ जानेवारी १७६७ (३२४०४); तीर्थरूपांकडील आलेले पत्र पाठवीत असल्याचे, सर्व वर्तमान कळवण्याबद्दल, २८ ज. खर, सु. ११६०/१६ फेब्रुवारी १७६० (३२४१८); वाणी याचे चोरीस गेलेले बैल मोंगलांचे लष्करांत असल्याने त्यांना ताकीद करून बैल परत आणण्याविषयी, २५ ज. खर, सु. ११६०/१३ फेब्रुवारी १७६० (३२४१९); प्रांत जुन्नर येथील रसदेचा ऐवज प्रापकाकडे येणे त्यापैकीं दुल्लभशेट यास रदकर्ज देण्याविषयी, १५ र. खर, सु. ११६९/२८ ऑगस्ट १७६८ (३२४४२); सदाशिव नाईक पारकर व रावजी अनंत यांची वही पाहिली असून रावजी अनंत याजकडील ऐवजाची रुजुवात करण्यासंबंधी, २ ज. वल, सु. ११७२/१३ ऑगस्ट १७७१ (३२४४५); मोजीराम यास प्रांत जुन्नर येथील रसदेच्या ऐवजापैकीं रदकर्ज देण्याविषयी, १२ र. खर, सु. ११६९/२५ ऑगस्ट १७६८ (३२४४७); प्रांत बालापूर व पट्टा येथील बाकी हिशेबाची मागणी (३२४४९); जमेचे रुजुवातीस कारकून पाठवण्यासंबंधी (३२४५०); मौजे वडझरे येथील हिशेब आणून द्यावयाचे नसल्यास नाना फडणीस यांची हिशेब न घेण्याबद्दलची चिठ्ठी आणून देण्याबाबत (३२४५२); गणेश त्रिंबक यास फरासखान्यापैकीं नवी पालखी देण्याबाबत, १४ साबान, सु. ११७०/१३ डिसेंबर १७६९ (३२४६०); हशम लोकांचा कापडाचा हिशेब तालुकेवार करून घेऊन जाण्याबाबत (३२४७०); कराराप्रमाणे उरण येथील हिशेब पाठवण्याबद्दल (३२४७१); खानदेश व गुजराथ येथील हिशेब पाठवण्यासंबंधी (३२४७३); सुभानजी कदम, नरसोजी सेटगे, विठोजी शिंदे व विठोजी जाधव यांच्या तसलमातीची आवर्जे यांची वसूल बाकी होणे आहे त्याचा फडशा करण्यासंबंधी (३२४७५); खानदेश व गुजराथ येथील हिशेब सत्वर पाठवण्याबद्दल, पौष व. १, सु. ११८०/२२ जानेवारी १७८० (३२४७६); उंदेरी येथील हिशेबाच्या कामाचा फडशा पाडण्याची विनंती (३२४७७); त्रिंबक येथील हिशेबाविषयी लागलेल्या लढ्याचा फडशा करण्याची विनंती (३२४७८); ता त्रिंबकची घडणी पाठविण्याविषयी (३२४८५); गंगथडी येथील रसदभरणा पोत्यास झाला त्याची याद पाठवून देण्याबद्दल (३२४८७); कोहज, कावनई व उंदेरी येथील ताळेबंद व सातारा येथील झडती आपल्याकडे आहे का याबाबत शोध करून कळवण्याबाबत (३२४८८).

**फारखत :**

सखोजीनी भुकूमच्या पाटीलकीचा हिस्सा विकला तो हिस्सा प्रापकाने अनुभवून सुखी रहाणे म्हणून खंडोजी व हिरजी नाईक देशमुख करंजवणे यांनी बालोजी पा मोझरे यास लिहून दिलेले, ५ रज्जब, सु. ११७०/५ नोव्हेंबर १७६९ (३२३८३).

**मुचलका :**

**मोकदम अवलकटी – पंतप्रधान** (माधवराव बल्लाळ) : जकातीकडील कारकून व प्यादे व बांड्यांकडील कारभारी याची जकातीच्या अंमलाविषयी बोलाचाली होऊन सरकारकडील कारकून उठून गेले त्यास कोणी बांड्यांकडे मिळून सरकारच्या अंमलास अडथळा करेल ते सरकारचे गुन्हेगार ठरतील यासंबंधी, ज्येष्ठ शु. ३, सु. ११६७/१० जून १७६६ (३२३९२).

रुमाल क्र. ६१, पुडके क्र. २ चालू :

वतनपत्र :

**माधवराव पंडित प्रधान – महादाजी बहिरव पेठे :** मौजे पलचुरी येथील खोतीचे वतन पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने चालवण्याबाबत, १५ मोहरम, सु. ११६८/१३ जून १७६७ (३२३८०) (नक्कल).

* संपूर्ण नांवाचा उल्लेख नाही.

---

रुमाल क्र. ६१, पुडके क्र. ३ — सु. स. ११४१ १२०५

का. सं. १२० (३२५०५-३२६२४) — इ. स. १७४०-१८०४

अर्ज :

**आनंदराव भोसले – (—) :** प्रेषकाचे सासरे कृष्णजी ताकपीर यांनी घर व शेत वतन देतो म्हणून सोने घेतले व प्रेषकाची बायकोही माहेरीच आहे तरी बायको व घेतलेले सोने प्रेषकाच्या घरी पाठवण्याची आज्ञा करावी म्हणून (३२५२७).

**केशवराव काजळकर शिलेदार – (—) :** रोजमुऱ्याबद्दल वरात देण्याची परवानगी द्यावी म्हणून (३२५२६).

**राणू गगनाक व काशी बागनाक महार – (—):** मोसदरी येथील मेहतरकीच्या वतनाची मागणी (३२५२८).

गोतपत्र :

**समस्त गोत कर्यात मावळ – मंबाजी सोनजी पायगुडे :** कानोजी जाखोजी व महादजी साबाजी पायगुडे यांचा मांडवी बुद्रुक येथील देशमुख व मोकदमी वतनासंबंधी प्रापकाशी असलेल्या तंट्याचे निवाड्यासंबंधी, पौष व. ४, शके १६६२/२६ डिसेंबर १७४० (३२५५७).

पत्रें :

**आनंदीबाई* – रामचंद्रपंत* :** मकर संक्रमणाचा तिळगूळ रवाना (३२५६८).

**गोपाळ शामराज – दाजीभट* :** धोंडजी अहिनाक याच्या शेताच्या खरेदीवर रामजी अहिनाक हक्क शाबित करीत असल्याबद्दल खुलासा (३२५४३).

**चिटको गिरमाजी – बाबा* :** प्रेषकाच्या घराची चोरांकडून लुटालूट (३२५८५).

**दर्याबाई निंबाळकर – महिपतराव चिटणीस :** तिळगूळ रवाना (३२५६९).

**धोंडो राम – नाना* :** तिळगूळ रवाना (३२५७०).

**नारो राम – नाना* :** लक्ष्मण देवाजी सालसी येथे जात असता भांबडा गांवी बळवंत गडकऱ्यांकडून झालेल्या उपद्रवाचे पारिपत्य करण्याविषयी (३२५७१).

**नारो हरि – मोरोपंत* :** श्रीच्या नैवेद्याच्या व श्रावणमासाभिषेकाच्या सनदा मिळाल्याचे, भेटीची अपेक्षा (३२५५६).

**नीळकंठ नाईक रास्ते–भाऊसाहेब* :** तिळगूळ रवाना (३२५६६).

पत्रें चालू :

**बळवंतराव नागनाथ – नारोपंत नाना* :** गयायात्रेस जात असून खर्चाची तरतूद करण्याची विनंती (३२५३५); पैशाच्या अडचणींमुळें खर्चास ऐवजाची मागणी (३२५३९).

**बाबाजी अनंत – गोविंदपंत तात्या* :** आईतवडे येथे नरसिंगराव देशपांडे यांचे घरी चोरी झाली त्याचा आरोप चिकुर्डे गावी आल्याने आईतवडेकर व चिकुर्डेकर यांच्यात तंटा (३२५९१).

**बाबाजी प्रल्हाद – नाना* :** पिंपळवडी येथील महादजी पाटील काकडा यांस जरब घातल्यामुळें वाघ व माळी गुन्हेगारीखाली आले म्हणून, गावांत कुभांडखोर फार आहेत तरी पांडुरंगजी बाबा सरकारतर्फे चौकशीस आले आहेत त्यांजकडून गांवची मोजणी व जरीबे केल्यास गांव सुरळीतपणे चालून सरकार जमाबंदी किफायतशीर होईल म्हणून विनंती (३२५४९).

**बाळंभट गोरे – बाबा* व नाना* :** अक्षयतृतीयेस अनुष्ठानासाठीं निमंत्रणें (३२५३४).

**बाळाजी मोरेश्वर पुरंदरे – दादा* :** तिळगूळ रवाना (३२५५४).

**भगवंतराव नारायण – पंतप्रधान* :** बदकर्माचा आरोप आल्यामुळें किल्ले चाकण येथे अटकेत ठेवलेल्या रामा तेलंगी हीस हुजुरकडे रवाना (३२५५०).

**महिपतराव दादाजी – बळवंतरावजी* :** भाटे यांच्या बंधूस उन्हांत उभे करून डोक्यावर दगड दिले हे त्याने सिद्ध करून दाखविल्यास ५ हजार रुपये गुन्हेगारी देण्यास प्रेषक तयार आहे व भाटे लबाड असल्यामुळें खोटे बोलत आहे तरी तो खोटा ठरल्यास त्याजकडून १० हजार रुपये गुन्हेगारी घ्यावी म्हणून न्याय देण्याबाबात खुलासा (३२५५५).

**महिपतराव सटवाजी हांडे देशमुख – महादाजी धोंडदेव :** रोहकडी येथील पाटीलकीची वहिवाट प्रेषकाची असून प्रापकाने धटाई करून चालवल्यास सरकारांतून दंड होईल म्हणून सूचना, १ र. वल, फ. १२१४/१० जून १८०४ (३२५६२).

**मानसिंग * – महिपतराव गोसावी :** विठ्ठलपंत यांनी प्रेषकाकडील धरून नेलेली माणसे सोडवण्याची विनंती (३२५७४).

**मोरदीक्षित मराठे – नाना जोशी व आबा* :** गुहागर येथे घेतलेल्या जागेत वाडा कसा बांधायचा त्यासंबंधी वर्णन (३२५७५, ३२५७६); **– मल्हारभट वर्तक :** भाताची खरेदी, मुंबई येथून बागायती कलमे व माळी आणण्यासाठीं चौकशी करावी म्हणून (३२५७७).

**मोरो अनंत – विसाजीपंत दाजी* :** यात्रेस जातेवेळी समशेठ ठिगरे यांच्या मुलाच्या गळ्यांतील रुप्याचा चौक नाझरे गांवी चोरीस गेल्याबद्दल (३२५८१).

**मोरो हरी – शास्त्रीबाबा* :** बापू बाबूराव व आबाजी विनायक ठकार जोशी कुलकर्णी यांची कर्यात मावळ येथील वृत्तीची वाटणी द्यावी म्हणून मागणी व भाऊ जनोबा सर्व वाटणी घेतो म्हणून तक्रार तरी त्याबद्दल न्याय देण्याची विनंती (३२५६०).

**रघुनाथ बाजीराव – बाळाजी जनार्दन :** गणेश दादाजी यांस नख्त ऐवज व कापड देण्याबद्दल, ११ रजब, सु. ११६५/४ जानेवारी १७६५ (३२५१०).

रुमाल क्र. ६४, पुडके क्र. १ चालू :

पत्रें चालू :

**मोकदम व चौगुले, आंबेगव्हाण – माधवराव कुलकर्णी :** वसूल प्रकरणी आबाजी काळे यांचे मनाईपत्र पाठविण्यासंबंधी (३३९२३).

**यशवंत*–काका* :** कौटुंबिक हालहवालासंबंधी (३३९१८).

**रणशेठ कोठीवाले – मोरोपंत दादा* :** श्रीमंतांकडील कर्जवसुला-संबंधी (३३९१५).

**राजसिंग जाधवराव–बाळाजी बाबर :** मेडद येथील डोहात मासे मारावयाकरिता पाठविलेल्या इसमास पकडले व चांगली वर्तणूक दिली नाही म्हणून तक्रार (३३८४४).

**रामचंद्र परशुराम – सखो सोमाजी :** गोगटे यांनी पाटीलकी वतनावर अंमल बसविण्यासाठीं कसबे मांजरीस लोक रवाना (३३८७०) (नक्कल).

**रामचंद्र हरी देवधर – गोविंदपंत काशी देवधर :** रामचंद्र गणेश याजकडील पागा भिकाजी नाईक याजकडे सरंजामासुद्धा सुपूर्त केली त्याचा बेहडा करण्यासंबंधी (३३८३५); लक्ष्मण भिकाजी कारकून यानी हुजरून पहाणी करून आणलेली कागदपत्रें राजमाचीकर कारकुनाचे स्वाधीन करावी यासंबंधी (३३८६३); रामचंद्र गणेश यांचे पागेचा बेहडा व पा भेडसेपैकी कागदपत्रें पाठविण्याबद्दल (३३८८१).

**रामाजी नारायण कर्वे–बाळाजी* बाबा :** लिहून दिलेल्या यादीची पैरवी (तपासणी) करून मखलाशी करण्यांत यावी अशी विनंती (३३८७६).

**लक्ष्मण शंकर–बाबा* :** प्रांत अकबरपूर व इकडील सरदारांचे वर्तमान श्रीमंतास लिहिलेल्या पत्रावरून कळून येईल असे निवेदन (३३८५५).

**विठ्ठल रामाजी सुभेदार–हैबतराव विश्वासराव दिा गायकवाड :** सरकार तालुक्यांत लुटालूट केल्याबद्दल जिवराव शिंदे यास निक्षून ताकीद करण्यासंबंधी (३३९१६) (नक्कल).

[फक्त प्रेषकांचा नामोल्लेख असलेलीं]

**गणेश धोंडदेव – (—) :** पेठनिहाय कोतवाली वगैरे शहर पुणे येथील जमाखर्चासंबंधीचे कागदपत्र रवाना करण्यासंबंधी (३३८८४).

**गोविंद कृष्ण गोडबोले – (—)** अन्नपूर्णाबाई रामचंद्र पवार व आनंदीबाई वाघमारे दिा होळकर यांच्यातील कजियासंबंधीचा वृत्तांत (३३८४३).

**त्रिंबक कृष्ण – (—) :** चिपळूण येथील खोतीसंबंधी वेतन व आसामी (लोकांच्या) नेमणुकीबाबतच्या पद्धतीचा खुलासा (३३८६१).

**त्रिबकराव शिवदेव ऊर्फ नाना पुरंदरे – (—) :** दीक्षित बाबा रावजीच्या मोर्च्यात आले असून आप्पाजी कराराकरिता येणार असल्याचे निवेदन (३३८९३).

**त्रिंबक राम पोतनीस ता कल्याण – (—) :** कल्याण जामदार-खान्यातील सरकारचे शिल्लक दागिने दादोपंत गोडबोले यांच्याखेरीज इतरांना कां दिले गेले नाहीत याबाबतच्या सबबीसंबंधी (३३९२०).

पत्रें चालू :

**नारो शिवराम चक्रदेव – (—) :** चंदीबाबतच्या बाकी ऐवजा-संबंधी शेठ्याकडे वाण्यांचा तगादा झाल्याने ऐवजाची तरतूद करण्याबद्दल विनंती (३३८५६).

**पंढरीनाथ* – (—) :** बोरले पा जामखेडपैकीं रुसूम ऐवज माधवराव रावजी देशपांडे याजकडे देण्या बंधी (३३९१३).

**बापू सोमवंशी – (—) :** हिरू साळी खरपुंडीकर व कवठेकर साळी यांच्या सुटकेबाबत (३३९०६).

**माधवराव नीळकंठ – (—) :** गणेशमूर्ति हत्तीच्या रवानगीबाबत (३३८५४).

**माधवराव रामचंद्र – (—) :** चोपदारी काठ्यांची रवानगी (३३८७४).

**राघोबा* – (—) :** घर दुरुस्तीसाठीं लागणाऱ्या लाकडी साहि-त्याच्या रवानगीसंबंधी (३३८८५).

**निठोबा नाईक बासरे - (—) :** पैठण येथून हशेबाच्या कामा-साठीं शेवगांवा आलेल्या कारकुनास मदत करण्याबद्दल कमाविसदारास सूचना होण्याची मागणी (३३८४०).

**सदाशिव* – (—) :** आबाजी बाबाकडील कामांचे समथन (३३९१९).

**सदाशिव अनंत – (—) :** सातारकर वाण्यांनी मुंबईत खरेदी करून सुवर्णदुर्ग येथे आणलेल्या जिन्नस प्रकरणी सुवर्णदुर्ग कारभाऱ्यांचा हात गुंतलेला असावा असे निवेदन (३३८६७).

[फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेलीं]

(—) – **आबा* व दादा* :** लक्ष्मणपंत गोखले व तात्या अभ्यंकर यांचा माल रेवदंड्याच्या बंदरातून जाऊ द्यावा व कोठा किल्याच्या पहाऱ्याची चोख व्यवस्था ठेवण्यात यावी अशी सूचना (३३८७८).

(—) – **गणेशपंत* दादा व मल्हारपंत* :** ३,००० रुपये किंमतीचे दोन मोती रवाना (३३८८०).

(—) – **गोविंदपंत तात्या* :** बोदवडेपैकी भजमासाचे तेरीज व गांवची याद रवाना करण्याबद्दल (३३९२५).

(—) – **जिवाजी गणेश :** दस्तक असताना कोठेवाल्यांजवळून (निा मल्हारराव होळकर) जी जकात घेण्यात आली ती माघारा देण्याबद्दल सूचना (३३९२९).

(—) **दादा* :** बादशहाने जे जे सांगितले तेच श्रीमंतांस कळविले असल्याचे निवेदन (३३९०८).

(—) **नारायण भट :** यादीचा तपशील दिल्याखेरीज गत्यंतर नाही म्हणून (३३८६५).

(—) – **नारो आप्पाजी :** पावसामुळें कापडाची खराबी होण्याचा संभव असल्याने लष्करांत तूर्त कापड पाठवू नये (३३९३५).

(—) – **नीळकंठराव मेहेंदळे :** सर सुभ्याकडील वरात चुकती करण्याबद्दल सूचना (३३८४५).

**रुमाल क्र. ६४, पुडके क्र. १ चालू :**

**पत्रें चालू :**

(—) – **पंतप्रधान* :** जंजिरे व कोरक किल्यांचा कसा कसा बंदोबस्त ठेवण्यांत आलेला आहे त्यासंबंधी लखोटा रवाना (३३९११).

(—) – **बाळाजी जनार्दन फडणीस :** खर्चात काटकसर करण्याबाबत सूचना (३३८५१).

(—) – **बाळाजी* बाबा :** चिंचणी–तारापूर महालचे भात खरेदी करून काय दर ठरला ते कळविण्याबाबत (३३८४९).

(—) – **भाऊसाहेब* :** हुजूर पागेकडील शिवजी बल्लाळ जुने धान्य घेण्याबद्दल तक्रार करीत असल्याबाबत (३३९३९).

(—) – **मराठे-महाजन मौजे पुरल :** लक्ष्मण व त्याच्या मुलीस सरकारांत नेल्याने प्रेषक आल्यावर त्याबाबत निवेदन करणार असल्यासंबंधी, ३ र. वल, सु. १२१२ / १७ फेब्रुवारी १८१२ (३३८९७).

(—) – **रावजी* :** दरोडेखोर जिवबा आवा भिल्ल याच्या सुटकेबाबत (३३९०४) (नकल); मामलतीच्या जाबसालासाठीं भाटे यास स्वाधीन करण्यासंबंधी कुकरमुंढेकर यांचा निरोप (३३९२८).

(—) – **सुभेदार* :** लग्नांत वैरणीचा तुटवडा पडणार असल्यामुळें त्याबाबत अगोदरच सोय करण्यासंबंधी विनंती (३३९१२).

(—) – **हरिपंत* :** बापू करिता रवाना केलेला पोषाख पोहचल्याचे कळविल्याबद्दल (३३८५७).

**[ प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख नसलेलीं ]**

गुमानसिंग, तुमानसिंग व फतेसिंग वगैरे बुंदेले यांच्या टिळ्याच्या याद्या लष्करात त्वरित रवाना करण्यासंबंधी सूचना (३३८३४); नेरळ मामलतीच्या तफावतीचा फडशा होत असल्यामुळे संबंधित कागदपत्रांची मागणी (३३८३६); सुखनंद गोकुळ भट याजकडे वसई हा गांव इनाम आहे किंवा नाही याबाबतच्या चौकशीसंबंधी (३३८३७); हिशेब रवाना (३३८३८); विटे व कवठे येथील बार करावयास नेलेल्या सनदांच्या रवानगीविषयी (३३८४२); गैरसनदी गांवाच्या चौकशीसंबंधी (३३८४६); अंबाईराणी जत्रारकर व नारायणराव वकील याजकडील मखलाशीच्या याद्या रवाना करण्याबद्दल (३३८४७); किरकोळ (३३८४८); वसईकडील अजमास भरण्यासंबंधी दिरंगाई न करण्याची कारकुनास ताकीद (३३८५०); पाटोळे येथील साबाजी व बाबाजी विठ्ठल कुलकर्णी यांचेकडून ऐवज घेऊन त्यांना मोकळे करण्याबद्दल (३३८५८); गंगथडीकडील अजमासाबाबत विचारपूस (३३८५९); आपसात कटकटी करू नयेत अशी रामाजी धुळप यास निक्षून ताकीद (३३८६०); कांही महत्त्वाच्या कामानिमित्त अब्दुल अरब याची लष्करात रवानगी (३३८७१); बर्वे यांच्या कारकिर्दीतील हिशेब पहाणीचे कामकाज चालू असल्याबाबत (३३८७२); माणकर कोठी प्रां राजपूरपैकीं, सातान्यास बेगमीस असलेल्या तांदळाच्या परिमाणात होणाऱ्या तफावतीसंबंधी चौकशी करण्याबाबत (३३८७९); मुरादखान याच्या भावाच्या नांवे रहदारीचे दस्तक देण्याविषयी (३३८८९); चिटणिसांकडे सनदापत्रे देण्याबद्दल (३३८९०); नंदुरबार व रहिमतपूर भागातील भिल्लांच्या पारिपत्यासाठीं जादा कुमकेची मागणी (३३८९१); वाद्य साहित्य पाठविण्याबाबत (३३८९२); तोफखान्याच्या झडतीसंबंधी

**पत्रें चालू :**

(३३८९८); निरख (बाजारभाव) देण्याबाबत पोतदार पारखी यांना ताकीद (३३९०१); गुरांवरील जकात माफीचे दस्तक देण्याविषयी (३३९०३); गारदी मामलतदाराचा हुकूम डावलून लावतात म्हणून जुने कमी करून नवे गारदी भरती करावेत अशी भाटे यांची तक्रार रास्त नाही याबाबत कारणमीमांसा (३३९०९) (नकल); बापदेव व बोरघाटाकडे कही जाऊ देवू नये म्हणून ताकीद (३३९१४); जंगी तोटे व तोफांच्या गोळ्यांची पोंच (३३९२४, ३३९३७); माधवराव ओक याजकडील नाशिक येथील मामलतीच्या जमाबंदीसंबंधी (३३९२७); प्रत्यक्ष रणांगणावर तोफा वगैरेची कशी योजना करण्यात आली त्यासंबंधीचे निवेदन (३३९३२); प्यादे व स्वारांच्या रवानगीबाबत (३३९३३); आज्ञेप्रमाणें कामाठी, बेलदार व भाले–काठ्या लष्करांत रवाना, सु. ११६० / इ. स. १७५९–६० (३३९३४); अमृतराव याजकडील पागेकडे कापडासंबंधी चिठ्ठी देऊन अब्रू राखावी अशी विनंती (३३९३६); लष्कर व्यवस्थेविषयी (३३९३८); सोडचिठ्ठीबाबत वंदन येथे तगादा बसविल्यासंबंधी (३३९४०).

**रवानगी याद्या :**

(—) – **माधवराव रामचंद्र :** इंग्रज वकील मॅलेट यास पुणे ते मुंबईचे दस्तक दिल्यामुळें त्यास अडथळा न करण्यासंबंधी बाबूराव हरी जमातदार यास ताकीद (३३८६४); कोन्हेरे बुा महमदापूर असीउंबरी प्रां बेलापूर येथील जहागीर व बाबती सरदेशमुखी नागो राम यांचे पागेसाठीं सांगितली असल्याने वेठबिगार व इतर बाबतीत उपद्रव न देण्याविषयी. तेथील कमाविसदारास सूचना (३३९०२).

*मूळ नांवाची निश्चिती नाही.

---

**रुमाल क्र. ६४, पुडके क्र. २** — **सु. स. ११६०–१२०९**

**का. सं. ११६ (३३९४१–३४०५६)** — **इ. स. १७६०–१८०९**

**आज्ञापत्र :**

(—) – **विठ्ठल बयाजी :** बाबाजीस व प्रापकास पंतप्रधानांकडे पाठविले असता प्रापक हुजूर येऊन जाबसाल न करता निघून गेला तेव्हा चिरंजिवास घेऊन हुजूर येण्याबाबत (३३९९१).

**कबुल कतबा :**

**बगाजी सोनजी व जानोजी चौगुले** – (—) : मौजे कामथडी येथे प्रेषकाकडे चार बिघे जमीन जास्त असून त्या जमिनीचा पैका वहातीप्रमाणे चौगुले देत नाहीत म्हणून मोकदमांनी साहेबापाशीं लिहून दिल्यावरून प्रेषक सांगत आहेत कीं जमिनीची मोजणी करावी व जमीन जास्त भरल्यास त्याचा पैका देऊ, २० रज्जब, सु. ११८२ / १३ जुलै १७८१ (३४०५२).

**पत्रें :**

**अमृतराव* – हरिपंत भाऊ चक्रदेव :** खर्चास ऐवजाची टंचाई, इकडे पाऊस नसल्याने महागाई फार असल्याबद्दल (३३९५१).

रुमाल क्र. ६४, पुडके क्र. २ चालू :

पत्रें चालू :

**अमृतराव हरि चक्रदेव – आबा फडणीस माहुलीकर :** कर्जाचे पेचातून मुक्त करण्याची विनंती (३३९५२).

**आबाजी नीळकंठ मेहेंदळे – हरिपंत* आबा :** मलेघाटी हुंड्या पटल्या म्हणून अजुरदार पाठवित असल्याचे, यजमानांची स्वारी कुठे आहे ते कळवण्याबाबत, नर्मदेचे अलीकडे गिरासीयांनी दंगा केला असल्याचे, रामपुरेकर याने खांडवे येथे स्वारी केली असल्याबाबत (३४०३०).

**काशी शिवराम – सदाशिवपंत* व हरिपंत* :** किल्ले सातारा येथील वर्दीचे कागद पाठविले असून त्यातील मजकूर नायकोजी गुजर याजकडून श्रीमंतांचे कानावर घालून यजमानाकडे रवाना करण्याबद्दल, यशवंतराव पवार याजकडून सालाबादप्रमाणे तोफांचे सामान आले नसल्याने ते पाठवण्याबद्दल पवार यास ताकीद करण्याविषयी, किल्ले सातारा येथील श्री मंगलाई देवीच्या नैवेद्याचा बंदोबस्त करण्याबाबत (३४०२९).

**काशी शिवराम बंदरे व गोपाळ खंडेराव – रायाजीपंत आप्पा व आबा फडणीस :** सातारा येथील पाठविलेल्या वर्दीच्या दोन लखोट्याची पोंच देण्याबाबत (३३९४६).

**कृष्णराव महादेव – नाना* :** रेडक्याची एक जोडी व हरणाची एक जोडी चिंतोबाबरोबर पाठवून देण्याबाबत (३३९९३).

**कृष्णाजी गणेश राहाळकर – गणेशपंत, आप्पाजीपंत व नारोपंत चक्रदेव :** सदैव पत्र पाठविण्याची विनंती, सांगितलेले काम स्मरणपूर्वक करण्याची विनंती (३४००१).

**कृष्णाजी माधवराव – रामचंद्रपंत* :** तोफखान्याकडे बैलाचे चंदीबद्दल व खर्चास ऐवज दिला तो भरून पावल्याबद्दल (३३९९६) (नकल).

**केसो दादाजी – बाबा स्वामी* :** श्रीमंतांच्या पागेचा हिशेब पाठवला असून तो त्यांना दाखवून गल्याची हुज्जत घेऊन पाठवून देण्याबाबत (३३९८२).

**गंगाधर जगन्नाथ – विठ्ठलपंत मामा* :** चिरंजिवास घेऊन आपल्या भेटीस येत असल्याचे (३३९८१).

**गणपतराव महादेव भागवत – बाबासाहेब* :** कुशल वर्तमान, अखबार पाठवीत असल्याचे (३३९७५) (अपूर्ण).

**गणेश महादेव – बाळाजीपंत आप्पा* :** रोजमुऱ्याचा ऐवज नेण्याकरिता स्वार लवकर पाठवावे, विष्णुपंत यास आपल्याजवळ आणावे (३३९५७) (नकल); **– रावसाहेब* :** किल्ले मोट येथील अमऱ्यामध्यें २ हजार जमाव जमा झाल्याने त्यांचे पारिपत्य करण्यासाठी विसनसिंग याने प्रेषकास बोलावले असल्याबद्दल, गुजरांच्या शब्दावर न जाता दुरुनच त्यांच्यावर दबाव आणावा, कुंभऱ्याच्या गडीचा बंदोबस्त करीत असल्याचे (३३९६६).

**गोविंदराव पा डेंगळे – आबा फडणीस :** बऱ्याबाची कागदपत्रे देऊन रवानगी केली असल्याचे, भात कोठेच मिळत नसल्याबद्दल खुलासा, कल्याण येथून नारो पांडुरंग यास माहुलीस तसराचे ठरावास पाठविले होते त्यांना दर मणाचा दर ठरवून दिल्याबद्दल (३३९४९, ३३९५०).

पत्रें चालू :

**गोविंदराव निगडे व शेरीकर मोकदम – बाबासाहेब* :** कडेगांवच्या स्वारीपासून संरक्षण करण्याची विनंती (३३९५९).

**गुंडो नाटेश्वर – स्वामी* :** नबाब सुलतानखाँ व शामलाल मुनशी या त्रिवर्गांनी मोर्चाचा बंदोबस्त केला असल्याचे, रोहिल्यांस कोणाचेही कबिले गंगापार उतरू न देण्याची ताकीद केली असल्याचे, नजीमगड येथे पूल बांधत असल्याबद्दल, नजीमगड येथे दिल्लीच्या सावकारास अटकावल्याबाबत (३३९८६).

**चिंतो त्रिंबक – रामचंद्रपंत दादा सुभेदार :** किल्ल्याची झालेली स्थूलमान पहाणी व चौकशी कळविली आहे त्यात अधिक उणे झाले असल्यास सरकारचे समजुतीस येईल त्याप्रमाणे लिहावे म्हणून (३३९८३).

**द्वारकोजी देशमुख – कृष्णराव* :** मानसिंगराव पांढरे याजजवळ वकील असल्याबाबत व गढी सर करून जलदीने येत असल्याचे (३४००७).

**नरसिंगराव शेडगे देशमुख – विसाजीपंत* बाबा :** काशीबा वालेकर याचा बंदोबस्त करुन गावची लावणी करावी व गावचा बंदोबस्त करावा म्हणून (३४०२८).

**निंबाजी पा जाधव – त्रिंबकजी पा तात्या :** आज्ञेनुसार गला खरेदी केला असून तो न्यावयास उंट पाठवण्याबद्दल (३३९८४).

**निंबाजी व मानसिंगराव पा – बाबा घारगे :** नवऱ्या मुलाचा पोषाख घेऊन जलद येण्याबद्दल (३४०१९).

**पांडुरंग रामचंद्र ढमढेरे – एलफिन्स्टन बहाद्दुर :** वरचेवर पत्र पाठविण्याची विनंती (३३९९०).

**बळवंतराव मल्हार–श्रीपतराव* :** ब्राह्मणाने मागितलेले पैसे त्यास पाठवून देण्याबद्दल, लिंगाप्पाचा जाबसाल करून पाठवण्याबाबत (३४००८); **– रामाजीपंत* :** कुदळे, फावडे, कुऱ्हाडी वगैरे रवाना करून कामाठ्यांचे काम चालते करून देऊन बाकी राहिलेले सामान पाठवण्याबाबत (३४००९).

**बाबाजी सावंत – पंतप्रधान* :** आज्ञेनुसार जमावासहित येत असल्याचे (३४३०९).

**बाळाजी चिंतामण – नारोपंत नाना* :** सरकारचे पत्र रत्नाकरपंत यास दिले असून देखील तो आपला हेका सोडण्यास तयार नसल्याचे (३४०४३).

**बाळाजी लक्ष्मण – आबा फडणीस व रायाजीपंत आप्पा :** हरभट साने याजजवळून चांदवड छापी घेतलेला ऐवज रामचंद्र आप्पाजी आठवले याचे हवाली करून पावल्याचे पत्र पाठवण्याबाबत (३३९४८); आबा फडणीस, सखारामपंत यांची रवानगी माहुलीस करण्याविषयी त्यांनी बोभाट येऊ न देता तेथील बंदोबस्त करण्याबाबत, रविराव बापू याजकडून ऐवज आणण्याबद्दल (३३९५३).

**भास्कर* – आप्पा* :** प्रेषकाच्या आसामीविषयी श्रीमंतांस अर्ज करण्याची विनंती (३४००६).

**भास्करराव बाबाजी – नानासाहेब* :** आज्ञेनुसार सत्वर येत असल्याचे (३४०३७).

**रुमाल क्र. ६४, पुडके क्र. २ चालू :**

**पत्रें चालू :**

**मल्हार कृष्ण देशपांडे – विसाजीपंत* बाबा :** कोलेकरांनी हप्त्याने कसा ऐवज द्यावा त्याबाबत खुलासा, वसूल होणे असल्यास प्यादांस मनाचिठ्ठी व वरातदारास दाळ, पीठ घेण्याविषयी चिठ्ठी पाठवावी म्हणून ( ३३९९९ ).

**महादजी विष्णु – विसाजीपंत* दादा :** त्रिंबकराव गिरमाजी यास चित्रदुर्ग येथील वकिली सांगून पाठविले असून त्याजकडून आणखीही काही कामकाज करून घ्यावे ( ३३९७० ).

**मोरो बल्लाळ नातू – रामराव भाऊ* :** बळवंतराव थत्ते हे बंडातील नसून रंगराव आप्पाकडून इकडे (महेश्वरी) आले आहेत तरी त्यांची अटकाविलेली घोडी त्यांना परत देण्याबद्दल ( ३३९४५ ).

**मोरो बाबाजी गोखले – जनार्दनपंत तात्या* :** सालगुदस्ताचे शिबंदीचा ठराव सरकारातून अद्याप झाला नसल्याचे, आपल्या मनोदयाप्रमाणे सर्व काम पार पाडून स्नेहाची वृद्धी असावी ( ३४०१८ ) (नक्कल).

**मोरो हरी – शास्त्रीबाबा :** गोविंदपंत आपटे याचे मनसुफीच्या कागदांचा लखोटा व बाबाजी डांगे यांचे कजियाचे पत्र शिका करून पाठविले ते पोचल्याबद्दल, नाना फडणीस पुण्यास जाण्यासाठी निघून आले असल्याचे (३३९९२).

**यशवंतराव कवडे – साहेब* :** प्रेषकाचा सरंजाम पानगावी राहिला आहे त्यास प्रेषकाची निशा पार पाडून द्यावी म्हणजे सरंजाम आणला जाईल व ठाण्याचा बंदोबस्त होईल; येथे आल्यावर लोकांचा बंदोबस्त प्रापकाने करावा म्हणून (३३९७८).

**यशवंतराव सदाशिव – पंतप्रधान* :** निडगुंद्यास दौलतराव याजकडे ठाणे घ्यावयास प्रेषकास पाठविल्यावरून त्याजकडील कारकून, घोडी, उंटे, तटे व प्यादे वगैरे घेतले त्याच्या खर्चास सव्वाशे होनापेक्षा जास्त काही मिळाले नाही याबाबत तुफानी याजकडून जाब घेण्याबाबत (३३९६९).

**राजे सदाशिव रामचंद्र – समस्त शिलेदार मंडळी :** प्रापकाने आपली खातरजमा राखून कामकाज करण्यासंबंधी (३३९६०).

**राणोजी देशमुख – अंबादासपंत* :** नारो केशव हेजीब याजकडून सर्व वर्तमान कळले असेलच; त्यांनी नाशिक येथे जाऊन मामलेदारास पत्रे दाखवून कामकाजाची परवानगी घेतली असल्याचे (३४०५१).

**रामचंद्र मल्हार – बाबा* :** येसाजी रंभाजी याची प्रांत भदावर येथील वकिलीची आसामी सुरळित चालू व्हावी म्हणून ताकीद देण्याविषयी (३३९८५).

**रामचंद्र व्यंकटेश – बापूजीपंत* :** सदाशिवपंत पराडकर यास अरब याने अटकावून ठेवल्याने त्यास ताकीद करून पराडकर यास घेऊन येण्याबाबत (३३९८०).

**लक्ष्मण रामचंद्र – बाळाजीपंत दादा* :** वासुदेवपंत आपले कामकाज करीत असल्याबद्दल, राजारामाची सोय प्रापक आल्यावर होईल म्हणून (३४०२०).

**वामनराव गोविंद – बापू* व आप्पा* :** आज्ञेप्रमाणे माहुलीस पोहोचलो असून गोपाल भाऊ यास तेथे ठेवून प्रेषक प्रापकाकडे येत असल्याचे (३४०३५).

**पत्रें चालू :**

**वासुदेव जोशी – पंतप्रधान* :** या वर्षी येथे स्वस्ताई असल्याने रयतेस कोणी व्यापारी मिळत नाही म्हणून त्यांच्या फुरसुतीने वसूल घ्यावा लागत असल्याचे ( ३३९७१ ).

**विठ्ठल मुगाजी घोडबंदरकर – सदाशिवपंत* :** किल्ले करनाळा येथील बेगमीस चुना पाठविला त्याचा ऐवज लवकर पाठवण्याबद्दल (३३९६३).

**वृंदावनदास राजी – नानासाहेब पुरंदरे :** प्रापकाकडून आलेले गणपतराव शेणवी यांनी सांगितल्याप्रमाणे काम करून दिले असून सर्व हकिगत ते सांगतीलच (३४०१६).

**श्रीनिवास नारायण – मल्हारराव* :** सदैव पत्र पाठवून सांभाळ करण्याची विनंती (३४०५०).

**संताजी भगवंत चौगुले – मोकदम बाकी पा। सुपे :** मिरास जमिनीवरील घुगरी वगैरेचे पुरातन हक्क आहेत ते देण्याबाबत ताकीद (३३९८७).

**सदाशिव बाबुराव दातार – जगन्नाथपंत तात्या* :** प्रेषकाकडे वसुलास शिपाई आले असल्याने वासुदेवशेठ सांपळे व वमणशेठ कुसे याच्या चिठ्ठीचा भरणा केला असल्याने पावती पाठवावी, बाकीचा भरणा लवकरच करीत असल्याचे (३४०३१); – **आण्णा *:** मागणीप्रमाणे दर्यावर्दीबरोबर खाप्या व छिटे रवाना (३४०३२).

**सर्वोत्तम शंकर – नाना * :** स्वारीबरोबर आलेले हशमी माघारी रवाना केले असल्याचे (३४०४८).

**सुभानजी साळवी – नाना फडणीस :** मीरगोंडी रवाना (३४०५४).

**सेको व्यंकटराव मल्हार व नरसो जगन्नाथ – बाजीपंत आण्णा* :** शाकभाजीची पोंच (३४०००).

**हरी भगवंत व बाळाजी लक्ष्मण – आबा फडणीस व रायाजीपंत आप्पा :** पुण्यास गंगाधरपंत मराठे याजकडे ऐवज भरून पावती पाठऊन देण्याबद्दल, सोयरो परशराम याजकडे ऐवज देण्याबद्दल, पुण्यातील वर्दीची चौकशी चांगली ठेवण्याबाबत (३३९४७).

**हैबतराव जगताप – विठ्ठलपंत मामा* :** रामचंद्र नारायण सुभेदार याजकडून प्रापकाकडे आलेले बाळाजी जोतीबा सुभेदारांकडील कामकाज समजावतील त्याचा बंदोबस्त करण्याबाबत, कोकमठाण येथीलही बंदोबस्त करण्याबद्दल ( ३३९४१ ).

**[ फक्त प्रेषकांचा नामोल्लेख असलेली ]**

**आबाजी नीळकंठ मेहेंबळे – (—) :** नारायणबाबा ताकटे यांच्या सांगण्यावरून आलेली पत्रें पुण्यास रवाना करीत असल्याचे (३४०३४).

**गोविंद नाईक – (—) :** सांगितल्याप्रमाणें निर्वाहासाठी योग्य ती सोय करण्याविषयी विनंती (३३९९४).

**नारो गोविंद – (—) :** दारुगोळा व प्यादे पाठविण्याची विनंती (३३९९८).

**नारो बापूजी – (—) :** सिंहगड येथील पुण्यात चाकरीस असलेल्या लोकांची तैनातेखेरीज शिध्याची काय आज्ञा आहे याबाबत विचारणा ( ३३९६५ ).

रुमाल क्र. ६४, पुडके क्र. २ चालू :

पत्रें चालू :

**नारो बाबुराव** – (—) : कुसाजी माहादेव सैतवडकर याजकडील कारकून प्रेषकाची आवई ऐकताच जमीनदाराचे रुमाल घेऊन व सरकारी कागदपत्र घेऊन पळून गेले. भाऊ जोशी यांनी श्रीपतराव आपटे यांजकडे ठिकाणवार रुमाल अमानत ठेवले आणि प्रेषकास अंमल करण्याची कशी जबरदस्ती करतात त्याचा खुलासा, बाबा देशपांडे याचे नावे सोडचिठ्ठी देण्यासाठी भाऊ जोशी यास आज्ञा करावी म्हणून विनंती (३३९६७, ३३९६८).

**बाळाजी चिंतामण** – (—) : सरकारचे पत्र रत्नाकर राजाराम यास दिले असून ते परस्पर कामकाज करवितात म्हणून (३४०४४).

**महादजी बल्लाळ** – (—) : प्रांत राजपुरी येथील मामलत गोविंदराव व चिमाजी माणकर याजकडे असून जयराम त्रिंबक कारभार करीत होते त्यात चिमाजी माणकर व जयराम त्रिंबक याज-वर तजकरा झाल्याने गोविंदराव यास मामलत व महादजीपंत शिंत्रे यास कारभार सांगितल्याने तेथील तफावतीचे रुजुवातीस चिमणाजी हरि बिवलकर यास पाठवावयास आज्ञा आली परंतु त्यांचे वडील वारल्यामुळे पांडुरंग राम कारकून रुजुवातीस चालत असल्यास आज्ञा करावी म्हणजे त्यास पाठवू (३३९७४).

**महादजी रघुनाथ आठवले** – (—) आज्ञेनुसार हिशेबासाठी गावकरी आले असून रामाजीपंत कुलकर्णी मांजरीस आले आहेत तेथील नदीस पूर आला असल्याने त्यांना चिठ्ठी पाठवून प्रेषकही तेथे येत असल्याबद्दल (३३९७२).

**यादवराव रघुनाथ** – (—) : आमोद येथील बंदोबस्ताची यादी श्रीमंत नानासाहेब यांनी पाहिली पाहिजे ती यादी आज्ञा झाल्यावर दाखवू म्हणून (३४०४७).

**रायाजी तिमाजी** – (—) : सिबी देवस्थानच्या बंदोबस्ताबाबत रघोजी भोसले याची फौज कोणत्या मार्गे जाणार त्याबाबत विचारणा (३१००३).

**विठ्ठल अनंत केळकर** – (—) : घोडी व माणसे माघारी पाठविली असल्याचे (३४००५).

**सदाशिव अनंत** – (—) : डौलाचा बेहडा करावयास व वहिवाटीचा हिशेब घेऊन पुण्यास जाण्यास कारभारी सांगत असल्याने स्वामी सांगतील त्याप्रमाणे वर्तणूक करीन (३४०४६).

**हरि दामोदर** – (—) : द्वारकाबाईपासून राऊतांनी पैसे कसे हिराऊन घेतले त्याबाबत खुलासा, २९ ज. खर, सु. ११६० / १७ फेब्रुवारी १७६० (३४०२१).

**[फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेलीं]**

(—) – **गोविंद निंबाजी** : कोठीकडील बैलांना वैरण देण्याबद्दल, २७ जिल्काद, सु. ११७८ / २८ डिसेंबर १७७७ (३४०२३).

(—) – **गोविंदराव*** : पा। आवसे व ता। आळूर येथील बाबतीचा ऐवज निंबाळकर यांच्या कारकीर्दीत येत होता तितका अलीकडे येत नसल्याचे, उमरखेड महालात पातशहा मिर्जा यांनी दंगा करून घरे खणून ऐवज व खंडणी घेतली त्यामुळें खूप नुकसान झाले त्याचा फडशा करावा म्हणून तपशीलवार याद पाठविली

पत्रें चालू :

असता फडशा झाला नसल्याबद्दल, जफरुद्दौला याजकडील येणे ऐवजाबाबत काय फडशा केलात तो कळवावा, तालुके हलगरे येथील जाधवराव याचे कारकीर्दीतील बाकी येणे ती फिटली नसता नबाबानी महाल जप्त केला त्यास रुजुवातीसाठी सरकार-तर्फे गणपतराव व्यंकटेश जामीन द्यावा वगैरे स्वराज्याच्या ऐवजाचे नबाबाकडून द्यावयाच्या जाबसालाची कलमें (३३९४२, ३३९४३) (अपूर्ण).

(—) – **नारो आप्पाजी** : पा। वैजापूर येथील फडणिशी सदाशिव यशवंत याजकडे पूर्ववत् दिली असून दसरी रुजू पाहून सनद लिहून देण्याबद्दल, १२ ज. वल, सु. ११७५ / २२ जुलै १७७४ (३३९६४).

(—) – **नारोपंत नाना*** : मोरो गिरमाजी ऐवजाचा फडशा करण्या-साठी एक दोन दिवसांत पुरंदर येथे येणार असल्याने बीडचे तजकऱ्याबद्दल हमीदारास तगादा लाऊ नये म्हणून (३३९७३).

(—) – **पंतप्रधान*** : फिरंग्यांच्या मनसब्याचा बंदोबस्त करण्याबद्दल (३३९९५).

(—) – **बाबुरावजी*** : जळाऊ लाकडांची व उंटांची मागणी (३४०४१).

(—) – **बाळाजीपंत लेले** : रामभट जोगदेव यास नसरापूर येथील इनाम दिलेली जमीन फिरऊन दुसरी देण्याबाबत व गोविंदभट देवळे याची धारादत्त जमिनीची याद लष्करात पाठवण्याबद्दल (३४०२४).

(—) – **भाऊ*** : गोपाळराव गोविंद याचे आलेले पत्र प्रापकाकडे पाठवीत असून त्यांच्या पत्राप्रमाणे ताकीद परवाने व एक भला माणूस सत्वर पाठवून देण्याबाबत (३३९७९).

(—) – **महिपतराव*** : हुजूर पागेकडील घोड्यास दाणा देण्याबाबत (३३९५४).

(—) – **रामचंद्रपंत आबा*** : मोरो गोविंद याजकडून मामलत दूर करून रामाजी महादेव याजकडे सांगितली तेंव्हाचे कराराची यादी पाठऊन देणे, मोरो गोविंद याचा व्याजाचा करार कसा होता व हल्लीचा रामाजी महादेव याचा व्याजाचा करार कसा आहे हे कळवण्याबाबत, मोरोपंत याजकडील कारकून व कल्याण नेरळचे कारकून आणून व्याजाचा हिशेब पाहून रुजुवात करण्याबद्दल (३४०५३).

**[प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख नसलेलीं]**

राजारामपंत यांनी सांगितलेला मजकूर कळला असल्याचे, सत्वर येण्याची विनंती (३३९४४); जासूद कासम अलिखान याजबरोबर खलिता रवाना केल्याबाबत (३३९५६); गंभीरगड हस्तगत केल्याचा मजकूर राघो नारायण सविस्तर निवेदन करतीलच, प्रापकाने रात्रंदिवस खबरदारीने रहाण्याविषयी (३३९५८); जाब लवकर पाठविण्याची विनंती (३३९६१); कारभारी व शागीर्द यास राज्यकारभाराच्या गोष्टी, खर्च वगैरेबाबत समजत नसल्याची तक्रार (३३९६२); लक्ष्मण रघुनाथ याजकडील मामलतीचा गुंता लवकर उरकून त्यास पुण्यास रवाना करण्याविषयी (३३९७६); हुजूर पागेचे व यशवंतराव मुदगल याचे माणसांनी २ बैल लुटून प्रापकाच्या गोटात नेले तेव्हा त्यांस

रुमाल क्र. ६४, पुडके क्र. २ चालू :

पत्रें चालू :

ताकीद करून बैल परत देण्याबाबत (३३९७७); औरंगाबादेची बातमीपत्रें प्रापकाकडे पाठविली असून ती पाहून काय करणे ते सत्वर करावे म्हणून, १३ रज्जब, सु. ११६०/२ मार्च १७६० (३३९८८); नबाबाच्या लष्कराची आलेली चिठ्ठी पाठविली असल्याचे, रहदारीचे दस्तक देण्याची विनंती (३३९८९); शिवनेर किल्याच्या हवालदारास दिलेल्या सनदेवर शिक्का करून पाठविला असल्याचे (३३९९७); एकनिष्ठपणे प्रापकाची चाकरी करीत असल्याचे, सुरतेचा हिशेब ज्यांनी जसा मागितला तसा दिला असल्याचे, त्याबाबत जर लढा असेल तर ज्यास जसा पाहिजे तसा समजाऊन देईन (३४००२); बाबुराव रघुनाथ व बाळकृष्ण केशव यास काही धंदा देणे व मामलतीच्या ऐवजासंबंधी खुलासा (३४००४); दतिया व वोडशास पत्रे देऊन स्वार व प्यादे कुमकेस बोलाविले असून रोजमुरा वसूल केला असल्याचे (३४०१०); ब्राह्मणव्याचे पत्राचा जाब लिहून श्रीमंतांस दाखवून पाठविण्याविषयी (३४०११); हरिसिंग जमातदार याजकडे हत्तीच्या खरेदीसाठी ऐवज घेऊन रवाना (३४०१२); श्रीमंतांस खर्चाविषयी स्मरण करणे (३४०१३); चिमणाजी मोरे याच्या पत्राचा जाब लिहून सत्वर पाठवण्याबद्दल (३४०१४); तीर्थरुपांचे पत्र व त्याचा प्रेषकाने लिहिलेला जाब प्रापकाने वाचून लवकर माघारे पाठविणे, २८ ज. खर, सु. ११६० / १६ फेब्रुवारी १७६० (३४०१५); मसलतीसाठी आप्पा, मुजमदार, फडणीस, बाजीपंत यांना बोलावण्याबाबत (३४०१७); घरगुती मजकूर, भांडेर येथील निकाल लावण्याबाबत (३४०२२); तीर्थरुपांचे पत्राच्या उत्तराचा जाब प्रापकाने काहीतरी योजून लिहावा, २८ ज. खर, सु. ११६० / १६ फेब्रु. १७६० (३४०२५); सागर येथे पत्रें रवाना (३४०२६); श्रीधर बल्लाळ याजकडे स्वार असून थोकडसिंग याजकडे जासूद पाठवून पागेचे स्वार मंजूर करून देण्याबद्दल (३४०२७); आज्ञेनुसार गबत काडीचा कोणासही उपसर्ग देत नसल्याचे (३४०३३); कामाचा बंदोबस्त करण्याचे भाऊंचे व प्रेषकाचे ठरले असून बंदोबस्त करून पत्रें रवाना करावी (३४०३६); श्रीमंतांची चिठ्ठी माघारी पाठविली असून त्यांची व पाटलाची गाठ केव्हा पडणार ते कळवण्याबाबत (३४०३८); आनंदवली येथील इमारतीची कलमवार याद पाठविली असून त्याप्रमाणे तरतूद करून देण्याची आज्ञा करण्याबद्दल, प्रेषकास होईल ती कामे करीत असल्याचे (३४०४०); हजरत यास हकरुसुमाचा ऐवज व ईद निमित्त वस्त्रे व मीर काजम यास तलबेचा ऐवज देण्याबाबत, वर्गवारीप्रमाणे सर्व जमीनदारांकडून वसूल करून पावता करावा, हजरत शरीयजपन्हा व प्रापक मिळून कामकाज करावे (३४०४२); उंटांची मागणी, सनगे देण्याबाबत (३४०४५); तुळजापूर येथे जाऊन सेवेसी येत असल्याचे, श्रीमंतांबरोबर प्रापक गंगातीरास जाणार असे कळल्याने किती दिवस लागतील त्याबाबत विचारणा (३४०४९); गंभीरगड हस्तगत केलात ते उत्तम झाले असल्याबद्दल, प्रापकाच्या उर्जिताची सोय करीत असल्याचे (३४०५५).

यादी :

फत्तेखान वैद्य सौ. काकूसाहेबांस मलम लावावयाकरिता आला असल्याचे मोरोपंत दामले काकूसाहेबांचे समाचारास आले होते म्हणून, काकूसाहेबांचे घरात घुबड आले होते त्यास मारले वगैरे कलमांची, २९ जिल्हेज, सु. १२०९/१५ फेब्रुवारी १८०९ (३३९५५).

रसानगी यादी :

यादी चालू :

मौजे कानसई येथील गाव खोती केसो वामन जोशी याजकडे असून तेथील वतनदार कुळें साष्टी तालुक्यांत गेली असल्याने त्यास गावचे खोत व माणसे आणावयास येतील त्यांचे स्वाधीन करण्याबाबत (३४०५६).

*मूळ नावाची निश्चिती नाही.

---

रुमाल क्र. ६४, पुडके क्र. ३ — सु. स. ११७२–१२१८

का. सं. १२३ (३४०५७–३४१७९) — इ. स. १७७२–१८१८

पत्रें :

**आप्पाजी कृष्ण गोडबोले–शिवरामपंत* व राघोपंत मोडक :** कौटुंबिक ख्याली खुशालीबाबत (३४१२४).

**आप्पाजी चिमणाजी – मोरोपंत दाजी* :** आज्ञेप्रमाणे दादांची योग्य ती काळजी घेत असल्याबाबत (३४१५९).

**आप्पाजी रामचंद्र शिरगोपीकर – रामचंद्र आबा* :** पो भेलसे येथील ताळेबंद पाठविण्यास उशीर कां होत आहे त्याचे कारण, नानाबरोबर पुण्यास येण्याचा मनोदय, १२ सवाल, सु. ११७२/१८ जानेवारी १७७२ (३४१५५).

**आबाजी महादेव वामनराव तात्या* :** आज्ञेप्रमाणे बागलकोट येथे आगमन, तुंगभद्रेपलीकडील माहिती असलेले लोक नोकरीकरितां आले आहेत त्यास परवानगी देणेबाबत, इ. स. १८१५–१८१८ (३४०९२).

**आबाजी शामजी मराठे – लक्ष्मण गोरवले :** गुलसुंद्यास सुखरुप पोहोचल्याबाबत, वेतन ऐवज पट रोख अगर वरात स्वरूपांत देणार त्याची चौकशी, वासुदेव तात्या अभ्यंकर व गणपतराव यांना कामाबाबत सूचना (३४१६६).

**कादरभाई, राहुडकारी – बापू*, आप्पा* व तात्या* :** मालेगांव येथील किल्ला बांडांनी घेतला असल्याने त्याचे पारिपत्यार्थ भरपूर सरंजाम पाठविण्याबाबत (३४०९७).

**काशी शिवराम बेंद्रे–सदाशिव भाऊ* :** किल्ले साताराहून दिनचर्येचे लखोटे आले ते यजमानाकडे पाठवून उत्तर येईल ते प्रेषकाकडे पाठविण्याबाबत (३४०७०); **–महाराज* :** सातारा किल्ल्याचा योग्य प्रकारे बंदोबस्त करण्याबाबत, छत्रपतींचे रक्षण बापू गोखले यांनी करावे व बापू गोखले यास बाजीरावसाहेब यांनी सांभाळावे अशी माईसाहेबांची (छत्रपतींची आई) इच्छा, इ. स. १८१५ – १८ (३४०९४).

**कृष्णराव गोविंद –जिवबादादा* :** साहेबजादे नसुरुतदौले बहादूर पुण्यास श्रीमंतांचे भेटीस येत असल्याबाबत (३४१५२).

**कृष्णराव बल्लाळ-पंतप्रधान* :** पा दाभाडे येथील कमाविसदार स्वराज्य अंमल सुरळितपणे देत नसल्याने त्यास ताकीद करणे म्हणून (३४०६६).

**कृष्णाजी मोरेश्वर कोल्हटकर–त्रिंबकरावजी* :** आज्ञेप्रमाणे पेण येथे गमन (३४१०८).

**रुमाल क्र. ६४, पुडके क्र. ३ चालू :**

**पत्रें चालू :**

**गणपतराव महिपत–बाबा*** : आज्ञेप्रमाणे बडोदे येथे वर्तणूक करीत आहे, पुनर्दर्शनाची अतीव इच्छा (३४०८९).

**गंगाधर शंकर–लखोबा*** : खर्चाचे तजविजीकरितां सरकारी खजिन्याबरोबर बाळाजी रघुनाथ नातू यांचेसमवेत ऐवज पाठविला असल्याबाबत (३४०८०).

**गंगाधर त्रिंबक, सुधागड–बाळाजीपंत*** : प्रापकाच्या सूचनेप्रमाणे काशिनाथपंत दांडेकर यांची रवानगी (३४१०३).

**गोपाळ*–वडील** : आज्ञेप्रमाणे जंबुरे व पायदळ सातारा किल्ल्यावर रवाना, कारखान्याकरितां जुनी माणसे ठेवण्याची सूचना (३४०८५).

**गोविंद महादेव – भाऊसाहेब*** : प्राणसिंग याच्या पुतण्याचे वोडसे येथे आगमन, पजनसिंग याने दीड हजार बंदुका जमा केल्याबाबत (३४०८१).

**गोपाळ महादेव परांजपे–लक्ष्मणपंत गोखले** : प्रेषकाचा मावस भाऊ त्रिंबक नारायण याजकडे असलेली मोइनीची आसामी माधवरावजी साठे यास सांगितल्याबाबत तक्रार (३४१६४).

**गोविंदराव कृष्ण मेहेंदळे–बापू*** : दिनकरपंत वगैरे लोकांच्या कुटुंबियास आसगांव येथे चोरांचा उपद्रव असल्यामुळे वाई येथे ठेवण्याची सूचना ( ३४०९३ ).

**गोविंदराम बागकरी–शामराव गोसावी** : मोंगलांच्या उपद्रवापासून बाग वाचविण्याकरितां स्वारांची मागणी (३४१४२).

**चिमणाजी कृष्ण–रामाजी महादेव घाणेकर** : कौटुंबिक समाचार वृत्त (३४१२५).

**जनार्दन परशुराम–राजारामपंत*** : दोन किल्ल्यावर कामकाजाकरितां नेमणूक केल्याबाबत (अपूर्ण) (३४१११).

**जिवाजी गणेश-पंतप्रधान*** : तिळगूळ पोंच ( ३४११९ ).

**जिवाजी ढमढेरे–पंतप्रधान*** : आज्ञेप्रमाणे जमावानिशी पुण्यास येत असल्याबाबत ( ३४०६५ ).

**त्रिंबकजी पाटील डेंगळे–मैराळ गंगाधर देशपांडे** : प्रापकाकडे चुलतपुतण्या विनापत्य मृत्यू पावल्यामुळे आलेला सरदेसकतीचे निम्मे वृत्तीचा अधिकार प्रेषकास दत्तक घेण्याची परवानगी देऊन प्रेषकाकडे द्यावा अशी पुतण्याच्या स्त्रीची मागणी व त्यावर दत्तक घेता येत नसल्याचा निर्णय (३४११४).

**त्रिंबक सोनदेव–तात्यासाहेब*** : प्रापकाकडील गुरे व मेंढरे बोदड यांनी नेल्याचे वर्तमान, या बातमीची शहानिशा करण्याबाबत (३४१२०).

**दादंभट*–राघोपंत गोडबोले** : पुणे येथील किरकोळ गोष्टींचे वर्तमान व प्रापकाचे घर व्यवस्थित सांभाळीत असल्याचा निर्वाळा (३४१३६).

**दिनकर*–बापूजीपंत दादा*** : समाचारपत्र वरचेवर पाठविण्याबाबत (३४०९६).

**पत्रें चालू :**

**नारो गोविंद–तात्या*** : वासुदेव कृष्ण कारलेकर याने जबरदस्तीने तो कुपे येथील पाटील व जमीदार यांना पुण्यास नेल्याबाबत (३४१५१).

**नारो लक्ष्मण बापट–हरिपंत तात्या जोगळेकर** : फौजेबद्दलच्या कामाच्या विचाराकरितां त्वरित भेटण्याबद्दल (३४०८७).

**नीळकंठ पांडुरंग–अण्णा गोखले** : नानोबा ओक यास प्रापकाने पत्र दिल्यास काम सुकर होण्याची शक्यता (३४१६७).

**परशुराम*–लक्ष्मण गोरवले** : बापूजीपंत पटवर्धन व जयगडचे कारखानीसाकडील वरात वसूल, नादान गावचा वसूल येण्यातील अडचणी वगैरे विविध विषयाबाबत, सु. १२०४–०५/इ. स. १८०३–०५ (३४१३७).

**बळवंतराव नागनाथ-परशुरामपंत भाऊ*** : नागेश्वर सोंडकर याने गंगातीराहून आणलेले तट्टू वीस रुपयास खरेदी करण्याची सूचना (३४१३८).

**बळवंत सुबाराव बाबूराव*** : पुण्याहून रायदुर्गाला जाणाऱ्या रंगोपंत जरेमलीकर याची पुण्यास सोय करण्याबद्दल (३४०७४).

**बाजी राजे शिर्के–शिवरामपंत दाजी** : शंकराजी पाटील लोणकर व येसजी मोरे मौजे कोपरे ता कर्यात मावळ यांचा व देशमुख पायगुडे यांचा पाटिलकीचा कज्जा व कज्यात पायगुडे याचेविरुद्ध निकाल (३४१७१).

**बापूजी गणेश–व्यंकटराव मराठे** : ठाणे कऱ्हाड येथील देवीचे जदीद चौकीदारीवर तमाजी भिकाजी याची नेमणूक करण्याबाबत (३४०५७); – **नारायणराव राजे घोरपडे** : रामचंद्र सदाशिव याने रदकर्जाबाबत वाटेकऱ्याकडून मौजे नांदगांव येथील जमिनीतून ऐवज लावून दिला असता त्यास अडथळा न करण्याबाबत प्रापकास ताकीद (३४११२).

**बापूजी सखाराम, भिकाजी बाबाजी – कादरभाई मिर्धे** : स्वार व तोफासुद्धा मोठ्या मजला करून सरकारांत येण्याबाबत (३४०८२); – **मोरोपंत आप्पा गोरे** : स्वारांसह मोठ्या हुशारीने हुजूर येण्याबाबत (३४०८३); – **पांडुरंग आबा*** : घोडीचे शिंगराची नीट बडदास्त ठेवून घोडी लवकर पाठवून देणे (३४०८८); – **विसाजीपंत नाना*** : प्रापक सातारा मुक्कामाहून निघून मुक्कामास पोहोचल्याची वार्ता (३४१२२).

**बादज तुवा मकसद – राव माधवराव प्रधान** : मौजे तोरवे व कोठ्याहल या गावच्या बंदोबस्तास पाठविलेला विठ्ठल त्रिंबक बंदोबस्त करून परत येत असल्याबाबत (३४१३४).

**बाबाजी गोविंद – लक्ष्मण अण्णा गोरवले** : तसलमात म्हणून सु. १७९२-९३ मध्ये हिशेबांत धरलेले चार खंडी भात प्रत्यक्षात १७९४ मध्ये हातांत आल्यामुळे व इ. स. १७९३-९४ च्या दरांत फरक पडत असल्यामुळे आपणास या व्यवहारांत तोटा येत असल्याची तक्रार, सु. ११९४-९५/इ. स. १७९३–९५ ( ३४१०७ ).

**बालाजी गोविंद – पंतप्रधान*** : तिळगूळ पोंच (३४११८).

**बाळाजी सदाशिव – दादा** (रघुनाथ बाजीराव) : धान्याची पोंच, रामचंद्र व गणपत यास तिळगूळ पोंच, श्रीमंतांचे (माधवराव नारायण) लखोट्याची पोंच, तबेलदार व फरास याजकडील रोजमुरा

रुमाल क्र. ६४, पुडके क्र. ३ चालू :

पत्रें चालू :

ऐवजातून तसलमात वसुली, घरकामास योग्य माणूस पाहून देणे वगैरे विविध विषयांचे कलमाबाबत (३४१६९, ३४१७०).

**भिकाजी आप्पाजी – राघोपंत दादा गोडबोले :** शिंदे बायाकडील रोखे घेऊन आलेल्या स्वारास उठविण्याकरितां प्रापकाने पाठविलेल्या स्वारांचा उपयोग केल्याबाबत (३४१३१).

**महादजी वाघ – विसोबा कापसे :** हरिपंत गोगटे यांचे लखोटे त्यांना पोहोचते केल्याबाबत (३४०८४).

**महादजी सदाशिव – लक्ष्मणपंत अण्णा* :** मौजे खांबेरे येथील आसामी व कलमाविषयी लिहिल्याप्रमाणे न झाल्यास प्रेषक आल्यावरच ते काम पूर्ण करावे (३४१६५).

**माधवराव गोविंद – बापू* व आण्णा* :** सदाशिवभाऊ गोखले याजकडे जमिनीविषयी चौकशी, जेऊर, डोंगरगड येथे अरबांना येण्याविषयी पत्र, रामचंद्र जेऊरकर याजबरोबर आलेले आडहत्यारी जेऊर येथे गेल्याबाबत, किल्ल्यातील जुन्या सामानाची विल्हेवाट लावण्याबाबत (३४१७२); जांबगावास विंचूरकर यांचा मुक्काम, बरीच फौज किल्यात (नगर) रवाना, अंमळनेर येथील फौज शहराकडून माघारी, गंगेपलीकडील लष्कर माघारी, किल्लेकरी यांचा रोख शहरावर वगैरे कलमाबाबत (३४१७३).

**मोरो भिवराव, कासेगांव – नारोपंत नाना* :** पागेकरितां दाणा खरेदीकरितां बैल पाठविले ते दाणे भरून पाठविण्याबाबत (३४०६४).

**मोरो यादव साठ – सदाशिव दादा* :** विजयदुर्गाचे दहा सिबाडे भात घेऊन जावे असा दादांचा लकडा व निरोप देण्याची टाळाटाळ, त्रिंबकास आलेल्या लष्करास मुलखाची खराबी न करता जाण्याची सूचना (३४०७५).

**मोहिद्दीन खोत – बळवंतराव* :** मौजे मुधर खुर्द या गावास वसुलीबाबत तसदी देत असल्याचे तक्रारीस उत्तर (३४११०).

**येसाजीराम* – रामचंद्रपंत* :** प्रेषकाविषयी अगत्यवाद धरून पूर्वी लिहिलेल्या दोन कलमाबाबत (३४१६१).

**येसाजीराम* – रामचंद्रपंत दादा* :** स्मरणपूर्वक योग्य तो जाबसाल करण्याची विनंती (३४१६२).

**रामचंद्र गोपाळ गद्रे – राघोपंतदादा* :** का ओतूर येथील वैरण कहीवाले जबरदस्तीने नेत असल्याची तक्रार व त्याचा बंदोबस्त करण्याची मागणी (३४१३५).

**रामचंद्र व्यंकटेश – राघोपंतदादा* :** बोलणी करावयास त्वरित पुणे येथे येण्याची विनंती (३४०५८).

**रामराव गणेश देशमुख – गणपतराव काका* :** वासुदेवराव यास हिशेबासंबंधी तेथे पाठविले आहे तरी त्यास मार्गदर्शन करण्याची विनंती (३४१५६).

**रामशास्त्री* – मोरोपंत* :** बालोजी पलांडे याचा जावई विठोजी पाटील सातकर याचा व देशमुखाचा देण्याघेण्याचा कजिया व त्याबाबत चौकशी करण्याविषयी (३४१२३).

**रामाजी मल्हार – कुसाजी पाटील :** मौजे निंबगावजावळीहून पाठविलेल्या गव्हाची पोंच व त्याकरितां आणलेल्या उंटाचा खर्च वगैरेबाबत (३४०७३).

पत्रें चालू :

**वामनराव गोविंद – बाबाजीपंत नाना* :** ता। आमदानगर येथील निम चौथाई वगैरे मोकासा अंमलावर नेमणूक केलेल्या गणेश पांडुरंग यास तो ऐवज नियमित मिळत नसल्याची तक्रार (३४०६१); – कृष्णाजीपंत नाना* : मौजे ढवल का फलटण येथील पाटिलकीचे वतनासंबंधी पाठविलेल्या पत्रावर शिके करण्याबाबत (३४१७८).

**विश्वनाथ नारायण – सदाशिव* दादा :** कर्ज ऐवज परत न देता गैरवाका करणाऱ्या हणमंतराव यास ताकीद करून प्रेषकास वाजवी वसुली करून देण्याबाबत (३४०७१).

**विष्णु पांडुरंग गोखले – राघोपंतदादा* :** बारभाईचा तजेवडीस कही करण्याचा उद्देश रोखून धरण्याची मागणी (३४१२८); हिंमत बहादूर पठाण याचे स्वार मौजे आरवी येथून उठवून लावल्याबद्दल व गावचा बंदोबस्त केला त्याबाबत (३४१२९); पुण्याहून आलेल्या शिंदे यांचा तोफखाना खेड मुक्कामी असून पुढे जुन्नर येथे जाणार असल्याची आवई (३४१४८).

**विष्णु सदाशिव, मु. शेवाळे–मामा* व बाबासाहेब* :** श्रीमंतांची घरखर्चास दिलेल्या ऐवजाची वरात रवाना (३४११५).

**विसाजी केशव, मु. वसई – दादासाहेब** (रघुनाथ बाजीराव) : बेलापूर येथे नवी इमारत करण्याबाबत, इ. स. १७७६–७७ (३४१४३).

**विसाजी देवराव – भिकाजी आप्पा* व बापू स्वामी* :** स्वारी जामदार व फरासखान्यासह किल्ल्यावर हजर झाल्याबद्दल (३४१००).

**शंकराजी केशव – पंतप्रधान* :** आज्ञेप्रमाणे खानदेशाहून जेजालदार व जेजाला पाठविल्याबाबत ( ३४१०४ ).

**सखाराम भिकाजी सहस्रबुद्धे – बापू जोगळेकर :** ऐवज फेड करण्याची निकराची मागणी ( ३४१५३ ).

**सदाशिव आप्पाजी लेले – बाळाजीपंत दादा* :** तिळगूळ रवाना केल्याबाबत, पौष व. १३, सु. १२१६/२७ जानेवारी १८१६ (३४१२१).

**सदाशिव नारायण देशमुख – चिंतो वामन :** गावांत फार दरवडे पडत असून मामलेदार याजकडून त्याचा योग्य तो बंदोबस्त होत नसल्याने शिपायांच्या रोजमुऱ्यासह गावचा बंदोबस्त करण्याबद्दल, गोविंदपंत पोंक्षे याजविरुद्ध कर्ज ऐवजाबाबत तक्रार (३४१४०, ३४१४१).

**सटवोजी सातवराव – पंतप्रधान* :** घरास जाणाऱ्या आमच्या भोयास कासेगांव येथे अंताजीपंत यांनी धरून कैद केले त्यास सोडून देण्याबाबत (३४०६८).

**सोनजी नाईक गायकवाड – राघोपंतदादा* :** कसबे खेड येथे कंपूची फौज आल्याची आवई आल्यामुळे त्याचे बंदोबस्तासाठी खेड येथे रहाण्याची आवश्यकता असल्याबाबत (३४१३३).

**संताजी घुमे – राघोपंत दादा गोडबोले :** राऊत व गारदी यांनी का मढ येथे जो दंगा चालविला त्यासंबंधी तीव्र नाखुषी व या संबंधात शिवाजी भोसले यास ताकीद करण्याबाबत (३४१५७).

रुमाल क्र. ६४, पुडके क्र. ३ चालू :

पत्रें चालू :

**हरि शिवराम – पांडुरंग अण्णा केतकर :** प्रापकाचे मुलामाणसावर मौजे पददवली ता अवचितगड येथे दरवडा पडला त्याचा तपास बंदर पेणचे मामलेदारांनी ढाणगाव येथे लावला असता प्रापक कारकुनासह तडजोड करीत असल्याची बातमी व त्याकरितां प्रापकाने कागदपत्रासह प्रेषकाकडे येण्याबाबत (३४११७).

[फक्त प्रेषकांचा नामोल्लेख असलेलीं]

**कारकून नि झाशी – (—) :** नर्मदा उत्तरतीरचा प्रांत इंग्रजांनी लावून घेतल्याने बांद्यास ती सनद दाखवून त्यांस उत्तर काय पाठवावे याबाबत विचारणा (३४०९९).

**गोपाळ बल्लाळ वैद्य–(—) :** पुणे येथील आपल्या वंशपरंपरा जागेबाबत वाटणीचा कजिया करणाऱ्या चिटको मल्हार यास ताकीद (३४०६९).

**गंगाधर* – (—) :** श्रीमंत मातुश्री बाईसाहेब यांच्या आज्ञेप्रमाणे सदाशिव रामचंद्र यास लोहगड किल्ल्यावर अटकेत ठेवला असून भास्कर रघुनाथ याची हुजूरकडे रवानगी (३४१२७).

**गोविंद शिवराम – (—) :** मुकुंदजी नाईक याजकडील विनंती पत्र पाठवीत असल्याबाबत (३४१५४).

**धोंडजी नाईक – (—) :** हुजूरकडून पाठविलेल्या माणसाबाबत, जुन्या लोकांचा भरवसा देता येत नाही, फितुरी होण्याची शक्यता, तोतयाकडील माणसे किल्ल्यात आहेत, भिकाजीपंत शामलाकडून येऊन गाव जाळू लागले असल्याने त्यांचा बंदोबस्त करण्याबाबत (३४१३०).

**बालाजी बाबूराव – (—) :** शास्त्रीबुवांच्या आज्ञेप्रमाणे येत असल्याचे (३४०६३).

**मोरो यादव साठे – (—) :** भगीरथ याजबरोबर त्रिंबकचे कागद व ऐवज पाठविण्याबाबत (३४०७८).

**राघो विश्वनाथ गोडबोले – (—) :** भास्करपंत याजकडील जमादिलावल व जमादिलाखर या महिन्यांचे ताळेबंद पाठविण्याबाबत (३४११३).

**रामजी नाईक घोगरे – (—) :** नबाबाची चौकी बसल्यामुळे बातमी देता आली नाही म्हणून खुलासा (३४१६०).

**विष्णु पांडुरंग गोखले – (—) :** शिंदे यांचा मुक्काम मौजे सविणे येथून जुन्नरास मोरोबादादा याजकडे येणार असल्याची बातमी व त्यामुळे प्रेषक प्रापकाकडे येऊ शकला नसल्याबद्दल गाव लुटला गेला असताही हकदार वसुलाचा तगादा करीत असल्याबाबत नापसंती (३४१५०).

**विसाजी अनंत – (—) :** आनंदराव भिकाजी कुलकर्णी व राणु ढवळा या उभयतांनी सरकार शेरी जमीन भागीदारीत केली असता आनंदराव ढवळा यास वाटणीचा भाग देत नसल्याची तक्रार (३४१४४).

**विसाजी व सखो अनंत – (—) :** मौजे बोरी पार्धी ता पाटस हा मामलेदाराच्या मसाल्यामुळे उजाड झालेला गाव अभयपत्र घेऊन पुनर्वसन केला असता आबा तटू याजकडून उपद्रव होत असल्याची तक्रार (३४१४५).

पत्रें चालू :

**हरि महादेव काडके – (—) :** खेडीपलीकडे खालापूरजवळ दोन पलटणे आल्याची बातमी तरी लोक व कारकून पाठविण्याबाबत (३४०९८).

**हरी बल्लाळ – (—) :** कीर्द व खतावणीकरिता कागदाच्या गठ्ठ्या पाठविण्याबाबत (३४०७९); शिलेदारास नालबंदी ऐवज देण्याबाबत (३४१७६).

**हरी मोरेश्वर शेंडये – (—) :** आज्ञेप्रमाणे उमरावतीच्या मार्गे पिंपळगाव येथे मुक्काम केल्याबाबत (३४०९१).

[फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेलीं]

(—) – **आप्पा* :** का ओझर प्रांत नाशिक येथील सटवोजी पाटील यास बचावा मोगल याने दिलेल्या शंभर रुपये कर्जाबाबत प्रेषक जामीन, तो कर्जव्यवहार पुरा झाल्यामुळे जामीनकतबा रद्द करण्याची प्रेषकाची मागणी (३४१०९).

(—) – **जयवंतराव रघुनाथ :** शिराळे मुक्कामी खासा स्वारीचे दिमतीकरितां स्वार पाठविण्याची आज्ञा, २० ज. वल, सु. १२०३ / १८ सप्टेंबर १८०२ (३४१३९).

(—) – **नारोपंत नाना* :** मौजे टेंगाडे येथील बंदोबस्त करण्याची विनंती (३४०८६); कडेकराच्या अदावतीमुळे मोगलांनी उध्वस्त केलेला डोणगांव धोंडोपंत यांनी पुनर्वसन केला पण गावचा अंमल प्रतिनिधी, अमरसिंग जाधव व सचिव याजकडे असल्यामुळे गावकऱ्यांस तिघांकडून होणारा उपद्रव टाळण्यासाठी मदत करण्याची विनंती (३४१३२).

(—) – **पंतप्रधान* :** आज्ञेप्रमाणे दसूरचे वाणी याजकडून गल्ला खरेदी करण्याकरितां ऐवज पाठविण्याबाबत (३४११६).

(—) – **बाळाजी पंतप्रधान :** प्रापकास व केशवराव यास पत्रे लिहिली आहेत ती समग्र वाचून समर्पक उत्तरे देण्याची विनंती (३४१०६).

(—) – **बाळाजीपंत पैठणकर :** का वामोरी येथील कुलकर्णाची गुमास्तगिरी असलेल्या सदाशिव केशव याचा पत्ता देण्याबाबत (३४१६३).

(—) – **मोरोपंत दादा* :** कागदपत्र करून ताळेबंद तयार करून घेण्याबाबत (३४१४९).

[प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख नसलेलीं]

पूर्वी ठरल्याप्रमाणे भगवंतपंत यांस पाठविले असून, सर्व कामे बाजूला ठेऊन त्यांच्याशी बोलणी करावी (३४०५९); सुभानजी थोरात याजकडील जप्त केलेल्या कुंभारी वगैरे गावावर सरकारतर्फे नेमलेल्या गोविंद देव यास त्रास देणाऱ्या त्रिंबक काका यास ताकीद देण्याबाबत (३४०६०); महादजीपंत याजकडून कृष्णाला द्यावयाकरितां घोडी पाठविली त्याची पोंच (३४०६२); विसापुराहून आल्यावर नथोजी गावडा यास आपणाकडे पाठवीत असल्याबद्दल (३४०६७); घाट चौकशीस पुण्याहून आलेल्या कारकुनास गोपाळराव बल्लाळ याचे नाव सांगण्याबाबत (३४०७२); पा चांदवड येथील अंमलाची

रुमाल क्र. ६४, पुडके क्र. ३ चालू :

पत्रें चालू :

मोकळीक करण्याबाबत होळकरास पत्र लिहिण्यासंबंधी (३४०७६); पो चांदवडची मामलत होळकराकडून अंताजी बापूजी निगा सेटे याजकडे असून होळकर याजकडे ऐवज येणे असता मामलतीची जप्तीची मोकळिक करण्याबाबत (३४०७७); फराची चाहूल लागल्यामुळे जमाव फलटण नजिकच्या अंबराईत दडून बसल्याबाबत (३४०९०); किल्ले लोहगड व विसापूर येथून आलेले पत्र व शिपाई छावणीकडे पाठवीत असल्याबाबत (३४०९५); प्रेषक प्रापकाच्या आज्ञेबाहेर नसल्याची ग्वाही (३४१०१); सावजी पांडुरंग व जिवाजी साबाजी या उभयतांना जामीन रहाण्याबाबत कतब्यावरच लिहून घेण्याविषयी (३४१०२); दहीठाणे येथे वस्तीस राहिलेल्या राणोजी भोईटे याची चोरी झाली त्याबाबत दादोबा, गावकरी वगैरे लोकास ताकीद करण्याबाबत (३४१०५); पुण्यांतील बागास लष्करचे लोकाकडून उपद्रव लागतो त्याचा बंदोबस्त करण्याबाबत, ६ रजब, सु. ११७९ / ३१ जुलै १७७८ (३४१२६); तोफखान्याकडील लोकांच्या रोजमुऱ्याबाबत उपद्रव, तोफेवर कोणीही माणूस नसल्याची तक्रार (३४१४६); पाचेगाव येथील खर्चपट्टी वसुली, वरात ऐवज पाचेगावकडे दिल्याबाबत, कडलास व पाचेगाव येथील सोनारांचे कजियात जो खोटा ठरेल त्याजकडून गुन्हेगारी घेण्याबद्दल (३४१४७); बेलापूरकडे स्वार पाठवून त्यांची सोडवणूक करण्याची अजिजीची विनंती (३४१५८); आताडीचे गाव जाळल्याबाबत विसाजी कृष्ण यास आज्ञा झाली असता ते काम तो करीत नाही, परंतु प्रेषकास आज्ञा झाल्यास प्रेषक ते काम करण्यास तयार असल्याबाबत (३४१६८); येमाजी बनकर याचा पागेकडील हिशेबातील गैरव्यवहार, विसाजीपंत बापू व बापू गोखले याजकडील पागेच्या देण्याघेण्याच्या ऐवजाबाबत, महमद अफरोद्दीन याजकडील हिशेबाच्या तपासणीबाबत (३४१७४); गोपाळपंत भाऊ याजकडील तोफा व पायदळ यांचा शहरचे बंदोबस्ताकडे उपयोग करण्याबाबत, किल्ले सातारा येथील बंदोबस्ताबाबत (३४१७५); नालबंदी द्यावयाच्या निरनिराळ्या लोकांची यादी व ऐवज देण्याची विनंती (३४१७७); बापूजी व यशवंतराव पाटील या उभयतांतील भाटेपुरी येथील पाटीलकीच्या कजियांत यशवंतराव याचे बाजूने निकाल लागूनसुद्धा बापूजीची दांडगाई सबब बापूजीचे पाटिलकीचे गाव जप्त केल्याबाबत (३४१७९).

*मूळ नांवाची निश्चिती नाही.

---

रुमाल क्र. ६४, पुडके क्र. ४ — सु. स. ११२१–१२०६

का. सं. ११५ (३४१८० – ३४२९४) — इ. स. १७२० – १८०६

अर्जदास्त :

**नारायणगांव येथील वतनदार-पंतप्रधान*** : हंगामाचे दिवस असल्यामुळे मागविलेल्या सुतारांपैकी एका सुताराची रवानगी (३४२९४).

कतबा :

**मलकर येथील मोकदम – (—)** : मलकर येथील ठरविलेली खंडणी सरकारांत भरण्याची कबुली, १५ जिल्काद, सु. ११६९ / २४ मार्च १७६९ (३४२७३).

जबानी :

**रामजी पाटील दुंबारे–रावजी देशमुख** : शेतासंबंधी भावाभावांतील असलेल्या तंट्याबद्दल ठाण्यांतील लोकांनी गुन्हेगारी घेतली असून आतां देत असलेल्या उपद्रवाबद्दल (३४१८१).

पत्रें :

**अंताजी यशवंत–राघोपंत सुभेदार** : आशाराम भावस्कर याजकडील भवानी गुजर जुन्नरकर यांच्या कर्जाचा करावयाचा फडशा (३४२१९).

**अंताजी रुद्र–भाऊसाहेब*** : ठाकूर व कोळी यांच्या वस्तीचा गांव असून माल व ऐवजाखेरीज कर्जपट्टीचा तगादा केल्यास रयत परांगदा होण्याची भीति, जीवनमाफक वसुलाची आज्ञा केल्यास कर्जपट्टीच्या वसुलाची शक्यता, आजारपणामुळें जहागिरी, मोकासा व सरदेशमुखीच्या फडशास विलंब (३४२६१).

**अन्नपूर्णाबाई*–राघोपंत गोडबोले** : कन्यादानासाठी लागणाऱ्या ब्राह्मणाबद्दल खुलासा मातुश्रीबाईस देवाज्ञा (३४२४०).

**आप्पाजी केशव बिवलकर–सदाशिवपंत साठे** : पागेच्या हिशेबापैकी देणे निघालेला ऐवज सुभेदारानी खाजगीकडे खर्च लिहिला असून गणपतराव बापू सरसुभेदार यांनी तो ऐवज बाळाजीपंत याजकडून वसईकडे नेमल्याबद्दल व त्याच्या वसुलीबद्दल (३४२९२).

**इमाम पाटील कुंडलवाडीकर – मिरा पाटील कुंडलवाडीकर** : कुरलदकर याजवर सरकारांतून मसाला केला असून त्यास मनाचिठी घेण्यासाठी कारभाऱ्यांसह सत्वर येण्याची विनंती (३४२६७).

**उंबरज येथील शेरीकर मोकदम–राघोपंतदादा*** : प्रेषकाची रवानगी (३४१८३); उंबरज येथे बाळोजी कुंजीर याच्या कहीकडून होणाऱ्या उपद्रवाबद्दल कहीस करावयाची ताकीद (३४२३८).

**कृष्णाजी गणेश ओक–लक्ष्मणपंत गोखले** : सुपाऱ्या व संक्रांतीचा तिळगूळ रवाना (३४२५४).

**कृष्णाजी हरि–बाळाजी अनंत** : चिमणाजी हरि याच्या उदरनिर्वाहाची चांगली सोय करण्याबद्दल, कान्होजी मोहिते यास मुशाहिऱ्याबद्दल रुद्राजी धुळप यास आदेश, सु. ११६२ / इ. स. १७६१-६२ (३४२७४).

**केशव गोपाळ–आप्पा** (चिमणाजी बल्लाळ) : गणेश कृष्ण याची घोडी व वस्तभाव दमाजी पिसाळ याची नसून डोंगरी लोकांची आहेत व त्यांनी मुलूख लुटण्यासाठी निमित्त केल्याबद्दलचा पुरावा म्हणून पिसाळ याची मिळालेली पत्रें रवाना व सर्व घोडी कृष्णाजी शिवदेव याच्या स्वाधीन करणार असल्याबद्दल, इ. स. १७२०–४० (३४२६२).

**केशव राम आपटे–लक्ष्मणपंत गोखले** : रवाना करावयाचे दप्तर नीळकंठराव हशमनीस याच्या घरी राजापूर येथे रवाना, भानू यांच्या कारकीर्दीतील पुण्यांतील कागदपत्र होळकरांच्या दंग्यांत गहाळ झाल्यामुळे त्याबद्दल तगादा न करण्याची विनंती, नीळकंठराव यांनी भानू यांच्या मामलतीच्या वहिवाटीचा ऐवज स्वतःच्या खाजगीकडे जमा केला असून हिशेबाच्या फडशासाठी तो त्याजकडून घेण्याबद्दल (३४२५८).

**गणेश भास्कर घारपुरे–राघोपंत गोडबोले** : जुन्नरी कागदांची मागणी (३४२३२).

रुमाल क्र. ६४, पुडके क्र. ४ चालू :

पत्रें चालू :

**गुंजाबाई*–राघोपंत गोडबोले :** काकांच्या औषधासाठी सोनेरी वर्ख रवाना, काकांना बरे वाटल्यावर येण्याची सूचना (३४२२६); ताईसाहेबांची मर्जी सांभाळण्याबद्दल (३४२३९); संक्रांतीचा तिळगूळ रवाना (३४२४१); बाबासाहेब यांचे पत्र असल्यामुळे बाबासाहेब यांजकडे सत्वर येण्याबाबत (३४२४४).

**गोपाळ जोशी गोटणकर–लक्ष्मणपंत गोखले :** शेला, पागोटे व कागद यांची मागणी, महिन्यानंतर पुण्याला येणार असल्याबद्दल (३४२५५).

**गोपाळ महादेव परांजपे–लक्ष्मणपंत गोखले :** चिमाजी कारखानीस याजकडील प्रापकाच्या गल्याच्या ऐवजाबद्दल त्याच्या दोन वर्षांच्या वेतनाचा ऐवज मिळत असल्यास घेण्याबद्दल व कारखानिसी जप्तींत असल्यामुळे दुसरा इलाज नसल्याचा खुलासा (३४२५१).

**गोविंद कृष्ण–पंतप्रधान** (बाळाजी बाजीराव) : किल्ले अजमेर येथे संगमरवरी दगडाच्या व मूर्तींच्या कामावर सरकारतर्फे शामजी विसाजी याची नेमणूक असून ते काम प्रामाणिकपणे करीत असल्यामुळे त्यांचा उत्कर्ष करण्याची विनंती व मूर्ती व दगडांच्या गाड्यांच्या रवानगीबद्दल खुलासा, २० साबान, सु. ११६० / ७ एप्रिल १७६० (३४२०१).

**गोविंद चिमणाजी केळकर – राघोपंत* :** श्रीमंतांस ताप येत असल्याबद्दल (३४२३६).

**गोविंदराव सदाशिव परांजपे – रावोपंत गोडबोले :** कृष्णंभट चक्रदेव यांच्या मुलीशी नारायणराव यांचे लग्न ठरविले असल्याबद्दल व लग्नाचे आमंत्रण (३४२५७).

**चिंतामण जोशी –दादासाहेब* :** वर्षासनाच्या व श्रावण महिन्याच्या दक्षणेबद्दल श्रीमंतांशी झालेले बोलणे (३४२६३).

**चिमणभट घाणेकर – गोविंदपंत व आबाजीपंत सोहनी :** संक्रांतीचा तिळगूळ रवाना (३४२७०).

**चिमणाजी बल्लाळ–राघोपंत* :** प्रापकाकडे कर्जाबद्दल राहिलेल्या बाकीचा नांवनिशीवार तपशील रवाना (३४२२७).

**जिरेगांव येथील शेरीकर मोकदम–रावजी सुभेदार :** जिरेगांव येथील बाकीबद्दल आबा तट्टू यांनी जबरीने पत्र घेऊन त्याला देशपांडे जामीन राहिल्यामुळे देशपांडे यास तट्टू याजकडून व गांवास देशपांडे याजकडून होणारा उपद्रव (३४२८६).

**त्र्यंबक राम ओक – राघोपंत* :** स्वतःच्या अजमास वगैरे कामासाठी प्रापकाची जरूरी (३४२३१).

**दादंभट खरे – राघोपंत गोडबोले :** बाळाजीपंत यांच्याशी ओळख करून घेण्याबद्दल, संक्रांतीचा तिळगूळ रवाना (३४२४२); श्रीमंतांनी पत्र दिल्यामुळे सरकारांत सत्वर येण्याची विनंती (३४२४३).

**द्वारकागिरबाबा गोसावी – दादासाहेब* :** शाबाजी भापकर जात असतांना वाटेत अटकाव होऊ न देण्यासाठी करावयाचा बंदोबस्त (३४२५९).

**नरहर जिवाजी – नाना* :** आसखेडे येथील शेतसारा, बाकीच्या मागणीबद्दल (३४१८७).

पत्रें चालू :

**नारायण* – बाबाजीपंत* :** देणे असलेल्या ऐवजापैकी कांही ऐवज हरिपंत याजकडे पोहोचता केल्याबद्दल, तोफा लाऊन सोरटीचे ठाणे काबीज व तुंगभद्रेकडे जाण्याचा विचार, शत्रूची फौज सावनुराजवळ राम नदीकाठी असून त्यांचा छापा घालण्याचा विचार (३४२७७).

**नारो जनार्दन – पंतप्रधान* :** भिकाजी बाडेकर याजबरोबर पाठविलेल्या घोड्यासंबंधी निवेदन, घोड्यांसाठी भिकाजी व संभाजी शिंदे याजकडे रोजमुरा आदा (३४१९२); तांदूळ, साखर, सिताफळें वगैरे जिनसांची पोंच (३४१९३).

**नारो नीळकंठ साने – हरिपंत देवधर :** बर्वे मुकादम कर्यात नेवरे यांनी नेवरेपैकी नेमून दिलेल्या वतनी जमिनीस बांधासाठी खर्च केला असून २४ वर्षांच्या इस्ताव्याचा कौल असल्यामुळे सुभ्याच्या कारकुनाने तालुक्याच्या झडतीस बर्वे याच्या नांवे धारा सूटखर्च लिहिल्याप्रमाणे सरकारी दप्तरांत वहिवाटून घेण्याबद्दल (३४२६६).

**नीळकंठराव रामचंद्र – बाबूराव सुभेदार :** संक्रांतीच्या तिळगुळाची पोंच (३४२६८).

**परशराम* – लक्ष्मणपंत गोखले :** किल्याकडील व सुभ्याकडील नेमणुकेबद्दल पत्रें रवाना व सदाशिवपंत शेवडे पुण्याला आले असून त्यांजकडून वरील नेमणुकेबद्दल बाळाजीपंत यास पत्र घेण्याची विनंती व वसुलीचे काम अद्याप न झाल्याबद्दल, श्रावण शु. १, सु. १२०६/ २७ जुलै १८०५ (३४२४५); वसुलीस शिपाई देण्याबद्दल किल्लेदार, हशमनीस यांना गोखले मामलेदार याचे पत्र पाठविण्याबद्दल, प्रेषकास मागणी केलेल्या वस्तु देण्याबद्दल रत्नागिरी येथील बंधूजी व आप्पाजी कारखानीस यांना पत्रें पाठविण्याची विनंती (३४२४६); रत्नागिरी येथील सुभेदाराच्या पत्राचा जाब रवाना, महादजीपंत जकातदार संगमेश्वर येथे गेल्यामुळे अंताजीपंत यांजजवळ पत्र दिल्याबद्दल, १ सफर, सु. १२०२/१३ जून १८०१ (३४२४७); मामलतीची घालमेल होतेवेळी मामलेदार हिशेब देत असल्यामुळे त्यावेळी गावाकडून वसुली मिळत नसल्यामुळे मामलेदाराकडून वराता स्वीकारीत असल्याबद्दल, वसुलास शिपायाची जरुरी, आबा साने मामलेदार यांनी तालुके अवचितगड येथील नेमणुकी बाद घातल्याबद्दल (३४२४८); आबा साने गंगेस गेल्यामुळे त्याजकडील कारकुनास गोपाळपंत याजकडून पत्रें दिली असता ती ठेऊन त्यांनी अडीच खंडीची मखलाशी करून घेतल्याबद्दल व बुडित गांवांवर बाकी नेमून दिल्यास वसूल मिळत नसल्याचा खुलासा (३४२४९); सदाशिवपंत शेवडे याजकडून प्रेषकासाठी पुण्यास मोठ्या आसामीची नेमणूक करून घेण्याबद्दल, गांवगन्ना वसुलीसाठी किल्याकडील लोक देण्याबद्दल, सदाशिवपंत शेवडे व बाळाजी गंगाधर कुळकर्णी यांची पत्रे किल्याकडे पाठविण्याबद्दल (३४२५०).

**बहिरो महादेव मेहेंदळे – नारोपंत :** पुतळाजी फावडे याजकडून येणे असलेला ऐवज मागून घेण्याची विनंती (३४२७५).

**बाळाजी दादाजी – नाना* :** आराई संवदाणे येथून लोहनेर येथे जाण्याचा विचार, नवापूर येथील गांवगना रुजुवातीच्या जकातीच्या कच्च्या हिशेबाचे कागदपत्र पिसोळ किल्यावर असून ते काळो गोविंद कारकून याजबरोबर रवाना करण्याविषयी (३४२८३).

**बाळाजी पांडुरंग महाजन – लक्ष्मणपंत गोखले :** तर्फ अवचितगड येथील दप्तरदारीचे स्वतःचे साल असतांनाचा मामलेदार धडपडे

रुमाल क्र. ६४, पुडके क्र. ४ चालू :

पत्रें चालू :

परागंदा झाल्यामुळे वेतन, वर्षासन वगैरेंच्या न मिळालेल्या ऐवजासाठी हिशेब रवाना (३४२५६).

**बाळाजी मोरेश्वर पुरंदरे – राघोपंत*** : रावसाहेबांकडून मैराळ देवाजी रबडे चिंचवडकर करीत असलेल्या परगणे होनगुंद येथील मामलतीवर ऐवज भरणा सरकारांत झाला असून दरबार खर्चाचा ऐवज राहिल्याबद्दल, सनदेप्रमाणे महाली वेतन व कारकुनीचा ऐवज देण्याबद्दल मामलेदारास ताकीद करण्यासाठी प्रापकाची जरुरी (३४२२९).

**बाळाजी व्यंकटेश – राघोपंत*** : स्वतःच्या व कुटुंबाच्या उदरनिर्वाहाची सोय करण्याची विनंती (३४२३०).

**बाळाजी सदाशिव – दादासाहेब*** : कोठीच्या कामावर वाकनिसाच्या कारकुनाच्या जागी परशराम यास नेमले असतां पुन्हा वाकनिसाकडील कारकुनाच्या करावयाच्या नेमणुकेबद्दल अयाराम याजकरवी श्रीमंतांकडे करावयाची खटपट, शिंदे यास श्रीमंतांकडून निरोपाची वस्त्रे व शिंदे यांचे मांजरी येथे कूच (३४२०५ – ३४२०७ अ); रावसाहेब यास पत्र प्रविष्ट, बाजीपंत याजकडील बाकीबद्दल शिंदे यांस वरी आणण्याचा बेत (३४२०८ – ३४२११); सोनेरी वखीची करावयाची रवानगी, आनंद नाईक याजकडील बाकीबद्दल, खाजगीवाले याजकडील खाजगीचे काम काढून हरीपंत फडके याचे भाचे परशरामपंत याजकडे सुपूर्त (३४२१२, ३४२१३); लोकांकडील ऐवज वसुली, ऐवजाबद्दल बाळाजी व्यंकटेश यास पाठवावयाचे पत्र (३४२१४, ३४२१५); बाळाजी व्यंकटेश याची करार करावयाची यादी सांपडत नसल्याबद्दल, खुशालचंद व लालचंद हे मागत असलेल्या ऐवजाबद्दल, उंदेरीकरांकडील वसुली, पथाजी सरवर फरास याजकडील ऐवजाचा बाळाजीपंत आंबेकर याने घेतलेला हवाला (३४२१६, ३४२१७); यजमानांचे पत्र गेल्यामुळे प्रापकाच्या आगमनाची अपेक्षा (३४२१८).

**बीड येथील जमीनदार – पंतप्रधान*** : बीड येथील सरदेशमुखीच्या सनदेप्रमाणे बदूजी अंताजी याजकडे जमा झालेल्या वसुलाच्या तुमार वासलातीचा हिशेब रवाना (३४२८०).

**भानजी चिमणाजी फौजदार – पंतप्रधान*** : वाकळकर वाघ व सोनवणी यांच्यांतील वाकळ येथील मोकदमीच्या तंट्याचा निकाल लागला नसतांना वाघ यांनी जगदेवराव जाधव याजकडील गुमास्तगिरी मिळऊन वाकळ गांवास व सोनवणी यांच्या कुटुंबास ऐवजासाठी दिलेल्या उपद्रवाबद्दल करावयाचा बंदोबस्त, वाघ याच्या मुचलक्याची नक्कल रवाना (३४२००).

**भास्कर भिमाजी जोशी – राघोपंत गोडबोले** : पासोडीची पोंच व केरोजी वीर याजबरोबर बयाबाईस पाठविण्याबाबत (३४२३७).

**भिकाजी आप्पाजी – राघोपंत*** : गाय खरेदीसाठी मावळमध्ये गड्याची रवानगी (३४२२२).

**भिकाजी गोविंद – नाना*** : जंजीरकरांच्या महालांत करावयाच्या बागायतीच्या पहाणीसंबंधीचा तपशील (३४१९१).

**मल्हारजी होळकर – पंतप्रधान*** : बनासनदी येथे मुक्काम व संक्रमणाच्या तिळगुळाची पोंच (३४१९४).

पत्रें चालू :

**महिपतराव प्रल्हाद – नाना*** : सरकार नांदेड येथील बाबतीची मामलत राघोपंत याजकडे करार केल्यामुळे सरकारांत भरलेला ऐवज, राघोपंत यांनी मनोती म्हणून दिलेला ऐवज, राघोपंत यांच्या नांवे करावयाच्या मामलतीच्या सनदा, भोसले यांजकडील वरघाटपैकी पाच महाल प्रेषकाकडे करार (३४१८६).

**महिपतराव सखाराम – दादा*** : तिळगुळाची पोंच, दरकाच्या कामाबद्दल ताकीद करण्याबद्दल, धोंडोपंत यास करावयाची सूचना (३४२०३).

**माबई पवार – बाबासाहेब*** : म्हसवड येथें कारभाऱ्यास पाठविलेल्या पत्राची पोंच, बापूसाहेब यांजकडून शेरीकर रयत, तेली, तांबोळी वगैरेंस उपद्रव (३४२८४).

**यशोदाबाई ओक – राघोपंत गोडबोले** : गंगाधर यास औषधोपचार (३४२२५).

**रघोजी चव्हाण – राघोपंत*** : कल्याण व भिवंडी येथील मामलेदाराकडून तांदूळ, भोपळे वगैरे आणावयाचे जिन्नस, बारभाईकडील स्वारांच्या भीतीने रयत, मामलेदार वगैरे हवालदील व अभयपत्राची मागणी (३४२२०); – **राघोपंत* व अन्याबा*** : गोरट येथून तांदूळ वगैरे जिनसांची मागणी (३४२२४).

**राघो केशव – नाना*** : महाड येथे गमन, मानाजी पायगुडे याची भेट (३४१८८); महाड येथे अतिवृष्टीमुळे धान्याची टंचाई (३४२०४); – **पंतप्रधान*** : किल्ले पालहून बेलापूर येथे जात असल्याबद्दल, रोजमुरा ऐवजांत वाढ करण्याची व रखमाजी जाचक याच्या पालखीच्या नेमणुकेचा ऐवज पाठविण्याची विनंती (३४२०२).

**राघो गोविंद – पंतप्रधान*** : आपसांत सलोखा झाल्याबद्दल, दहिगांवहून पत्रें रवाना (३४१९५); पंधरा दिवसांनी जामीन देण्याचा करार करून वामोरीपैकी सरकारांत आलेल्या दोघांना ताकीद व लावणी वगैरेचा बंदोबस्त (३४१९६); दुसऱ्या बाब्यांतील बाईसाहेबांकडील हुजऱ्यांकडून मातुलठाण गांवांत दंगा, प्रेषकाच्या नांवच्या पत्राची त्यांजकडून मागणी व त्याबद्दल करावयाचा बंदोबस्त (३४१९७); स्वामींकडील व उभयतां बाईसाहेबांकडील पत्राप्रमाणे एकदां वागल्यास नेहमीच त्याप्रमाणे वागावे लागेल म्हणून पत्रांकडे दुर्लक्ष (३४१९८); पखोरे येथील पाटिलकीची जप्ती व त्यावर गुमास्त्याची नेमणूक, हक्क व मानपानाचा वसूल सरकारांत भरण्याची व्यवस्था (३४१९९).

**रामकृष्ण सदाशिव – बाळाजीपंत भिडे** : देशपांडेपणाचा मजकूर मोराजी याजकडून कळेल, वाकळ-विहीर येथील सोडचिठी न देण्याबद्दल (३४२७६).

**रामचंद्र गोपाळ गद्रे – राघोपंत*** : लक्ष्मीबाई शिंदे हिच्या नावच्या घांसदाण्याच्या चिठ्ठीसह स्वारांचे ओतूर येथे आगमन आणि घांसदाण्याच्या ऐवजाची व उंबरज येथून खर्चास घेतलेल्या ऐवजाची मागणी (३४२२८).

**रामचंद्र विश्वनाथ पटवर्धन – राघोपंत* व अन्याबा राहतेकर** : संक्रांतीचा तिळगूळ रवाना (३४२६९).

**रामाजी भुजंग – राघोपंत*** : नारळ व सुरण रवाना, प्रेषकास बोलावणे (३४२२१).

रुमाल क्र. ६४, पुडके क्र. ४ चालू :

पत्रें चालू :

**वासुदेवभट दामले – लक्ष्मणपंत गोखले** : बाबूराव गोखले पुण्याला आहेत की बारामतीला याबद्दल विचारणा (३४२५२).

**विठ्ठल विश्वनाथ पटवर्धन – राघोपंत गोडबोले** : तात्याबा कमाविसदार किल्ले उंदेरी याच्या कामाबद्दल सदाशिवपंत फाटक याच्याशी प्रापकाच्या झालेल्या तंट्यांत असल्यामुळे कराराप्रमाणे ऐवज देणे म्हणून (३४२३३).

**विनायक* – राघोपंत*** : सोवळ्याची मागणी (३४२३४).

**विष्णु पांडुरंग गोखले – राघोपंत*** : मोरोपंतदादा यांचे पत्र बारभाईकडे पोहोचते करण्याची तजवीज, स्वारांना उठवून लावण्याचा बंदोबस्त, आर्वी येथील हिम्मतबहाद्दर याजकडील स्वार व कारकून यांना घालवून दिल्यानंतर त्यांचे हिवरे येथे गमन (३४२८२).

**श्रीधर रामाजी – राघोपंत*** : डाळिंबांची रवानगी (३४२२३).

**सदाशिव विठ्ठल फाटक – राघोपंत*** : प्रापकाकडून येणे असलेल्या महंमुदीबाबतचा ऐवज कोणाकडून घ्यावयाचा याबद्दल विचारणा (३४२३५).

**सर्वोत्तम शंकर – नाना*** : कोंडभट फडके याचा दहा वर्षांचा पुत्र त्रिंबक किल्यावर अटकेस असून सरकारी सनदेप्रमाणे त्याची मुक्तता केली होती परंतु नवीन आदेशाप्रमाणे पुन्हा कैद करून काशी बल्लाळ याजकडे किल्याचा बंदोबस्त, २५ मोहरम, सु. ११७०/२२ मे १७७० (३४१८९).

**सिदराम खलाटे – नानासाहेब*** : सत्वर सेवेसी येत असल्याबद्दल (३४१८५).

**सिदोजी राऊत – नानासाहेब*** : कार्यसिद्धीस नेतेवेळी जेष्ठांस पत्र दाखविण्याचा कनिष्ठांचा निश्चय व योजलेल्या कामांतील यशाबद्दल शुभेच्छा (३४१९०).

**सीताराम अनंत – लक्ष्मणपंत गोखले** : नेवासे वगैरे महालांच्या सुभ्याकडील पोतनीसी स्वतःची असून तेथील गुमास्तगिरीवर प्रापकाची नेमणूक केल्यामुळे करार केलेला वेतनाचा ऐवज घेऊन उरलेला वेतनाचा व कारकुनीचा ऐवज प्रेषकाकडे देणे, २ रजब, सु. १२०१/२० नोव्हेंबर १८०० (३४२५३).

**हरजीराव शिंदे हवालदार किल्ले जीवधन – रामचंद्रपंत*** : संक्रातीचा तिळगूळ रवाना (३४२७१).

[फक्त प्रेषकांचा नामोल्लेख असलेलीं]

**गोविंद कृष्ण व गोविंद बल्लाळ चाफेकर – (—)** : रास्ते यांजकडे इनाम गांव झाल्यानंतर वेळणेश्वर येथील मोकदमी व कुळकर्णीचा १० वर्षानंतरचा वसूल रास्ते यास गैरवाका समजावून कारभारी

पत्रें चालू :

बाबूभट खरे यांनी बंद केलेला वसूल मिळण्याबद्दल व वतन पूर्ववत् चालू करण्याबद्दल (३४१८४).

**बाळाजी चिमणाजी – (—)** : गोविंदराव याजकडून यावयाच्या भातापैकी एक दूड भात देण्याची गोविंदराव याची तयारी (३४२९१).

**माधवराव मोरे हवालदार किल्ले अशेरी – (—)** : दरवाज्याच्या दुरुस्तीसाठी लोखंडाची व नवीन पहारे बांधण्यासाठी परवारी यांची मागणी (३४२८८).

[फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेलीं]

(—) – **आप्पा** (चिमणाजी बल्लाळ) : दमाजी पिसाळ याजकडील गणेश कृष्ण याची घोडी व वस्तभाव त्यास परत दिल्याबद्दल, इ. स. १७२०–४० (३४२६०).

(—) – **परशरामपंत*** : नबाब अकबर अलीखान यांचे कारभारी शिवशरण व बीजेसिंग यांच्या मध्यस्थीने माफी मागितली असली तरी त्यांच्यावर विश्वास नसल्याबद्दल (३४२८१).

(—) – **सदाशिव बाबाजी** : महादपुरी गांव आप्पाजीराव याजकडे मुकासा असून तेथील घासदाण्याची खंडणी चुकती झाल्यामुळे तेथील पाटील, कुळकर्णी यांची करावयाची मुक्तता (३४२७२).

(—) – **हरिपंत*** : भवानीजवळ खून झालेल्या बाईची हवालदाराने चौकशी न केल्यामुळे बोरावके याजकडे चौकशीचे काम (३४२८५).

[प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख नसलेलीं]

वासुदेवपंत जोशी याजबरोबर पागांचे तेरीज रवाना, प्रांत जुन्नर येथील फडणिसीच्या कारकुनीबद्दल गल्याच्या तयार झालेल्या चिठ्या, हुजूर पागेकडील पोरग्यास द्यावयाचा रोजमुरा (३४१८०); महादेवभट अग्निहोत्री यास नेमणुकीचे भात आदा (३४२६४); सामानाची रवानगी, लक्ष्मीबाई हिचा हरितालिका व ऋषीपंचमीच्या व्रताचा बेत (३४२६५); कृष्णराव बळवंत याजकडील लक्ष्मण बल्लाळ याजकडे मदगिरीचा किल्ला व सुभा करार (३४२७८); यमाजी धुमाळ याची सेवेंतील निष्ठा (३४२७९); महत्वाच्या कामासाठी सत्वर येण्याची विनंती (३४२८७); राघोजी आंग्रे याजकडील सरंजामी गांव वगैरे अंमलाची जप्ती करून वसूल माधवराव हरि कुलाब्याच्या स्वारीहून आल्यानंतर त्याजकडे देण्यासंबंधीचा खुलासा (३४२८९); आज्ञेखेरीज घाटाखाली काही जात नसल्यासंबंधी (३४२९०).

रवानगी याद्या :

जाधवराव कदम यांचा माल आवळकटी येथे जात असता मार्गी अडथळा न करण्याबद्दल चौकीदारांस करावयाची आज्ञेची (३४१८२); बाळाजी नरसिंह याजकडे जकातीचा अंमल व बाकी देण्याबद्दल रामाजीपंत व आप्पाभट भावे यांना द्यावयाच्या पत्रांची (३४२९३).

* मूळ नांवाची निश्चिती नाही.

**रुमाल क्र. ६५ पुडके क्र. १ ते ५**

**पुडके क्र. १** **सु. ११७० – ११९१**
**का. सं. ९० (३४२९५–३४३८४)** **इ. स. १७६९ – १७९१**

**कबुलायन :**

**पिलाजी कडोजी व सुभानजी जाधवराव–बाबा चोळकर** : गोविंदराव विठ्ठल याचा ऐवज ठरलेल्या मुदतीत चुकता करण्याबद्दल (३४३६९).

**हरिभक्ती पारख - नानासाहेब*** : गोपाळ सयाजी भापकर शिलेदार याजकडाल वरात चुकती करण्यासंबंधी, फाल्गुन शु. ७, शके १७१२ / १२ मार्च १७९१ (३४३५९).

**जामीन कतबा :**

बच्याजी पुतळाजी व गोविंद गोपाळ यांनी महादाजी बापूराव याजकडे ठेवलेली वस्तभाव व ऐवज परत देत नसल्यामुळें उद्‌भवलेल्या प्रकरणासंबंधी बच्याजी पुतळाजी यास जामीन असल्याबद्दल (३४३४३).

**पत्रें :**

**आप्पाजी महादेव-गंगाधरपंत जोशी** : स्वामींनी* काशी येथे समाधी घेतली त्यावेळी खर्चास दिलेल्या ऐवजाची परतफेड करण्यासंबधी (३४३३८).

**आबाजी महादेव काळे–राघोपंत शेंडे** : गिरवली ता महाळुंगे प्रांत जुन्नर हा गांव तोफखान्याकडे सरंजामास असता कहीचे लोक उपद्रव देतात सबब बंदोबस्त करण्याबद्दल (३४३०३).

**आबाजी राम भिडे–राघोबा नाईक** : कपड्यांची उधारी चुकती करण्याबद्दल (३४३१९).

**कृष्णाजी भैरव–त्रिंबकराव* भाऊ** : लष्करात ऐवजाची निकड असल्यामुळे प्रापकाकडून कर्जाऊ ऐवज घेतल्याचा खुलासा (३४३४४); **– गोविंदपंत आपटे** : प्रापकाकडे रवाना केलेल्या कर्जावर पूर्वी नोंद झालेली नाही सबब ती कर्जपटावर घेण्याबद्दल (३४३४५).

**गंगाधर अप्पाजी–भाऊ*** : भामेरपैकी गावगना खर्चाची रतनगड किल्ल्याकडे व्यवस्था करण्यांत आली पण जहागिरीची तरतूद कशी कशा करण्यात यावी याबाबत विचारपूस (३४३२६).

**गोविंद बल्लाळ गोगटे–विठ्ठलपंत दिवाणजी** : गारदी दिा सदाशिव रघुनाथ यांच्या कल्याण भिवंड पैकी बाकी ऐवजातून नाना जोशी यास ऐवज देण्याबद्दल (३४३०२)

**गोविंद महादेव काळे-लक्ष्मणपंत गोखले** : दंडेलीकडे गावगना देण्याबाबत ग वक याकडून वराता लिहून घेतल्या पण त्याची कार्यवाही होत नसल्यामुळे बंद बस्ताबाबत कृष्णाजी राम किल्लेदार यांचे पत्र आप्पाजी सावनी कारभारी याजकडे रवाना (३४३४९).

**जितो वामन देशमुख देशमुख व देशपांडे, पाा कुंभारी** : पो कुंभारीपैकी वहिवाट व जमीनझाड्यासंबंधीच्या कागदपत्रांच्या रवानगीबाबत (३४३२८).

**जनार्दन नारायण ओक, मोढा अवचितगड–लक्ष्मणपंत* अण्णा** : रतनगडपैकी लक्ष्मणपंत वैद्य सबनीस व नारोपंत मोडक कारखानीस

**पत्रें चालू :**

आणि अवचितगडापैकी बाबा फडणीस व प्रापकाचे वेतन कमी करण्यांत आल्याची वार्ता व अवचितगड येथील कोठीचे फडणीस आबाजी राम भामणकर यास कामकाजाची सनद न दिल्यामुळे पुण्यास गैरवाका समजावतील तरी त्याची दखल घ्यावी वगैरेबाबत (३४३७७).

**जनार्दन रघुनाथ सुखात्मे–बापू गोडबोले** : ऐवज व्यवहारासंबंधी (३४३६८) (नक्कल).

**जानोजीराव काकडे दिनकरराव गोविंद काशीराव सुभेदार** : बीडपैकी नेमणुकीबाबतच्या ऐवजाची पोंच (३४३५५).

**जिवबा*–आबाजी गोपाळ नाईक** : अर्थव्यवहारासंबंधी (३४३८४).

**तुकाजीराव थोरात दिनकरराव–बाबासाहेब*** : बक्षिसी ऐवज पावल्याची पोंच (३४३७२).

**त्रिंबक गणेश भट-सदाशिव भास्कर** : भगवंत नाईक पुरंदरे यास द्यावयाबद्दल देणे असलेल्या ऐवजाची पोंच (३४३५६).

**धोंडो महादेव-पंतप्रधान*** : आज्ञेनुसार वरात चुकती करुन त्रिंबक तालुक्यांकडील खर्चासाठी लागणाऱ्या ऐवजाची रवानगी केल्यासंबंधीचा तपशील (३४३८०) (नक्कल).

**पांडुरंग रामचंद्र देवधर-मोरोपंत नाना मेहेंदळे** : मालगुंड येथील कुणबावा ऐवजासंबंधी मोरो धोंडदेव केळकर यास तगादा न करण्याबद्दल (३४३१३).

**बाजी बल्लाळ परांजपे–लक्ष्मणपंत देशमुख** : घरगुती ऐवज व्यवहारासंबंधी (३४३६१).

**बाजी मेरुराव श्रोत्री–विसाजीपंत* दादा** : मजकूरच्या आसामीबाबत येणे असलेल्या ऐवजाची मागणी (३४३७४).

**बापूजी गणेश–विनोदगीर गोसावी** : माणको भिडे यास रदकर्जातून ऐवज देण्याबद्दल सूचना (३४३६६).

**बाळाजी राम – जनार्दनपंत* तात्या** : महालानिहाय ताा कुकरसुंडेपैकी जकातबाबत व सरकार आज्ञेनुसार किती व कोठे कोठे शिबंदी रवाना करावयाची त्याबाबतच्या तपशीलवार याद्या पाठविण्यासंबंधी (३४३७८).

**बाळाजी केशव – वासुदेवपंत* दादा** : गांवगना ऐवज रामचंद्र बच्याजी याजकडे रवाना केल्याचे चिंतामण भटजी यास नाशिककडे कळविण्याबाबत (३४३२५).

**बाळाजी सदाशिव *दादा** : सखाराम जिवाजी यांच्या दिवाणगिरीसंबंधी धोंडोपंतांनी नुसती होयबाची भूमिका स्वीकारलेली असल्याचे, कन्यादानाच्या विधीसाठी यावयाचे ब्राह्मण अद्यापि रुजू झालेले नाहीत, सौ. येसूबाई जुन्नर येथे येऊन वाईस जाणार, सौ. गुजाबाईचा मात्र एक वर्षानंतर जुन्नर येथे येण्याचा बेत वगैरे पुण्याकडील वार्ता कळवून अन्याबा जुन्नरकर यास आश्रय देण्याबद्दल व शत्रू फार असल्यामुळे जपून वागण्याबद्दल विनंती (३४३६० ३४३६२).

रुमाल क्र. ६५, पुडके क्र. १ चालू :

पत्रें चालू :

**भवानी शंकर हैबतराव – बाजीपंत*** : देवर येथे महादजी शिंदे यांचा मुक्काम झाल्यामुळे रयतेची वैरण लुटली गेली, लावणी-संचणी थांबली सबब त्याचा बंदोबस्त करून रयतेस सूट दिली व पुन्हा रयत लावणी संचणी करू लागली वगैरे, श्रावण व. ४, सु. ११७०/२१ ऑगस्ट १७६९ (३४३४१).

**भिकाजी सदाशिव दीक्षित – नारोपंत* नाना** : खटाव येथील वर्षासन ऐवजाच्या नेमणुकीबाबत (३४३१५).

**महादाजी लक्ष्मण भट, रेवदंडा निा देशमुख – आबा*** : रेवदंडा येथील देशमुखास मामलेदाराकडून देशमुखी उत्पन्नही लुबाडले जात असल्याची तक्रार व याबाबत बंदोबस्त करण्याविषयी विनंती (३४२९७).

**मोरो रामचंद्र देवधर – शिवबा गोसावी** : राजापुरी प्रांतापैकी गल्ला व्यवहारांत तफावत आढळून आल्यामुळे संबंधित कागदपत्रांच्या चौकशीकरिता तातडीची मागणी (३४३३७).

**येसाजी राम व गोमाजी अनंत – रामचंद्रराव दादा कमाविसदार** : आर्थिक अडचण भागविण्यासाठी ऐवजाची मागणी (३४३१६).

**रामचंद्र व्यंकटेश – व्यंकटराव*** : शिलेदार खंडेराव घाटगे व नवलोजी घायगुडे यांना लग्न कार्यासाठी ऐवज देण्याबद्दल (३४३८१).

**रामचंद्र हरी देवधर – गोविंदपंत देवधर** : भेलसा, खामखेड व नारायणगड वगैरेपैकी खर्चासंबंधीचे ताळेबंद रवाना करण्याबद्दल (३४३२३).

**रामाजी अनंत – महादाजी हरी** : रामाजी सुर्वे यांचे तैनातीबाबतचा हिशेब पाहून ऐवज चुकता करण्याबद्दल सूचना (३४३७६).

**लालमन हवालदार मौजे धानवड पो। नशिराबाद – गोविंदपंत* तात्या** : यात्रेस जावयाचे असल्यामुळे खर्चासाठी ऐवजाची मागणी (३४३०१).

**विश्वासराव त्रिंबक – नाना* स्वामी** : राजगोपाळ हत्ती पुण्यास रवाना केला सबब त्यावर झालेल्या वाटखर्चासंबंधी (३४३३५).

**विष्णू दादाजी – बाबा*** : लावणी-संचणीच्या जामिनाबाबत अटकेत ठेवलेल्या जानोजी पिसाळ याची सुटका केल्याशिवाय बावधन येथील लोकांचा वसूल देण्यास मनाई (३४३२१).

**विष्णू रामचंद्र तांबे – बाजीपंत अण्णा भैरव** : पुण्यात गडबड झाल्यामुळे कर्जपट्टीचा जाबसाल न करतांच परत यावे लागले असे कळविल्याबद्दल (३४३४६).

**विसाजी नारायण कापरेकर – महादाजीपंत घायगुडे** : मोरो गोविंद यांनी केलेल्या भरण्याची नोंद दफ्तरी सापडत नसल्यामुळे चौकशी करण्याबाबत सूचना (३४३३६).

**शंकरराव यादव थत्ते – बाबा फडणीस माहुलीकर** : नोकराची नेमणूक व इतर अर्थव्यवहारासंबंधी वगैरे घरगुती मजकुराविषयीचा खुलासा (३४३७३).

पत्रें चालू :

**श्रीधर जोशी बोरगांवकर – नारोपंत नाना जोशी** : भांडी ओलीस ठेवून कर्जाऊ ऐवज काढल्यासंबंधी (३४३१७).

**सदाशिव भास्कर – रावसाहेब*** : मातबरपुरा का। नाशिकपैकी रसदेचा ऐवज भरण्यासंबंधी (३४३३२).

**सुभानजी शिंदे नामजाद कारकून, नारायणगड – पंतप्रधान*** : फिरंगोजी भापकर यांची कर्जाऊ ऐवजासंबंधीची तक्रार निखालस खोटी असल्याचे कळविल्याबाबत (३४३५२).

**हरिराम* – नरसोपंत*** : कांही कामानिमित्त बाळाजी पांडुरंग यास धारवाड येथे जावे लागत आहे तरी खर्चास ऐवज देण्याविषयी (३४३७१).

**हैबतराव तुकदेव मोरगांवकर – मोरोपंत तात्या देवधर** : श्रीनिवास शामराव, भवानी शंकर हैबतराव, चिटकोपंत शामजी वगैरे मंडळींस ऐवजाची परतफेड करण्याबद्दल ताकीद व्हावी अशी विनंती (३४३५३).

[फक्त प्रेषकांचा नामोल्लेख असलेलीं]

**कमाविसदार, पूर ता। खारेपाटण – (—)** : आज्ञेप्रमाणे होडीची चौकशी केली पण ती फुटकी असल्याचे निवेदन (३४३०६).

**कृष्णाजी गणेश, शिवणे – (—)** : शिवणे पा। देहरगोरट या भागांत पर्जन्याअभावी दुष्काळ पडल्यामुळे गावगन्ना वसुलाबाबत तगादा होऊ नये म्हणून विनंती (३४३०८).

**गोविंद बल्लाळ – (—)** : नवीन जकात नाक्यावर अडवून धरलेल्या बैलांच्या सुटकेबाबत विनंती (३४२९९).

**नारो केशव कुलकर्णी – (—)** : ता। खारेपैकी दुष्काळग्रस्त गांवाची पहाणी करण्यासंबंधी (३४३०९).

**बाळकृष्ण चिमणाजी फाटक – (—)** : बुधवारवाड्याच्या खर्चीबाबतच्या वराता ऐवजाविषयी सुपे येथे कारकून तगादा करतात सबब याबाबत ताकीद करणे (३४३२०).

**यशवंतराव महारुद्र – (—)** : वराता ऐवज व्याजासुद्धा चुकता करण्याबद्दल अमृतराव शामराव जतकर यास निक्षून ताकीद करण्यांत यावी अशी विनंती (३४३६४).

**रामचंद्र नारायण गोरे – (—)** : जादा शिबंदी ठेवावी लागल्यामुळे ऐवजाची आवश्यकता (३४३०४).

**सदाशिव गंगाधर फडणीस पो। वडूज – (—)** : पो। वडूजपैकी हिशेब रवाना (३४३२४).

[फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेलीं]

**(—) – अंताजीपंत* दादा** : शिलकी ऐवज नसल्यामुळे मोरो कृष्ण यास रक्कम देणे अशक्य (३४३४२).

**(—) – गंगाधरपंत जोशी** : परशुराम, बहिरोपंत व जनार्दनपंत पटवर्धन वगैरेंच्या जमीनीच्या मोजदादी याद्यांची पोंच (३४३१०).

**(—) – गणपतराव रावजी** : मिरासपट्टी ऐवज वसुलाबाबत (३४२९५).

रुमाल क्र. ६५, पुडके क्र. १ चालू :

पत्रें चालू :

(—) – गोविंदपंत* : खानदेशपैकी अजमासाबाबत (३४३३४).

(—) – नारो जिवाजी : तरसुभ्याकडील हिशेबी कागदपत्रांची मागणी (३४३४७).

(—) – नारोपंत* नाना : बापूजी हरी याजकडे नरसो श्रीपत यांची कारकून म्हणून नेमणूक करण्यात यावी अशी सूचना (३४३६७).

(—) बाबा* स्वामी : पो उंबरखेडे व पो सिन्नर येथील इस्तावा नेमून द्यावयाचा असल्याने कमाल जमेचा अजमास पाठविणे (३४३७०).

(—) – मल्हारपंत स्वामी* : कृष्णराव बल्लाळ यांची मोइनेवर नेमणूक करण्याबद्दल शिफारस (३४३८२).

(—) – महादजीपंत काळे : कोकण सरसुभ्यापैकी बहिवाट, अजमास व स्वारांच्या हजेरीसंबंधी कागदपत्रांच्या रवानगीबाबत (३४३२७).

(—) – रामचंद्रपंत देवधर : रामाजी महादेव याजकडून प्रांत कल्याण-भिवंडीपैकी जमाबंदी वसुलासंबंधीच्या पत्रांचा जाब आल्यास हुजूर पाठविण्याबद्दल (३४३२९).

(—) – रामचंद्रपंत मांडवगणे : प्रांत वाईपैकी जप्ती हिशेबाच्या रवानगीबाबत (३४३३१).

(—) – वामनाजी सदाशिव : धान्य खरेदीविक्री व्यवहारासंबंधी (३४२९६).

[प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख नसलेलीं]

लोहगडाकडून खोल्या सबबीवर दरबारी खर्च उकलण्यांत येत असलेल्या प्रकरणासंबधीच्या चौकशीबाबत (३४२९८); एकबेरजीकडे तुंबून राहिलेले कामकाज उरकण्यासाठी कल्याण-भिवंडीपैकी कारकून पाठविण्याबाबत (३४३००); निरोपानुसार रसद ऐवजाची यादी रवाना (३४३०५); चांदवे व अहिरे येथील मंदिराच्या शाकारणी-करितां ऐवज देण्यासंबंधी (३४३०७); कर्जपट्टीसंबंधी कसा कसा ठराव करण्यांत आला त्याबाबत विचारपूस (३४३११); आदगांव स्वारीकडील खर्चाबाबत (३४३१४); मलमली कापडाच्या रवानगी-बाबत (३४३१८); कऱ्हाड प्रांतांतील गांवाच्या बहिवाटीकडील हिशेबासंबंधी (३४३२२); कर्नाटकाच्या स्वारीवर रवाना केलेल्या लोकांच्या झालेल्या बेगमी खर्चासंबंधीचा झाडा पाठविण्याबद्दल सूचना (३४३३३); दप्तरांत पागेकडील हिशेबी कागदपत्रांचे रुमाल जळाल्या-मुळे हिशेब दाखल करणे अशक्य (३४३३९); यादीनुसार पहाडसिंग याजकडील हिशेब सुपूर्त करण्याबद्दल (३४३४०); कोहजपैकी बहि-वाटीच्या ठरावसंबंधी (३४३४८); हैबतराव भवानी शंकर यास देशाहून गला आणण्याबाबतचे दस्तक देण्याविषयीचे (३४३५०); फणस व नारळाची रवानगी (३४३५१); फरासखान्यापैकी जाजम व पाल कारखान्यांत नेल्याबाबत (३४३५४); खेड व चाकणपैकी रसद ऐवज भरण्यासंबंधी (३४३५७); महाल व सुभ्याकडील तफावती ऐवज सुभ्याकडे जमा करण्याबद्दल (३४३५८); शिलेदार कृष्णाजी देवकांते याचे कारकुनास नालबंदी ऐवज देण्याबद्दल, ३ मोहरम, सु. ११७१/१९ एप्रिल १७७१ (३४३६३); बाळूमियाँ यांची

पत्रें चालू :

पहिली याद जरी हरवली असली तरी मखलाशीची याद दुबारा देता येत नसल्यामुळे त्याची अडचण लक्षांत घेऊन तूर्त ऐवज देण्याबद्दल विनंती (३४३६५); पट्ट्याप्रमाणे सुलतानजी व रायाजी कदम यांच्या पागेकडे नालबंदी ऐवज आदा करण्याबद्दल सूचना (३४३७५); रायभान हमीर कल्याणकर यांचे नांवे कलकत्त्याहून आलेली हुंडी त्वरित सोडवून न घेतल्यास परत पाठविण्यांत येईल असे कळविल्या-बाबत (३४३८३).

रसानगी यादी :

रद्दकर्ज ऐवज व्यवहारासंबंधीच्या नियमांचा खुलासा व बेकायदे-शीररित्या देण्यांत आलेला रद्दकर्ज ऐवज माघारा घेण्यासंबंधी (३४३७९).

राजीनामा :

कोन्हेर व्यंकाजी-बाजीपंत दादा* : पो मोहेवपैकी मामलत जाब-साल प्रकरणाचा निर्णय संबंधित कागदपत्रानुसार देण्यांत येणार असल्यामुळे तो मान्य असल्यासंबंधी, मार्गशीर्ष शु. १३, संवत् १८४० / ६ डिसेंबर १७८३ (३४३३०).

बरात :

(—) – विठ्ठलराव मल्हार : मोसे येथील मजमूपैकी रसद ऐवजातून मानाजी शिंदे यांचा रोजमुरा ऐवज देण्याबद्दल (३४३१२) (नक्कल).

---

*मूळ नांवाची निश्चिती नाही.

---

रुमाल क्र. ६५, पुडके क्र. २ — सु. स. ११७९–१२०३

का. सं. १०९ (३४३८५–३४४९३) — इ. स. १७७८–१८०२

जबानी :

चंपतगिर* – (—) : प्रेषकाचा गडी निघून गेल्याबाबत, २७ ऑगस्ट १८२२ (३४४७३).

पत्रें :

अंताजी नारायण–बाबूराव* व जनार्दनपंत* : कारकुनांच्या नेमणुकेचा ऐवज प्रेषकाकडे लवकर पाठवण्याबाबत, पिलाजी जाधवराव याजकडून कांहीं ऐवज आला असल्याचे, गंगथडीचा कारकुनांचा ऐवज येणे आहे तेव्हा रायाजी मल्हार यास ऐवज पाठवण्यास सांगण्याविषयी (३४४०८).

काशी शिवराम बंदरे* व गोविंदराव–रायाजीपंत आप्पा* व आबा फडणीस : छत्रपती स्वामींकडील सेवा चाकरीस असलेल्या लोकांचा रोजमुरा पाठवण्याविषयी कारभारी यांस पत्र पाठवण्याबाबत, वर्दीचे पाठविलेले कागद यजमानांकडे रवाना करण्याबद्दल (३४३९८).

कुसाजी पाटील डेंगळे–बापूजी डेंगळे : पुण्याचे रोपणाई खर्चाची याद पाठविली असून ही याद व स्वारीतील खर्च असे एकंदर आकारून सरकारांत देण्याबद्दल व नित्य दानाच्या खर्चाची याद करून देण्याबाबत (३४४२४).

रुमाल क्र. ६५, पुडके क्र. २ चालू :

पत्रें चालू :

**कृष्णराव जगन्नाथ–डांगे व परकी निा जकायत चौकी का कऱ्हाड** : कऱ्हाड येथील चौकीची जती करून नाईकजी चव्हाण यास पाठविला असून त्यास रुजू होऊन जकातीच्या जमा झालेल्या ऐवजापैकी हुजूर मामलेकडील हिश्याप्रमाणे ऐवज काढून बाकी जिल्हेकडील ऐवज झाड्यानिशी पाठवून देण्याबद्दल, ६ जिल्हेज, सु. ११७९ / २६ डिसेंबर १७७८ (३४४५४).

**कृष्णाजी थोरात–बाबाजीपंत बाबा** : पुण्यास जाऊन आल्यावर समक्ष येऊन हिशेबाचा व ऐवजाचा फडशा करीत असल्याने वरातदारांस मनाचिठ्ठी देण्याबाबत (३४४२९).

**कृष्णाजी नारायण भट–नाना*** : वसुलासाठीं वरातदार आले आहेत परंतु स्वस्ताई असल्याने भाताची विक्री होत नाही व कर्जही मिळत नसल्याने जे कर्ज मिळाले तेवढा ऐवज पाठवीत असून बाकीचा नंतर पाठवीत असल्याचा खुलासा (३४४२५).

**केशवराव मोरेश्वर–सदाशिवपंत साठे** : नारायणभट केतकर याचे टोणगे उरपाड येथून आलयाने त्यांना जकातीसाठीं हाडप म्हणून मुगटा ठेवला तो जकातदारास ताकीद करून परत देण्यास सांगण्याची विनंती (३४४८६).

**केशो नारायण म्हसकर–सखारामपंत बापू लघाटे** : जकातीकडे व आंबराई व फडावर तेलाकरिता टाक्या खरेदी केल्या तो ऐवज शिलकेस राहिला त्याचा खर्च जामदारखान्यातून घेऊन प्रापकावर चिठ्ठी केली त्याबाबत खुलासा (३४४११).

**गंगाधर गोविंद – लक्ष्मणपंत गोखले** : ऐवजाची पोंच, प्रापकाचा बाकी राहिलेला ऐवज पुण्यास आल्यावर देऊ म्हणून, फाल्गुन ब. १, सु. ११९५ / ६ मार्च १७९५ (३४४८१).

**चंदेखान व नरखान डांगे – भगवंतराव काका*** : सरकारचा कर्जपट्टीचा रोखा झाल्याने प्रापकाने येण्यास सांगितले परंतु प्रापकाच्या व कुसाजीच्या विचारे काय ठरेल ते करण्याबद्दल (३४४४३).

**चिंतो त्रिंबक – रामचंद्रपंत भाऊ भावे** : घेरडीच्या हिशेबाकरितां बाजीपंतांना प्रापकाकडे रवाना केले असल्याचे, स्वारीचा कोणीकडे जाण्याचा बेत आहे याबाबत विचारणा (३४४१३).

**जनार्दन त्रिंबक – दादासाहेब*** : ज्योती तीर्थरूपानी करार केल्याप्रमाणे ऐवज पाठवत असल्यासंबंधी (३४४८४).

**जोगसर – रावसाहेब*** : कुटुंबसुद्धा देशी आलो असतां महाराजांनी गोसाव्याच्या व राज्याच्या बंधनातून सोडविले व गोसाव्याचे कर्ज अद्यापि देणे असल्याबाबत, प्रेषकाच्या पिढीजात असलेल्या आसामीस जो कोणी उपद्रव देईल त्यास ताकीद करण्याची विनंती (३४४३८).

**त्रिंबक कृष्ण – बाजीपंत आण्णा*** : बापूभट यांनी पालेगार यांस कर्ज दिले त्याची परतफेड व्हावी म्हणून विनंती (३४४३४).

**तुकोजी बागुल – भगवंतराव काका* व सदाशिवराव काका*** : खासगत ऐवज पाठविण्यास सांगितल्यावरून कांही ऐवज पाठवीत असून बाकी राहिलेला नरसोजी आल्यावर पाठवित असल्याबद्दल (३४४४५).

पत्रें चालू :

**दत्तो गोविंद – महिपतराव बाजी** : भारी तांदूळ पाठवण्याबद्दल (३४४४२).

**दिनकर बल्लाळ – विसाजीपंत सुभेदार*** : भिकाजीपंत लिमये व गोपाळ अनंत यांचे विद्यमाने सराफाचे पारखांने भिकाजीपंत यास ऐवज देऊन कबज घेतले असल्याचे, ऐवज पारखीच्या घालमेलीमुळें दीड महिना अमानत राहिल्यानें त्याची मिती आपल्यावर चढली असल्याचे (३४४५३).

**नारो आप्पाजी – लिंगोपंत आप्पा*** : बाळाजीपंत आप्पाच्या विषयीच्या मजकुराप्रमाणें काम करून ऐवजाचा फडशा लाऊन दिला म्हणून ज्याचे त्यास निवेदन करण्याबाबत (३४३९३).

**निंबाजी जाधव – कुसाजी पाटील** : बापू आपटे श्री पंढरीस गेले असल्याने संतोषगड येथील हिशेबाच्या रुजुवातीस दुसरा कारकून पाठविण्याबद्दल (३४३९९).

**पर्वतराव गायकवाड – विसाजीपंत बाबा*** : भूपाळगड व सेटफळ ही गांवे प्रेषकाचीच असल्याबाबत खुलासा (३४४७६).

**पांडुरंग कृष्ण गोडबोले – तात्या*** : वासदे येथील ऐवजाच्या वसुलीस बाळाजी हरि जोगळेकर यास प्रेषकाने पाठविले असता त्यास नरोत्तमदास यांनी धरून नेऊन चीजवस्त घेतली ती परत करण्याबद्दल, आपल्याकडे दोन आसाम्या असून नवलगुंद येथील आसामीच्या रसदा सरकारांत मागतात तेव्हा रसद न घेण्याबद्दल प्रापकाने हरिपंत तात्या यास विनंती करावी म्हणून (३४४६९).

**बापूजी गणेश – देशपांडे प्रांत वाई** : मौजे सिर्वे येथील पाटीलकीचे वतन सरकारांत जप्त असता प्रापक हक्क घेतो असे समजले तेव्हां त्यापैकी ५०० रुपये पाठवण्याबाबत (३४३९१); – **नरसिंगराव भाऊ नदवाडगी** : कलकिरे येथील सालमजकुरच्या ऐवजातून दोन हजार रुपयांची हुंडी प्रापकावर केली असून हुंडी घेऊन विनोदगिर गोसावी याजकडून कोणी येतील त्याचे पदरी हुंडीप्रमाणें ऐवज घालून भरपाई करून द्यावी (३४३९५); – **येसाजी पवार** : रामेश्वर हा गांव कुरणासुद्धां प्रापकाकडे असल्याने कुरणातील कापून ठेवलेले गवत व वनचराईचा घेतलेला ऐवज कमविसदाराकडे फडशा असेल तो तात्या कमाविसदार यांजकडे देण्याबद्दल (३४४३९); – **वणगोजी नाईक निंबाळकर** : प्रापकाकडे कर्यात भालवणी येथील पोषाखपट्टीचा ऐवज येणे त्यापैकीं बाबाजी चिमणाजी याजकडील कवायती लोकास ऐवज देण्याबाबत (३४४१२).

**बापूजी त्रिंबक – व्यंकोजी जाधवराव** : मोरबाच्या प्याद्याने रोजमुऱ्याच्या ऐवजासाठीं निकड लावली असल्याने ऐवज लवकर पाठवून देण्याविषयी (३४४८०).

**बापूभट दिवेकर – भिकाजीपंत लिमये** : बाबाजीपंत फडके यास प्रापकाच्या भिस्तेवर रसदेचा ऐवज दिला असल्याने पत्र पोहोचताच ऐवज पुण्यास रवाना करण्याबद्दल (३४३८५); – **विसाजीपंत बाबा*** : प्रेषकाने व आप्पाने सदाशिवपंत केतकर यास दिलेल्या वरातेच्या ऐवजाबाबत खुलासा (३४४४८); – **भिकाजीपंत लिमये** : ऐवज सत्वर रवाना करण्याबद्दल (३४४६०).

**बाळाजी चिंतामण शाळिग्राम – आप्पा*** : तैनात, नालबंदी, रोजमुरा याबाबत प्रेषकाने नारोपंत यास केलेला खुलासा, श्रीमंत

रुमाल क्र. ६५, पुडके क्र. २ चालू :

पत्रें चालू :

नाना कामकाजास पाठवितात त्यावेळेस खर्चास ऐवज देतात त्याबाबत नारोपंत नाना याने केलेला खुलासा (३४४३१).

बाळाजी लक्ष्मण – रायाजीपंत आप्पा व आबा फडणीस : श्रीनिवास नारायण व गोविंदराव यशवंत काटीकर यास खर्चास सरकारातून कांहीं ऐवज दिला असून काटीमार्डी येथील ऐवज त्यांजकडून येणे त्यापैकीं कांहीं ऐवज देण्याविषयी, सत्यभामाबाई देवधर यांजकडून ऐवज घेऊन प्रापकावर चिठ्ठी केली असल्याचे (३४४२६).

**भगवंत रुद्र जोग – बाबाजीपंत आबा*** : मौजे खातगुण या गावाकडे प्रेषकाचे येणे आहे परंतु गावकरी ते देत नसल्याने त्यांना ताकीद करण्याबद्दल (३४४३३).

**भिकाजी रघुनाथ – बाजीपंत आण्णा*** : घोड्याचा रोजमुरा देण्याविषयी व १०० रुपये सरकारचे खजिन्याबरोबर पाठविले त्याचे कबज देणेबद्दल (३४४४९).

**भिवजी माने पाटील – भगवंतराव पत्की** : गला कोणी घेतला त्याचा तपशील व जमाखर्चाची याद लिहून पाठवण्याबद्दल (३४४४०).

मनुपगिर गोसावी – बळवंतराव मोरेश्वर : प्रापक प्रेषकास पट्टीचा तगादा केल्याने प्रेषकाने सरकारात प्रापकाची पत्रें दाखविल्यावरून सरकारातून प्रापकाचे घरी पहारे बसविले व सरकारातून ठरले त्यावरून प्रापकाचा हिशेब चौघांच्या विद्यमाने समजून घेऊन बाकी निघाली ती घेऊन प्रापकाची पत्रें माघारे दिली, मागे पुढे वहीचा हिशेब किंवा कागदपत्र निघाल्यास ते रद्द समजावे (३४४८५).

**मल्हार गिरमाजी – बाबा*** : शंकराजीपंत यांजकडे बाळाजी भगवंत याचे कर्ज येणे असून त्या ऐवजास खातगुणकरांची निशा करून दिली असता ऐवज देत नाहीत तेव्हां त्यांस ताकीद करण्याविषयी (३४४३५).

**मोरो सखाजी – नारोपंत नाना*** : मसाल्याच्या ऐवजाचा फडशा केला असल्यासंबंधी (३४४५९).

**रघुनाथ रणसोड – त्रिंबकजी पाटील डेंगळे** : वरचेवर पत्र पाठविण्याची विनंती, श्रीमंतांच्या सेवेसी विनंती करून प्रेषकाच्या वेतनाविषयी बंदोबस्त करावा (३४४०२).

**रामचंद्र बल्लाळ आठवले–पांडुरंगपंत भाऊ भागवत** : सावकाराचे व सरकारचे देणे झाल्याबद्दल, घरची अडचण असून देखील घरी जाण्यास मिळत नसल्याबाबत, बापूंचे मुलाचा व्रतबंध झाला असल्याचे (३४४३७).

**रामचंद्र व्यंकटेश – सिनाप्पा दाजी देशपांडे** : कासेगांव येथील कारकुनीचे ठरावापैकीं १,१०० रुपये प्रापकाकडून विनोदगिर बाबा यांस देविले परंतु ऐवज अद्याप पोचला नसल्याचे समजले तेव्हां शिपाई पाठविले असून त्यांचे गुजारतीने विनोदगिर बाबाचा ऐवज व्याजासहित देऊन पावती घेणे (३४४०४);–**भास्करपंत दादा मराठे** : गारद्यांस हुंडीदाखल दिलेल्या वराता माघारा आल्याने दोन जमादारांनी दंगा करून ते यजमान स्वामींकडे जात असता त्यांची समजूत घालून वरातेबाबत केलेला खुलासा (३४४९०).

पत्रें चालू :

**रामचंद्र हरि – गोविंदपंत देवधर** : रामराव सूर्याजी एकबोटे कारकून याचा हिशेब सदाशिवपंत भिडे यांजकडून लिहून पाठवावा (३४४०५).

**रावजी गोविंद – गोविंदराव गोटकर** : ऐवज सिद्ध करून ठेवला असल्याचे, सेवेसी (प्रापकाकडे) येत असल्याबद्दल (३४४०९).

**रावजी शामराज – हरिपंत तात्या*** : पिंपळगांव येथील मोकाशाचा वसूल अद्याप आला नसल्याने प्रापकाचे उत्तर आले म्हणजे भेटीस येत असल्याचे (३४४१६).

**विठ्ठल शिवदेव – अंताजीपंत*** : रोजमुऱ्याचा ऐवज पाठवण्याबद्दल (३४३९०).

**शंकराजी खंडेराव – नारायणदास*** : चाटीघाट व गंगापूर येथील ऐवजाच्या फडशाबाबत (३४४५६).

**शषो नरसिंह – बाबासाहेब*** : बिदनूर येथून खजिना नारायणराव तात्याकडे पाठविला असून रातोरात घेऊन जाण्याविषयी आज्ञा असल्याने येथून स्वार रवाना (३४४०१).

**सदाशिव बाबुराव दातार – पांडुरंगपंत आण्णा*** : बालशेठ माणगांवकर याजबरोबर व त्याखेरीजही आणखी ऐवज पाठविला असून त्याची पावती देणेबद्दल, बाकी राहिलेला जमा करून पाठवीत असल्याचे (३४४१७); खुर्चीकरिता प्रापकाने कृष्णाजी त्रिंबक दातार यांचे ठाकूरदास यांस पाठविल्यावरून प्रेषकाचे खुर्चीचे खरेदीसाठीं घेतलेला ऐवज त्रिंबकजी चव्हाण याचे पदरी घालून ऐवज माघारे नेला असून ठाकूरदास यांनी खुर्ची परभारे खरेदी केला, श्रावण शु १३, सु. १२०३/११ ऑगस्ट १८०२ (३४४१९); ऐवजाकरितां पाठविलेल्या शिपायांना प्रापकाने मनाचिठ्ठी पाठविली ती त्यांस देऊन रवाना केले, कथोल व नवसागर पाठवीत असल्याबाबत (३४४२०, ३४४२१); पावसामुळे ऐवज पाठविण्यास विलंब, ऐवज पोता करून पावती देण्याची विनंती, भात, पोलाद, कापूस यांच्या दराबाबत खुलासा (३४४२२, ३४४२३).

**सदाशिव बाबुराव दातार व गणेश काशी हर्डीकर – पांडुरंगपंत आण्णा*** : ऐवजाची तरतूद केली असून पाठवून देत असल्याबद्दल (३४४१८).

**सदाशिव व्यंकटेश खांडेकर – सदाशिवपंत मामा*** : पाळपट्टीच्या वसुलाबाबत केलेला खुलासा (३४४५५).

**समस्त ब्राह्मण क्षेत्र करहाटकर – बाबाजीपंत बाबा*** : चिटकोपंत यास सांगून मौजे सैदापूर येथील प्रेषकाचा ऐवज येईल असे करण्याची विनंती (३४४३०).

**हरि केशव टिळक – बाबाजीपंत बाबा फडके** : नाझरे येथील रसद भरण्यास मनोहर नाईक याजकडून ऐवज घेऊन दिला असल्याने त्यांची ऐवज देण्याची मुदत संपल्यामुळे त्याचा प्रेषकास फार तगादा लागला आहे तरी ताबडतोब त्याजकडे ऐवज पावता करण्याबद्दल (३४३९७).

[ फक्त प्रेषकांचा नामोल्लेख असलेलीं ]

**कृष्णसिंग*** – (—) : शिलेदारांस रोजमुरा देण्याची आज्ञा करण्याबाबत (३४३८७); शिलेदार रोजमुऱ्यासाठीं उपाशी बसले असल्याबद्दल (३४४८२, ३४४८३).

रुमाल क्र. ६५, पुडके क्र. २ चालू :

पत्रें चालू :

**गोपाळ हरि करमरकर** – (—) : सरकारातून येणे असलेल्या ऐवजासंबंधी खुलासा (३४४८९).

**जनार्दन आप्पाजी** – (—) : कल्याण, भिवंडी येथील मागील सुटीपैकीं ऐवज वामनाजी हरि याजपासून कर्जादाखल सरकारात घेतला त्यापैकीं आदा होऊन देणे निघाले ते कल्याण सुभ्याकडून देवावेत व वामनाजी हरि याजकडून येणे असलेला ऐवज तूर्त घेण्याबाबत लष्करात झालेल्या कराराचा खुलासा (३४४७९).

**जिवाजी मोरेश्वर** – (—) : चंद्राईदुर्ग येथील वसुलीसाठीं तोटलकिरी याजकडून आलेल्या स्वारांचा तगादा (३४४२७).

**तात्या*** – (—) : नख्त व ऐन जिनसांच्या वाटण्यांची पोंच, प्रापकाने सांगितल्याप्रमाणे त्यांचा जमाखर्च करविला असल्याबद्दल, माहिम व मनोर येथे वराता पाठविल्या असून जकातीवर असलेली वरात येथेच ठेवली असल्याचे, अजम काजी याजकडील वसूल आल्याबद्दल (३४४५१).

**पांडुरंग लक्ष्मण** – (—) : जगन्नाथ दाबके याचे पत्र आल्यावरुन आप्पासाहेब याजकडे ऐवज देण्यासाठीं महादाजीपंत जोशी याजकडे ऐवज रवाना, पत्राप्रमाणे नारोपंत नानाकडे ऐवज दिला असल्याबद्दल (३४४७०).

**बाळाजीराव*** – (—) : गोविंद रघुनाथ याचे मुलाने माधवराव त्रिंबक दीक्षित पटवर्धन याचे दुकानी अनामत ठेवलेला ऐवज सरकारात भरणा करण्याची आज्ञा झाल्याने पोता जमा केला असल्याचे (३४४००).

**भीमाजी नारायण** – (—) : आप्पाचे नांवे प्रापकाचे आलेले पत्र त्यास रवाना केले असून उत्तर येताच ऐवज स्वारीत पोहचवून देत असल्याबद्दल, पलटणचा मुक्काम अद्याप तांबवे येथे असल्याबाबत (३४४७१).

**विष्णु शंकर** – (—) : आंबे रवाना (३४४६७).

**विसाजी दादाजी** – (—) : खर्चास पाठविलेल्या ऐवजाच्या हुंड्या सातार्‍याच्या सावकारावर पाठवल्या असून हुंड्याच्या मुदती झाल्या म्हणजे ऐवज घेत असल्याचे (३४४५०).

**शिवाजी अनंत** – (—) : मोरोपंत दिवेकर याचे कर्ज नाणेगांवाकडे येणे त्याबद्दल वरात नाणेगांवावर करून शिपाई पाठविले असता गांवकरी जमाबंदीसाठीं येवतास आले असल्याने गांवात कोणीही नाही त्यामुळे पटी चालत नसल्याने तूर्त थोडासा ऐवज पाठवून बाकीचा ऐवज गावात पटी चालती झाल्यावर पाठवीत असल्याचा खुलासा (३४४७७).

**हरी बल्लाळ** – (—) : पागा हुजूर नि॥ गोविंदराव सदाशिव यांजकडील ऐवजाची वरात फलटणचे ऐवजावर होऊन त्यांजकडील कारकुनास निकाल करून दिला असेल त्यापैकीं ऐवज देण्याविषयी (३४४६६); नाना पुरंदरे श्री त्र्यंबकेश्वरचे यात्रेस गेले त्यावेळी बरोबर शिलेदार नेले त्यास रोजमुरे नावनिशीवार खर्च लिहून दिले त्यापैकीं बहिरजी जगताप चाकरीस न गेल्याने त्याचा रोजमुर्‍याचा ऐवज राहिला तो नानांच्या तसलमातीस जमा धरला असल्याबद्दल (३४४६८).

पत्रें चालू :

[फक्त प्रापकांचा नामोल्लेख असलेलीं]

(—) – **आप्पा*** : तुकनाक व त्यांच्या लोकानी बारीवर मर्दुमकी गाजवल्याने त्यांना बक्षिस द्यावे लागते तरी बक्षिसाची आज्ञा काय आहे ती व्हावी (३४४०३); दौलतराव दि॥ राघोजी आंग्रे याजकडील ऐवज प्रापकाने वसूल करून त्याच्या ऐवजाच्या वराता रत्नागिरीवर झाल्या असल्याची दौलतरावाची चिठ्ठी रामचंद्र नाईक याजवर घेऊन ऐवज घेण्याबाबत (३४४३२).

(—) – **आप्पाजीपंत आप्पा*** : ज्योती महादेव याची वरात धोंडो विश्वनाथ याजवर होती ती बाबुराव श्रीनिवास याजवर लिहून देऊन जो वसूल येईल तो ज्योती महादेव यास देण्याबद्दल (३४४१४).

(—) – **नाना*** : कल्याणकरांनी 'किल्ले माहुलीचे सरंजामाविषयी' खळखळ केली. भात व सारवर नेमणुकेप्रमाणे दिले नाही म्हणून त्र्यंबकपंत सुभेदारास कळवण्याबाबत (३४४०६).

(—) – **बाजीराव पत्की** : रामा हिंगमीर याजजवळून वेणू आप्पाजीच्या कारकीर्दीस वसूल घेतला होता त्याची तफावत पडल्याने रुमाल घेऊन येणे व रुजुवात पाहून रुमाल माघारा घेऊन जाण्याविषयी (३४४४४).

(—) – **रावजी*** : भाटे यांचे बंधू, बापूजी राम, कृष्णाजी नाईक, प्यादे, स्वार वगैरे गटीत असून हिसेरसदेचा फडशा करण्याची निकड, भाटे, नारोपंत व्यास कुकरमुंडेकर यास जामीन राहिले असून ती नक्कल दरबारात दाखवण्याबद्दल, सरकारची एकसाला पट्टी देशमुख, देशपांडे, पाटील, कुलकर्णी यांच्यावर आली त्याबाबत खुलासा (३४४५७) (अपूर्ण).

(—) – **विठ्ठलपंत मामा*** : पिंपळगाव येथील मोकाशाचा ऐवज शिरस्तेप्रमाणे चिटको महादेव याजकडे देण्याबद्दल (३४४६४).

[प्रेषक व प्रापकांचा नामोल्लेख नसलेलीं]

शिलेदारांस नेमणुकेप्रमाणें नालबंदीचा ऐवज देण्याबद्दल (३४३८६); बाजीराव पाटणकर यास रोजमुरा देण्याची आज्ञा करण्याविषयी (३४३८८); शिपायांस रोजमुरा देण्याबाबत (३४३८९); जानोरी येथील मागील हिशेबाचा फडशा केला असल्याचे (३४३९२); वासुदेव तुकदेव याचा कानापूर येथील हिशेब प्रेषकास समजाऊन देण्याबाबत, पागेच्या हिशेबाबाबत (३४३९४); किल्ले सिंहगड येथील मामलत केशवराव जगन्नाथ याजकडे असून तेथील ऐवजाने बेगमी होत नसल्याने किल्याचा जमाखर्च पाठविला आहे तो पाहून स्वामींनी नेमणूक करून दिलेल्या बेगमीस द्यावयाच्या ऐवजापैकीं किती ऐवज द्यावा याबाबत विचारणा (३४३९६); हरिसिंग जमातदार याजला वस्त्रें दिली असून त्याचा व सुकलाल हजारी यांचा रोजमुरा देऊन त्यांची रवानगी करण्याबाबत (३४४०७); रामचंद्रपंत सुभेदार यांजकडून ऐवजाची पोंच (३४४१०); साहेबांस विनंती करून वरात मना होईल असे करण्याची विनंती (३४४१५); मल्हार गोविंद यांनी वरात माघारी पाठवली असल्याचे, आप्पाजीकडे कमाविसदार पाठवून वसूल करण्याबद्दल, मोरो आप्पाजीस दमोयेस पाठवून तेथील वसुली करावा म्हणून (३४४२८); रत्नपारखी याचे हैबतराव याजकडे कर्ज येणे असल्याने

रुमाल क्र. ६५, पुडके क्र. २ चालू :

पत्रें चालू :

राघो गोविंद यास परगणा जप्त करण्याविषयी पत्र दिले आहे त्यास पुन्हा पत्र देऊन परगणा जप्त न करण्यास सांगण्याबाबत (३४४३६); हिशेबाकरिता बोलावलेत परंतु वेळ मिळत नसल्याबद्दल निवेदन, मोरोपंतभाऊ याच्या वरातदाराच्या वर्तणुकीबाबत, त्याचे रोखापत्र चौकीवर होईल ते होऊ न देण्याबद्दल (३४४४१); जमा झाल्यानिशी पाठवून देणे म्हणून सांगितल्यावरून कुसाजी जाधव याजबरोबर रवाना (३४४४६); महादजी विश्वनाथ याच्या अमदाबादेकडे असलेल्या आसामीचे वेतनापैकीं ऐवज श्रीमंतांनी दिला त्याची वरात प्रापकाचे नावे पाठविली असून त्याजकडे प्रेषकाचे कर्ज असल्याने प्रापकाने ऐवज दिला तर प्रेषकाचाही ऐवज मिळेल म्हणून निवेदन (३४४४७); केशवराव, खुशाल पारखी व दाजीबा आईतोळे यांजकडून ऐवज घेऊन बापू कृपाराम याजकडे तो पटविण्याविषयी (३४४५२); स्वामीस कोणी कांहीं गैर सांगितल्यास मनावर घेऊ नये, काकोबा व कुमेदान यांनी चाकरी बजावण्याचा बेत केला असल्याचे, जमाखर्च केला असून वसुलास दोन तीन महिने लागतील, १ जिल्हेज, सु. ११९७/७ जून १७९६ (३४४५८) (अपूर्ण); चिंतो कृष्ण यास पुणेपैकीं दरसाल वरात सरकारातून मिळत असते त्यास त्याचे पुत्र बाळाजी चिंतामण लष्करास आले आहेत तेव्हां श्रीमंतांस विनंती करून वरात त्यांना मिळेल असे करण्याबद्दल (३४४६१); आज्ञेनुसार बारबकराचे हिशेब शोध करून पाठवीत असल्याबद्दल (३४४६२); वाघीबरोबर आलेल्या लोकांबरोबर ऐवज पावता करावा लागत असल्याने आरमाराकडे बेगमीस दिलेला ऐवज कोणापाशी आहे याबाबत विचारणा (३४४६३); जायदगौडा सरदेसाई मामले तोरगल याजकडील गावाकडे मोकासबाबेचा ऐवज यावयाचा त्याऐवजी भास्करपंत मराठे यांनी वरात करून उपद्रव दिल्याने त्याबाबत केलेला खुलासा (३४४६५) (मसुदा); रखमशेट वारल्यामुळें त्याच्या दुसऱ्या बायकोने हैबतशेट व सिदराम शेठ याजकडे जाऊन त्यांच्यातील समाईक शेठेपणाचे इनाम तुम्हींच घेऊन नवऱ्याने केलेले कर्ज वारून पाणीग्रहण करावे म्हणून विनंती केल्यावरून सिदरामशेट याने केलेला खुलासा (३४४७२); अबदुल हुसेन अरब याजकडील १५ आसामींस मल्हार नाईक व केसोपंत याजकडून पैसे घेऊन रोजमुरा दिला असल्याचे (३४४७४); तुळशीबागेतील नगारखान्याचे लोकांची रोजमुऱ्याचे ऐवजाची वरात झाली असून तिजबर मोर्तब अद्याप झाले नसल्याबाबत (३४४७५); बाळाजी बाबूराव यास हजीर जामीन घेण्याचे निश्चित झाल्यावरून जामीन घेतला असून आज्ञा होईल त्याप्रमाणें हजर करण्याबाबत (३४४७८); शिलेदारांस द्यावयाच्या ऐवजाबाबत खुलासा (३४४८७); शिलेदारांचा ऐवज आपल्या चिठ्ठीनुसार पाठवीत असून जिवाजी गरजे याच्या ऐवजाची परवानगी न झाल्याने परवानगी झाल्यावर पाठवीत असल्यासंबंधी (३४४८८); अन्याबा रहातेकर याजकडील ऐवज गोखले याजकडे देऊन वरातेवर भरपाई केली असल्याचें नारोपंत यांनी सांगितल्याबद्दल, दयाळभाई याजकडील ऐवज जसा देतात तसा घ्यावा लागत असल्यासंबंधी, गणेशभट दादा कर्वे याजकडील ऐवजाबाबत खुलासा (३४४९१); कोणाकडे कांहीं बाकी येणे असल्यास मिळण्यासाठीं खटपट करण्याबाबत (३४४९३).

रसानगी यादी :

सदाशिव रघुनाथ यास कऱ्हाड येथील रसदेचा ऐवज करार करून घेतला त्यास लष्करातून कऱ्हाडचे ऐवज नेमणुकेच्या वराता कराल त्या न करण्याबद्दल रावसाहेबांस पत्र देण्यासंबंधी (३४४९२).

---

*मूळ नांवाची निश्चिती नाही.

---

| | |
|---|---|
| रुमाल क्र. ६५, पुडके क्र. ३ | सु. स. ११६५–११९५ |
| का. सं. १३३ (३४४९४–३४६२६) | इ. स. १७६४–१७९५ |

अर्ज :

**मोकदम नाणेगांव–भाऊसाहेब* व नानासाहेब*** : ओलीस ठेवलेल्या लोकांना सोडवण्याबद्दल विनंती (३४४९४).

पत्रें :

**अंताजी कृष्ण देशपांडे–सदोबा*** : गंज खरेदीसाठीं आठ रुपये देण्याबद्दल व कांहीं कामासाठीं आबा यास घेऊन यावे म्हणून (३४६०८).

**अंताजी त्रिंबक खेडकर–हरिपंत*** : सोवळ्याचे पिवळे खण पाहून ठेवले आहेत ते कृष्णाजीपंत याजबरोबर रवाना करणे, पौष शु. १२, शके १७०९ / २० जानेवारी १७८८ (३४५६१).

**अंताजी मल्हारी–रामाजीपंत*** : कापड खरेदीबद्दल (३४५११).

**अमृत साळवी–सदाशिवपंत साठे मामा** : रुद्र साळवी यास खर्चाचा बंदोबस्त करवून घेण्यासाठीं पुण्यास पाठवीत असल्याचे, माहागिरावर माणसे कोकणांत रत्नागिरी येथे रवाना करीत असल्याचे (३४५८४).

**आबाजी सदाशिव देशमुख–विनायकराव देशमुख** : जैतापूर परगण्यांत भिल्लांचा दंगा असल्यामुळें तेथे स्वार पाठवण्याबद्दल (३४५५८).

**इनसखान नागड–मल्हार रघुनाथ व विसाजी बाबूराव** : हणमंतराव घोरपडे यांचा मेहुणा नारायण तोफखाने कैदेत सापडला आहे तरी त्याची सुटका व्हावी म्हणून विनंती (३४६२०).

**कृष्णाजी महादेव–अंताजीपंत मामा*** : कुशलार्थ (३४५४१).

**गुजाबाई*–मावशीबाई** : घरगुती मजकूर (३४५०२).

**गोपाळ*–गोविंदपंत दादा*** : मातुश्रीबाईस अशक्तपणा आला असल्याचे, गोठणे देवाचे येथील चिमणाजीपंत सुभेदार व दिवाण आबाच्या भेटीसाठीं विजयदुर्ग येथे येणार आहेत म्हणून निवेदन (३४५५६).

**गोपाळ लक्ष्मण वडकर–धोंडोपंत कुलकर्णी** : भीमाशंकरहून आलेल्या महादेवभट परांजपे या ब्राह्मणांस दक्षिणा देऊन त्यास गांवी सोबत देण्याबद्दल (३४५१४).

**गोपिनाथभट पाटगांवकर–राघोपंत दादा गोडबोले** : प्रापकाच्या कांही दुःखद स्थितीस प्रेषकाकडून सांत्वन, सेठी जासूद नित्य पुष्पे आणून देत असतात तरी बाळाजीपंत रोज येऊन समाचार घेत असतात म्हणून (३४५३६).

रुमाल क्र. ६५, पुडके क्र. ३ चालू :

पत्रें चालू :

**गोविंद रामचंद्र जोशी–सदाशिवपंत साठेमामा** : मोरकुंचे बांधून पाठवून देणे (३४५७८).

**गोविंद व दिनकर शिवाजी–माधवरावजी*** : प्रापकास निंबोडी गांवातून औषधपाण्यासाठीं घेऊन येण्याकरिता भास्करपंत यांची रवानगी, मिरज गांवी भोई मिळतात तेव्हां डोली करून येण्याबद्दल आग्रह (३४५६८).

**गोविंदराव बापूजी–नरसिंगराव भाऊ*** : बारीक भाताच्या दोन गोण्यांची मागणी (३४५८९).

**जनार्दन त्रिंबक–दाजी*** : हरबा यांची चिंता न करण्याबद्दल (३४६०४).

**जानोजी हवालदार–गणेशपंत*** : खर्चाची टंचाई निवेदन केली असून मुलांकडून कुशल पत्राची अपेक्षा (३४५६०).

**जिवबा कालेश्वर–आबाजी गोपाळ** : जाबत्याप्रमाणे कापड पाठवण्याबद्दल खुलासा (३४५६२).

**तुळसाजी थेऊरकर–अमृतराव दाजी*** : कऱ्हाड पाटील याचे करारनामे झाल्याचे, निंबाजी जासूद याजबरोबर गावकरी पाटोळ्यास रवाना केले असल्याबद्दल (३४५०५).

**त्रिंबक विश्वनाथभट लोहगांवकर–बाबा चोळकर** : गोपाळभट पालखेडकर यांच्या बिऱ्हाडाची सोय नसल्यामुळें चार दिवस प्रापकाच्या घरी रहाण्याची त्यांनी व्यवस्था केली असल्याबद्दल, शरीरी समाधान नसल्यामुळें पुण्यास येण्याचा प्रापकाचा विचार रद्द (३४५३२).

**दाजीभट केळकर–जनार्दनपंत मामा सुभेदार*** : खोडसी येथील येणे असलेल्या बाकीची वसुली करण्याबद्दल, व्यंकटराव यांनी खर्चास दिलेला ऐवज घरी पोहचऊन पावती घ्यावी (३४६११).

**दादूभट खरे–येसाजीपंत काका*** : उमाबाईचे कोकणांत गमन (३४५२५).

**द्वारकाबाई अभ्यंकर–नारोपंत चक्रदेव** : श्री क्षेत्री घर बांधण्यास घेतलेल्या जागेची वाटणी करून जागा देण्याबद्दल (३४५५९).

**धोंडो गोपाळ–गंबाजी*** : दयाराम आत्माराम याजकडून हुंडी घेण्याबद्दल, गणोबाची काळजी घेऊन ठकूबाईस ऐवज द्यावा म्हणून खुलासा (३४५६५).

**धोंडो गोविंद थोरात–राघोपंत दाजी*** : बोरे रवाना, भोई अगर कामाठी पाठवून देण्याची विनंती (३४५५०).

**नारायणभट देवळे–लक्ष्मणपंत गोखले** : वासुदेवपंत यांचा सांभाळ करण्याची विनंती (३४५५४).

**नारायणराव विश्वनाथ–हरबाजीपंत दाजी*** : देवकांते याजकडून म्हशी येत असतां वांगी येथे हसिलाचा अडथळा झाला तरी मार्गाचे दस्तक व म्हशीचे खर्चास ऐवज जासुदाजवळ देण्याविषयी, २२ मोहरम, फ. १२०४ / १९ ऑगस्ट १७९४ (३४५००).

**नारो बल्लाळ – गोविंद पंडित** : पत्र आल्यामुळें संतोष व्यक्त (३४६०५).

पत्रें चालू :

**नारो बाबाजी – पंत नाना*** : बागमांडला येथील आंबे रवाना (३४५९२).

**नारो महादेव गोखले – आप्पाजीपंत*** : सरंजाम तयार झाला असून दिरंगाई न करता दस्तक व माणसे सत्वर पाठविण्याविषयी (३४५२१).

**बगाजी गोविंद – बाळाजीपंत दादा*** : चिरंजीव आप्पाची नेमणूक करण्याबद्दल राघोपंत बाबास पत्र रवाना केले असल्याचे (३४५१०).

**बचाजी गोविंद जोगळेकर – काशीनाथभट*** : रावजीच्या हस्ते घरगुती कामे करून घेण्याबद्दलची कलमें (३४५४४); – **रावजी पेंडसे** : गड्यांची अडचण असल्यामुळें माहुलीस गडी त्वरित पाठवावा म्हणून, शाई, दारूची पेरे व कागदांचे दस्ते पाठविण्यासंबंधी (३४५६७).

**बळवंतराव नागनाथ – परशरामपंत भाऊ*** : ऐवज मिळाला असून गंगा यात्रेस जाण्याचा विचार, गंगा यात्रेच्या खर्चाचे यादीवर मखलाशी करून घेऊन ऐवज घ्यावा म्हणून विनंती (३४५४७); नारोपंत नानास पाठविलेल्या पत्राचे उत्तर मोघम न पाठवता स्पष्टपणे लिहावे म्हणून विनंती, गंगा स्नानास जाण्यासाठीं ऐवजाची मागणी (३४४९८).

**बळवंतराव विठ्ठल पिंपुटकर – नागोपंत तात्या*** : खाजगी मजकूर (३४५८८).

**बापूजी कृष्ण – सदाशिवपंत मामा*** : मुलासाठी चर्मी जोडे रवाना (३४५९९).

**बापूजी गणेश – व्यंकटरावजी मराठे व श्रीधर बल्लाळ** : यज्ञेश्वर शास्त्री पुण्याहून करवीर येथे जात असता त्यांना कऱ्हाड ठाण्याहून प्यादे व आसामी देऊन पोहचवण्याबद्दल (३४६१०).

**बापूजी बल्लाळ भामे – राघोपंत दाजी शेंडे व अप्पाबा राहतेकर** : कुंभशेतकर गावकरी लबाडी करीत असल्याचे, लक्ष्मण शिंपी याचें कर्ज हवालदाराकडे असून त्याचा फडशा करण्याचे कामकाज करण्याबाबत (३४४९७).

**बाबाजी गोविंद – लक्ष्मणपंत अण्णा गोखले** : कसबे पावस येथील मामलेदार याचे जमाखर्चावरून वाकडेपणा आल्यामुळे कारकुनांच्या आसाम्या बंद करितात तरी संरक्षणाची विनंती (३४५५५).

**बाळ दीक्षित गोडबोले – गोविंदपंत तात्या*** : सांगितलेल्या कामाबद्दल स्मरण (३४५१२).

**बाळकृष्ण अनंत – हरि पद्माकर गोखले** : गोविंद यास पाठवले असल्यास त्यास रोजगार देण्याची व्यवस्था करण्यासंबंधी (३४५०६).

**बाळाजी कोनेर – अंताजीपंत दादा*** : रंगवलेले कपडे आल्यावर पाठवून देईन म्हणून निवेदन (३४५७३).

**बाळाजी पांडुरंग – नागोपंत नाना बडदकर** : मैनाबाई प्रसूत झाल्याचे कळवावे व तिला खर्चास दिलेला ऐवज मिळाला किंवा नाही याबाबत विचारणा (३४५८६).

**बाळाजी भुजंगराव – सदाशिवपंत नाना*** : राग न मानता पितांबराची किंमत मर्जीस असेल ती धरून जमाखर्च करावा व राहिलेली बाकी दसऱ्याचे सुमारास देऊ म्हणून आश्वासन (३४५५७).

रुमाल क्र. ६५, पुडके क्र. ३ चालू :

पत्रें चालू :

**बाळाजी हरि कानिटकर – यादव मल्हार :** कंठापूर येथील मामलत विसोबा दातार याजकडे देण्याचा विचार, किल्ले माहुली येथील नक्त खर्चाबद्दल, १३ सवाल, सु. ११६४ / १५ एप्रिल १७६४ (३४५२२).

**बाळोजी पाटील – अमृतरावजी* :** पांडोजी पाटील आडगावाहून आल्यावर पाटोळे गांवी प्रापकास भेटावयास जाणार असल्याचे (३४५१५).

**बिजेराम मिरध – रामकिसन* :** करंबल येथून पुण्यास पळून गेलेल्या गुमास्त्यास काना याजबरोबर श्रीगोंदे येथे रवाना करणे (३४५१६).

**भाई* – भास्करपंत जकातदार खंडाळे :** बांडाबरोबर किराया बैल १४ यांची जकात पाठविली असून त्याची पावती द्यावी (३४६१९).

**मनोहर शंकर – नाना* :** नारायणगांवपैकी आंबे रवाना (३४५९१).

**महादजी पांडुरंग वाईकर – नागोपंत नाना बडदकर :** कोकणात खर्चाकरितां दादास ऐवज रवाना केला असून प्रापकाकडेही खर्चासाठी पसे पाठविले असल्याचे (३४५८७).

**महादेवभट भिडे – हरभट व गंगाधरभट भिडे :** सतशृंगीहून कोकणचे मार्गे घरी येत असल्याचे, चिरंजीवास घरी पाठवण्यासंबंधी, लक्ष्मणपंत जोशी यांची मुलगी धोंडोपंत वैशंपायन यांस दिली असून तिला घेऊन मामास भेटावयास येत असल्याचे निवेदन (३४५६४).

**मालप्पा* – जनार्दनपंत बाबा* :** इनामगांव व शेरी जमिनीवरील तिजाई व बाकी ऐवजाची मागणी (३४६००).

**मैराळ शास्त्री – मामा* :** भेटीस येण्याबद्दल (३४६०३).

**मोरो बल्लाळ नातू – बळवंतरावजी* :** वडोद्याहून एक गृहस्थ अगोदरच सरकारात कामकाज करीत असल्याने प्रेषक स्वार शिबंदी-सहित कामास आला परंतु कोणासही काम नसल्याने त्याचा धीर खचल्याबद्दल खुलासा (३४५८२).

**मोरो भिवराव – विसाजीपंत दाजी* :** पोवळ्याची माळ बांधून आणण्याची कामगिरी (३४५९४).

**मोरो रामचंद्र देवधर – गणेशपंत दाजी* :** बाबुराव धोंडदेव पावस्कर जोशी मसुरा येथून बेपत्ता झाल्याने ते प्रापकाकडे आहेत कां म्हणून चौकशी व असल्यास घरी पाठवून दिल्यास सर्वांच्या भेटी घेऊन पुन्हा येतील म्हणून विनंती (३४५०४).

**मोरो हरि – अंताजीपंत भाऊ आपटे :** तिळगूळ रवाना (३४५७६).

**मोरोबा* – जिऊबाई मावशी* :** येसाजीपंत काकांकडे सुपारी, तपकीर रवाना केली असून सामान मिळाल्याचे पत्र आले नाही म्हणून, गोविंदरावांचे मार्गशीर्ष एकादशीस पुण्यात आगमन (३४५२८).

**यशवंतराव भगत – रामचंद्रपंत सुभेदार तुळपुळे :** सावनूर येथील कुशल समाचार (३४५०९).

**यादव विठ्ठल – नानासाहेब* :** आंबे व फणस रवाना (३४५९०).

पत्रें चालू :

**रघुनाथ रामचंद्र वैद्य – राघोपंतदादा शेंडे :** पत्रोत्तर करीत जावे व लवकरच प्रेषकाकडे येण्याचा बेत करावा (३४५५१).

**राघो रामचंद्र गोडबोले – सदाशिवपंत सुभेदार* :** डावले येथील महंमद सैद याच्या आईने हसन महंमद याजकडे ठेवलेले दागिने व नक्त ऐवज तो देत नाहीं त्याबद्दल दोघांना जुन्नर येथे निकालासाठी पाठवले असल्याबद्दल (३४५०१).

**राघो रुद्र मोडक – वासुदेवपंत दाजी* :** पूर्वी यात्रेस गेल्यामुळें राहिलेले वेतन मिळण्याबाबत प्रयत्न, ज्येष्ठ व. १३, शके १७१३ / २९ जून १७९१ (३४५४३).

**लक्ष्मण गणेश दामले – आबा* :** झडत्या लिहून ताळेबंद खरे करून मोरोपंत तात्यांचे आज्ञेने फेरिस्त दप्तरी बाळाजी केशव याज-बरोबर पाठवले असून झडती पाहण्याची विनंती (३४४९६).

**वासुदेव कृष्ण कारलेकर – चिंतामणभट देवधर :** सोनाळतपे महाल उधोपंत याजकडे ठेवायचा की नाहीं त्याबद्दल व भिवंडीची फौजदारी देण्याबद्दल मोरोपंत दादास विचारणा करण्याची विनंती (३४५२३).

**वासुदेव नारायण आपटे – रामचंद्रपंत दादा व लक्ष्मणपंत गोखले :** राघोपंत गुणे कुंभारी परगण्याचा अजमास करून लवकरच पाठवणार आहेत तेव्हां आण्णा व वामनरावजी यांस सांगून भोजन खर्चाची वगैरे जास्त नेमणूक करवून घ्यावी म्हणून विनंती (३४५३५).

**विठोबा* – नरसीपंत दादा* :** श्री कृष्णास्नानास बाजीपंत भावे वडूथ गावी जाणार म्हणून त्यांस तेथील बेगमीकरितां जिन्नस द्यावेत म्हणून (३४५३३).

**विसाजी केशव – मोरोपंत* :** देसाई व खोले यांच्या तंट्यासंबंधी (३४५०३).

**विसाजी बाजी देशपांडे – बापूराव देशमुख :** पाटीलबाबा दस-ऱ्याच्या समाराधनास राऊतांची नेमणूक करणार असल्याचे (३४६२२).

**विश्वनाथ भाटखोमण – सदाशिवपंत* :** बंदरात राहिलेली लाकडे प्रेषकाकडे पाठवण्याची व्यवस्था करावी (३४५७७).

**व्यंकटराव गुलजार – बापूसाहेब मोहिते :** भोसरी यांजकडील वाड्यांतील चीजवस्तू नेली असून जमादारखान्याचे कुलूप फोडून इतर वस्तू नेल्याबद्दल, केडगांवी बेलदार आणून बागातील झाडे वगैरे नेतात त्यामुळे होणाऱ्या उपद्रवासंबंधी (३४५६६).

**शिवरामभट गवांदे अग्निहोत्री – रामचंद्र तात्या भुते :** इनामाचा सारा जावजी डुंबरे यांजकडून येणे आहे त्याचे वसुलीबद्दल खुलासा (३४६१६).

**शेषो श्रीनिवास – वामनरावजी* :** पत्रोत्तर पाठविण्याची विनंती (३४५७४).

**सखाराम धोंडदेव – विठ्ठलपंत नाना* :** सर्वप्रकारे अपराध क्षमा करून सांभाळ करण्याची विनंती (३४६१३).

**संताजी पाटील घामरे – नानासाहेब* :** कडबा व तुपाची व्यवस्था करण्याबद्दल आठवण (३४५९५).

